# SELECTIONS FROM THE SATARA RAJA'S AND THE PESHWA'S DIARIES.

# I

# SHAHU CHHATRAPATI.

PREPARED BY

RAO BAHADUR GANESH CHIMNAJI VAD B. A.
NATIVE ASSISTANT TO THE COMMISSIONER C. D.

PRINTED AND PUBLISHED WITH THE PERMISSION OF
THE GOVERNMENT OF BOMBAY
BY
D. B. PARASNIS Esq.
FOR THE DECCAN VERNACULAR TRANSLATION SOCIETY

POONA.

"Sahasrakar Press" Satara.

PRICE [illegible] RUPEES.

# अनुक्रमणिका.

श्री छत्रपति

# शाहू महाराज यांची रोजनिशी.

## भाग १ ला.

### राजकीय महत्वाच्या गोष्टी.

इ. स. १७१३–१४.
अर्बा अशर मया व अलफ.
जमादिलावल १९

[ १ ] बदल देणें वेतनात लोकांनीं हिंमत लबे कामगारी लष्करचे सरदारांस जमावानिशीं हुजूर बोलाविलें यास मसाला :—
सटकुजी जाधव यास पत्र मसाला उंबरजेपैकीं जथे दर्याजी नाईक. रुपये २ नरांजी जाधव. २ शहाजी पवार. एकूण ४.

तुळाजी बरगे व सिदोजी बरगे मसाला. जासूद कोरेगांव पैकीं जथे दर्याजी नाईक. रु. २ शाबाजी मोरे २ भिकाजी निकम. एकूण ४.

कुसाजी काळभार कसबे पालीपैकीं. २ कासी महाडीक. २ शिवाजी भोजल. एकूण रु. ४.

विठोजी पाटील रहिमतपुर जासूद जथे कृष्णाजी, २॥ तुकोजी सवाशी. २॥ खेत्रोजी जाधव. एकूण रु. ५.

संभाजी पवार मसाला जाब. २॥ संताजी सूर्यवंशी. २॥ बहिरजी भोसले. एकूण रु. ५.

राणोजी सोळसकर भुकासेगांवपैकीं. २॥ संतजी जाधव जथे कृष्णाजी नाईक. २॥ मकरजी. एकूण रु. ५. जथे कृष्णाजी नाईक.

[ २ ] किता राजश्री पंत प्रधान याकडे राजेश्री रघुनाथ उमाजी रवाना केले. हबशी त्या प्रांतीं आला आहे म्हणून वर्तमान आलें त्याविषयीं पंडित मशारनिल्हेस पत्रें लिहिलीं, हुजुरे पाठविले, त्यास देविले रु. ५०

इ. स. १७२०–२१.
इहिदे अशरीन मया व अलफ.
जिल्हेज १६

जोत्याजी जाधव. ५० व.मळाजी काकडे एकूण १००.

---

## I POLITICAL MATTERS.

*(a) Events of importance.*

(1) Santaji Jadhava, Tulaji and Sidoji Parge, Vithoji Patil of Rahimatpur, Kusaji Kalbhor of Pali, Sambhaji Pawar, and Ranoji Solaskar were called to the Huzur with their armies.

A. D. 1713-14.

(2) News having reached the Raja that the Habshi had come to the Government territory, the Pant Pradhan was addressed on the subject.

A. D. 1720-21

[ ३ ] किता हातरोखा राजश्री मुरारजी हिंदुराऊ घोरपडे वजारतमाहा याजकडील राजश्री भिवराऊ अनंत यासी पत्र कीं निजामनमुलुख नबाब कडपे यावरी गेले. पुढें अर्काटपावेतों जाणार ह्मणून वर्तमान आलें आहे- ऐशीयास अर्काटवर गेले ह्मणजे त्रिचनापल्लीशीं खवडळी करतील

इ. स. १७२२-२३.
सलास अशरीन मया व अलफ.
जिल्हेज १७.

त्यास त्रिचनापल्ली महास्थळ, तेथें चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोसले यांनीं राजश्री मुरारजी हिंदुराव घोरपडे वजारतमाहा यास ठेविले आहेत. तेथील कुमक करणें स्वामीस अत्यावश्यक. येविषयींची तरतूद करणें ती केली आहे. हा सविस्तर अर्थ मशारनिल्हे यांनीं तुह्मांस लिहिला आहे त्यावरून कळों येईल. तुह्मीं त्यांचे वडील वडिलापासून सेवक, श्रम साहास विशेष केले आहेत हें स्वामीस विदित आहे. त्यांनींही राज्याभिवृद्धीकरितां कष्ट मेहेनत केली आहे हें तुह्मीं जाणतच आहां. ऐसीयास सांप्रत नबाबाचें आगमन झालेंच तरी टक्कर देणें. घाटाखालीं नबाब गेले तरी बातमी येऊन पावतांच फौजाही कुमकेस येतील हा निशा असों देणें. किल्ला सामान पुरें करून बंदोबस्त करणें अंतर न करणें. या कामास लोक दिंमत लबे पाठविले आहेत. जामूद यास वेतनात देणें बरहुकूम चिट्टी प्रतिनिधी रुपये:—

१०० निसबत दर्याजी नाईक पवार. १०० निसबत राघोराम सबनीस एकूण २००. पत्र १

[ ४ ] किता पत्रें सरदार यांस कीं जो मनसबा करणें तो विचारें करणें. उतावीळ न करणें. भागानगरकर मोगल फौज तोलदार सामान पुरा आहे, त्यासी उतावीळ करून गाठीं न घालणें. राजश्री कानोजी भोसले यास सामील करून घेणें. राजश्री बाजीराऊ प्रधान यासही

इ. स. १७२३--२४.
अर्बा अशरीन मया व अलफ.
रबिलाखर २१.

स्वामी रवाना तुह्माकडे करीत आहेत, उतावळी न करणें ह्मणून पत्रें पाठविलीं. या कामास लोक रवाना यास मसाला:—

(3) News reached Government that Nizaman-muluk Nabob had gone to Kadpe and intended to proceed as far as Arcot. It was apprehended that should he go to Arcot he would attack Trichanapoli where Murarji Hindurao Ghorpade Vajarat-Maha was kept by Fatesing Bhosle. Bhiwarao Anant, a servant of the Ghorpade was directed to attack the forces of the Nizam and was informed that an army would be sent to his assistance, as soon as information was received of the Nabob's crossing the Ghats.

A. D. 1722-23.

(4) Khanderao Dabhade, Chimnaji Pandit Rajadnya, and Fatesing Bawa were directed to arrange their plans after full consideration, to be in no hurry to attack the Mogal of Bhaganagar as he had a large and well-equipped army, and

A. D. 1723-24

१ राजश्री खंडेराव दाभाडे सेनापती. १ फतेसिंग बावा.

१ राजश्री चिमणाजी पंडित राजाज्ञा.

[ ५ ] राजश्री खंडेराऊ दाभाडे सेनापती यासी पत्र जे राजश्री आनंदराव रघुनाथ सुमंत यांसमागमें शहरास पाठवायास जिवाजी माने व भीवराऊ व दोनशें स्वार व सरदाराकडील कारकून पाठवून देणें म्हणून तुम्हास आज्ञा केली, तुम्ही मान्य केली. तैसेंच पिलाजी गायकवाडास आणवितों म्हणून निश्चय केला त्यामध्यें कांहींच अर्थ होऊन आला नाहीं. स्वामीच्या पायाची शपथ केला तो एकीकडे ठेविला हें तुम्हांस उचित नव्हे. तुम्हांकडून आज जी गोष्ट होऊन आली तेव्हां अन्यत्रही असेंच वर्तो लागतील. याउपरी जिवाजी माने व भीवराऊ व दोनशें स्वार व पवाराकडील मलार प्रभु व सोमवंशीयाकडील हरीपंत, भोसलेकडील दादोपंत यांस सत्वर रवाना करणें. नबाब ऐवजखान शहराबाहेर येऊन राहिले आहेत, आनंदराव यास सत्वर पाठवणें म्हणून पत्रें येतात, याकरितां याची रवानगी केली जाणोन जिवाजी माने कारकून व जमाव रवाना करणें. पिलाजी गायकवाड आणवणें.

इ. स. १७२३-२४. अर्बा अशरीन मया व अलफ. जमादिलावल १.

[ ६ ] बदल देणें ते वेतनात शाहा दौला हुजऱ्या राजश्री सुलतानजीराऊ निंबाळकर सरलष्कर यांजकडे पत्र घेऊन पाठविला जे राजश्री फतेसिंग बावा व चिमणाजीपंत व सेनापती यांस फौजेनिशीं सामील होणें ममालु शाहा दौला यास देविला रुपये ५०.

इ. स. १७२३-२४. अर्बा अशरीन मया व अलफ. जमादिलाखर १.

[ ७ ] किता बदल देणें ते वेतनात लोकांसीं चाकर रवाना कामगारी सरदारांस राजपत्रें पाठविलीं कीं भारी तोलदार फौज करून भागानगर प्रांतें जाणें. कानोजी भोसले यास मार्गस्थ करून घेणें. सरलष्कर व बाजीराऊ प्रधान यांस तुम्हांकडे रवाना केले आहेत हेहीं तुम्हास सामील

इ. स. १७२३-२४. अर्बा अशरीन मया व अलफ. जमादिलाखर १.
15-2-1724

to join over Kanoji Bhosle to the ... They were informed that Bajirao Pradhan was being sent to their assistance.

(5) Anandarao Raghunath Sumant was to be sent for negotiation with Aiwaj Khan. Dabhade was directed to send Jiwajirao and Bhiwarao and 200 swars with him. This, Dabhade, failed to do. He was censured and was directed to send the men at once.

A. D. 1723-24.

(6) Sultanjirao Nimbalkar was directed to join Fatesing Bawa, Chimnaji Pant, and the Senapati with his army.

A. D. 1723-24.

(7) The Sardars were directed to proceed against the province of Bhaganagar with a large army and were informed

A. D. 1723-24.

होतील. मनसबा करणें तो भारी करणें ह्मणून पत्रें पाठविलीं लोक पाठविले यांस मसाला देविला रुपये.

[ ८ ] कानोजी जाधव यास रोजपत्र जे राजश्री आनंदराऊ रघुनाथ सुमंत नबाब ऐवजखानाकडे नाजूक कामास पाठविले आहेत त्यांबरोबर तुह्मीं जाणें ह्मणून तुह्मांस आज्ञा केली असतां तुह्मीं गेलेच नाहीं, याउपरि जमावानिसीं त्याकडे जाणें. या कामास लोक यांस वेतनात रुपयेवो.

इ. १७२३--२४.
अर्बा अशरीन मया व अलफ.
रजब १०.

२९ रायाजी कदम निसबत दर्याजी पवार. २९ रामजी लबे.=५० ह

[ ९ ] बदल देणें ते वेतनात लोकांनीं दिमत लबे कामगारी लष्करचे सरदारांस पत्रें पाठविलीं जे संताजी पांढरे यानीं चंद्रसेन जाधव यासी युद्ध केलें. युद्धामध्यें संताजी पांढरे पडले तें वर्तमान पहिलें तुह्मास लिहिलें आहे. ऐशियासि गनिमास नतीजा पावावा लागतो या गोष्टीचा मनसबा विचारें करणें आहे तरी तुह्मीं फौज घेऊन हुजूर येणें ह्मणून पत्रें पाठविलीं. या कामास लोक पाठविले यास वेतनात देविले.

इ. स. १७२३-२४.
अर्बा अशरीन मया व अलफ.
जिलकाद ६.

केरूजी पवार याजकडे जासूद जेथे संभाजी नाईक पवार. देवजी सोमवंशी याजकडे जासूद यास रुपये.

काळोजी भोसले याजकडे जासूद निसबत लतीबा नाईक रुपये. माणकोजी वायेसे यास पत्र कीं, तुह्मी हुजूर येणें. या कामास माहोन्यास रुपये.

[ १० ] महादाजी घाटगे यास पत्र जे तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें प्रविष्ट झालें. लेखनार्थे कळो आला. छ १४ रजब सोमवारीं अस्तमानीं मुधोळाहून कोकटनुरास आलों ह्मणून लिहिलें त्यावरोन स्वामी संतोषी झाले. तुह्मीं कोकटनुरास आले ते उत्तम गोष्ट झाली. गनीम या प्रांतें

इ. स. १७२३-२४.
अर्बा अशरीन मया व अलफ.
रजब २५.

---

that the Sir Laskar and the Pradhan were ordered to join them.

( 8 ) Kanoji Jadhava was directed to accompany Anandrao Ragunath Sumant entrusted with Political Mission to Nabob Aiwaj Khan. He failed to go. He was now directed to proceed with his army at once.

A. D. 1723-24.

( 9 ) Santaji Pandhare lost his life in a fight with Chandrasen Jadhava. A force was therefore to be sent against the enemy. Keroji Pawar, Kaloji Bhosle, and Dewaji Somavanshi were therefore called to the Huzur with their armies for consultation.

A. D. 1723-24.

( 10 ) Mahadaji Ghatge went from Mudhol to Kokatnur and wrote to the Raja of his movement. His action was ap-

A. D. 1724-25.

आला त्यास नतीजा पोहचविला होऊन [शब्द लागत नाहीं.] आपले स्थलास गेले. तुह्मास कळावें ह्मणोन लिहिलें असे.

[ ११ ] जाव सेख महंमद सफी यास पत्र जे तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें विदित झालें.

इ. स. १७२४–२५.
खमस अशरीन मया व अलफ.
रजब २.
6 7 172

राजश्री बाजीराव प्रधान व सरलष्कर यांची भेट झाली. शनिवारीं घाटाखालीं अष्टमीस मुक्काम झाला. रविवारीं कृष्णातीरीं. सोमवारीं स्वामीचें दर्शन होईल ह्मणोन लिहिलें त्यावरून विदित झालें. ऐशास नियताप्रमाणें राऊ मशारनिल्हे यास घेऊन येणें. सोमवारीं दर्शनास येणें जाब.

[ १२ ] राजश्री कान्होजी भोसले यास पत्र कीं तुह्मी आपले फौजेनिसीं गाहा करून

इ. स. १७२४-२५.
खमस अशरीन मया व अलफ.
जिलकाद १९.

असणें. निजामनमुलुख व शाहामतखान याणें युद्ध आरंभिलें आहे अग तरी तुह्मीं कोणाकडेही न जाणें ह्मणून पत्र. या कामास लोक यास वेतनात देविले रुपये:—

हुजरे रुपये २०० संताजी यादव. २०० अर्जोजी बोडका. एकूण ४००.

आफराप दिंमत लबे रुपये १०० संताजी मोहिते. १०० लिंगोजी यादव. एकूण २००.

[ १३ ] राजश्री बापूजी रायाजी व सिदोजी थोरात यास राजपत्र जे मिरजेचा मोगल

इ. स. १२२४--२५.
खमस अशरीन मया व अलफ.
जमादिलाखर २७.

इसलामपुरास गुराचें वलीत करावयास आला होता त्यासी तुह्मीं नतीजा दिला. यावरून स्वामी तुह्मावरी संतोषी झाले. तुमचें उर्जीत जाहलें, पत्रें.

---

proved. He was informed that the enemy had come to the Government province, that he was attacked and forced to return.

(11) Sekh Mahomed Safi wrote to the Raja stating that Bajirao Pradhan and the Sar Laskar met each other on Saturday, that they then encamped at Ashtami, that on Sunday Bajirao intended staying on the banks of the Krishna and that he would pay his respect to the Raja on Monday. He was informed that the arrangement was approved and that Bajirao should come for a visit to the Raja on Monday.

A. D. 1724-25.

(12) Kanoji Bhosle was informed that a war had ensued between Nizaman-muluk and Shahamat-khan and was directed to hold his army in readiness and to remain neutral.

A. D. 1724-25.

(13) Bapuji Rayaji and Sidoji Thorat were congratulated upon their successfully repulsing the Mogul of Miraj who intended to forcibly remove cattle from Islampur.

A. D. 1724-25.

१ बापूजी रायाजी. १ सिदोजी थोरात. एकूण २.

[ १४ ] किता पत्रें सेनापती व सरलष्कर यास पत्रें जे तुह्मांस कितेक मनसुबीयाचे आज्ञा कर्तव्य तें करून राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधी याचा व तुमचा एक बेत करून दिला आहे. प्रस्तुत विजयादशमीचे मुहूर्तें पंडित मशारनिल्हे यास आज्ञा देऊन स्वामी रवाना करतील. तुह्मीं आपले फौजेचा गाहा करून विजयादशमीचे मुहूर्तें स्वार होऊन पंढरपूरचे रोखें येणें. राजश्री पंत प्रतिनिधी यास सामील होऊन याचे विचारें वर्तोन स्वामीकार्य करणें पत्रें.

इ. स. १७२५-२६.
सित अशरीन मया व अलफ.
मोहरम. ८.

१ सेनापती. १ सरलष्कर. एकूण २.

[ १५ ] किता पत्रें तुह्मांकडून विनंतीपत्रें येत नाहींत, कोठपर्यंत गेला काय मनसुबा कारितां हें कळत नाहीं, ऐशास तुह्मीं सरकार कुलअखत्यारी सेवक ८।४ रोजीं वार्तिकासमागमें हुजूर विनंतीपत्र पाठवून आपलें कुशल मनसुबीयाचा अर्थ, स्वामीस विदीत करावा हें उचित आहे, ऐसें असोन गेलीयादारभ्य विनंतीपत्र पाठविलें नाहीं, यावरून अपूर्व भासतें. याउपरी कोठपर्यंत गेला, काय विचार कारितां, पुढें मनसुबा कराल तो दिनप्रतीनें स्वामीस लिहून पाठवीत जाणें पत्रें.

इ. स. १७२५-२६.
सित अशरीन मया व अलफ.
रजब २७.

१ बाजीराऊ प्रधान. १ प्रतिनिधी. १ सरलष्कर. १ त्र्यंबकराऊ दाभाडे.=४.

[१६] किता राज पत्रें सरदारांनीं लष्कर.

इ. स. १७२५-२६.
सित अशरीन मया व अलफ.
साबान १६.

---

(14) The Senapati and the Sir Laskar were informed that Shriniwas Pandit Pratinidhi would start on the Dasara holiday and that they should proceed with their armies towards Pandharpur and join him. They were entrusted with certain projects which are not mentioned.

A. D. 1724-26

(15) Bajirao Pradhan, Pratinidhi, Sir Laskar, and Trimbakrao Dabhade were taken to task for not reporting their movements to the Raja. They were directed to write in detail from to-day as to how far they had proceeded and what plans they had made for the future.

A. D. 1725-26

(16) Sidhoji Thorat and Kaloji Bhosle were informed that Government had their interest at heart, and were ex-

A. D. 1725-26.

१ सिदोजी थोरात यास पत्र जे तुमचे एकनिष्ठतेचे अर्थ राजश्री खंडो बल्लाळ चिटणीस यांणीं विदित केला. तुह्मीं २।३ विनंतीपत्रें पाठविलीं व महादाजी जाखदेव तुह्मांकडून आले. त्यांनीं तुमचें वर्तमान विदीत केलें. ऐशास तुमचे मनोदयानुरूप चालवावें, उर्जीत करावें हा अभिमान स्वामीस आहे मागती खंडोबा पाठविले आहे तो, मिरजकर, तुह्मी, वरकड अउवे एकत्र होऊन गनिमाचा शह राखोन स्वामीस संतोषातें पाववणें. समाधानपत्रें सरदार लष्कर.

४ तुह्मी अउघे एकत्र होऊन गनिमाचा शह राखणें.

१ काळोजी भोसले.

१ किता पत्र काळोजी भोसले पद्माजी जाचला आपणाजवळ आहे एकनिष्ठेनें सेवा करितात. त्याचा सरंजाम वराडप्रांतें आहे. त्याचीं ताकीदपत्रें देविलीं पाहिजे ह्मणून लिहिलें त्यावरून ताकीदपत्रें देविलीं आहेत. ते तुह्मीं राजश्री खंडोबाचे आज्ञेत वर्तोन स्वामीकार्य करणें.

१ पद्माजी जाचला यास समाधानपत्र.

१ दुर्गोजी भोइटे यास गनिमानीची अवई आली यांनीं तुह्मीं एकत्र होऊन गनिमाचा शह राखणें.

—
४

इ. स. १७२५--२६.
सित अशरीन मया व अलफ.
जिल्हेज २४.

[१७] राजश्री निळकंटराऊ जाधव यास नवाब निजाममुलुख याणीं कैदेंत ठेविलें आहे, तुह्मीं त्या प्रांतीं गेलिया उपरी त्याची मुक्तता होई तो अर्थ करणें पत्रें.

१ पिलाजी जाधव. १ बाजीराऊ प्रधान.=२

[१८] राजश्री कानोजी आंग्रे यास पत्र जे शामलाचा जमाव पालगडाखालीं येऊन राहिला आहे. दंगा करणार आहेत, तरी तुह्मी पालगडची कुमक करणें ह्मणून पत्र.

इ. स. १७२६--२७.
सित अशरीन मया व अलफ.
रजब १०.

---

horted to join the Mirajkar and all the other Sirdars, and to keep the enemy in check.

(17) Pilaji Jadhava and Bajirao Pradhan were directed on their going to the territory of Nizam-ul-Muluk to secure the release of Nilkantrao Jadhava, who was kept in confinement by that Prince.

A. D. 1725-26.

(18) The army of Shamal (of Janjira) had assembled below the fort of Palgad and intended to attack it. Kanoji Angria was directed to send assistance to the fort.

A. D. 1726-27.

[ १९ ] किता पत्रें राजश्री बाजीराऊ प्रधान व राजश्री खंडेराऊ दाभाडे सेनापती यांस पत्रें जे कितेक मनसुबाचा अर्थ अलाहिदा स्वस्ताक्षरपणीं लिहिला आहे, याउपरीं दिसगत न लावितां अतिसत्वर फौजेची तयारी करून विजयादशमीच्या मुहूर्ते उभयतां स्वार होऊन पंढरपूरचे रोखें येणें. कितेक मुखवाचेनें मिरधे सांगतां कळेल. पाठविले आहेत यास खर्चास प्रविष्ठ करणें.

इ. स. १७२६–२७.
सबा अशरीन मया व अलफ.
सफर ५.

राजश्री प्रधान याजकडे तुलाराम मिरधे याजबराबर पत्र पाठवून खर्चास देविले रु. १००.

सेनापतीकडे शाहा महमद मिरधे याजवळ पत्रें देऊन पाठविले यास खर्चास देविले रु. १००.

इ. स. १७२६–२७.
सबा अशरीन मया व अलफ.
मोहरम ६.

[ २० ] राजश्री रायाजी जाधवराव यासी पत्र जे तुह्मांस फौजेनिसीं रहिमतपुरावरी जावयाची आज्ञा केली आहे, देखत आज्ञापत्र फौजेनिशीं रहिमतपुरावरी जाणें.

## चिठीमसाले.

इ. स. १७२६–२७.
सबा अशरीन मया व अलफ.
साबान १.

[ २१ ] बदल देणें वेतनात हुजरे कामगारी लष्करचे सरदारास पत्रें पाठविलीं जे फौजेनिशीं हुजूर येणें ह्मणून आज्ञापत्रें पाठविलीं यांस वेतनांत रुपये.

रायाजी जाधवराव सरदार लष्कर यांजकडे हुजरे पाठविले यांस देविले रुपये ५० कान्होजी आंगरे ३० रुपये.

देवजी सोमवंसी सरदार लष्कर यांजकडे पाठविले यांस देविले रुपये ५० जोगोजी जाधव ३० रुपये.

---

(19) Bajirao Pradhan and Khanderao Dabhade Senapati were written to, by the Raja in his-hand-writing in regard to certain state-matters and were directed to start with their armies towards Pandharpur on the Dasara festival.

A. D. 1726-27

A. D. 1726-27.

(20) Rayaji Jadhavrao was directed to proceed at once with his army to Rahimatpur.

[21] Rayaji Jadhavrao, Kanoji Angria, Dewaji Somavanshi and Jogoji Jadhava were ordered to come to the Huzur with their armies.

A. D. 1726 27.

[ २२ ] राजश्री सुलतानजीराव निंबाळकर सरलष्कर यास पत्र जे राजश्री बाजीराव पंडित प्रधान व सेनापती फौजेनिशीं दक्षण प्रांतीं मसलतीस गेले आहेत तरी या प्रांतीं धामधुमेचा प्रसंग आहे तरी दोन हजार स्वार चांगले हुजूर पाठवून देणें ह्मणून पत्र.

इ. स. १७२६--२७.
सबा अशरीन मया व अलफ.
रबिलाखर ४.

[ २३ ] राजश्री फत्तेसिंग बावा व नारोराम मंत्री उभयतां कलबर्गे प्रांतीं जाऊन राजश्री चिमणाजीपंत यांसी सामील करून त्याचे तो राजश्री कानोजी भोसले यासी ऐवजखान याचे फौजेनें पिटून अलंद प्रांत बालाघाट येथें आणिले तो राजश्री चिमणाजीपंत जाऊन सामील केले हें वर्तमान मोगलास कळतांच ते माघारे गेले. आपणही जाऊन त्यास सामील करून घेतों. ह्मणून लिहिलें त्यावरून आज्ञा जे, राजश्री कानोजी भोसले याचें बहुत प्रकारें समाधान करणें. सरंजामाचीं पत्रें राजश्री बाजीराव प्रभु व बापूजी प्रभु याबराबर पाठविलीं आहेत. तुम्हीं व ते मिळोन फौज मातबर झाली आहे तरी त्या प्रांतींचा मनसुबा सिद्धीस पावून येतेसमई दर्शनास बरोबर राजश्री कानोजी भोसले यास घेऊन येणें त्याप्रमाणें पत्रें.

इ. स. १७२६--२७.
सबा अशरीन मया व अलफ.
जमादिलाखर २०.

१ राजश्री नारबा. १ राजश्री फत्तेसिंग बावा. १ कानोजी भोसले. १ चिमणाजी पंडित.
१ जिवनराव शंकर याना जाब. एकूण ५.

[ २४ ] राजश्री कान्होजी भोसले यास राजपत्र जे तुह्मीं राजश्री चिमणाजीपंतास भेटलेस ह्मणून लिहिलें. उत्तम केलें. चंद्रसेन याचा फितुर मोडून दर्शनास हुजूर येणें. सरंजामाच्या सनदा राजश्री बाजीराव व महादेव बापुजी

इ. स. १७२६--२७.
सबा अशरीन मया व अलफ.
जमादिलाखर २४.

(22) Sultanjirao Nimbalkar was informed that Bajirao Pandit and the Senapati had gone with their army on a campaign in the South, and was directed to send 2000 thousand swars to the Huzar as there was a likelihood of a disturbance in the country.

A. D. 1726-27.

(23) Fatesing Bawa and Naro Ram Mantri intended to proceed to Kulburga District and join Chimnaji Pant. In the meanwhile Kanoji Bhosle was routed by the army of Aiwaj Khan and driven into Aland in Prant Baleghat. Chimnaji Pant joined him there. The Moguls on getting this information retreated. Fatesing and Mantri informed the Raja that they also wished to proceed for Kanoji's assistance. They were directed to console Kanoji for his defeat and bring him to the Huzur. They were also instructed to successfully carry out, with the assistance of Bajirao and Bapaji Prabhu, the project for which they had been sent to the South.

A. D. 1726-27.

[24] Kanoji Bhosle was to put down the insurrection of Chandrasen and to repair to the Huzur.

A. D. 1726-27.

प्रभु यांजबरोबर पाठविल्या आहेत तर योजिला मनसुबा सिद्धीस पावून दर्शनास येणें. स्वामी तुम्हांवर संतोषी होतील.

१ पत्र कान्होजी भोसले. १ नारोराम मंत्री. १ फत्तेसिंगबावा. एकूण ३.

[ २५ ] *किता राजपत्र चंद्र मजकूर ऐसीजे राजश्री बाजीराऊ प्रधान व राजश्री खंडे-*

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
साबान ६.
१६-२-१७२७

राऊ दाभाडे सेनापती दक्षण प्रांतास गेले आहेत, सांप्रत मनसुबीयाचा प्रसंग प्राप्त झाला आहे; त्यास राजश्री प्रधान व सेनापती यांसी पत्रें पाठवून या प्रांतें यावयाची आज्ञा केली आहे. अविलंबेकरून त्याचें आगमन होईल, परंतु पोक्ते फौजेचा गाहा करून मनसुबा करावा लागतो. तुम्हीं उभयतां मशारनिल्हेचे ताबीन आहां. निष्ठेनें सेवा करिता याणेकरून स्वामी तुम्हांवरी संतोषी आहेत. आणि तुम्हांस फौजेनिशीं यावयाची आज्ञा केली आहे. तरी तुम्हीं फौजेनिशीं या प्रांतास देखत आज्ञापत्र स्वार होऊन येणें, विलंब न करणें. पत्र १.

उदाजी पवार दिमत प्रधान. १ दिमत सेनापती. १ कंठाजी कदम. १ पिलाजी गायकवाड. एकूण ३.

[ २६ ] राजश्री कान्होजी भोसले यांस पत्र जे तुम्हीं पत्र पाठविलें वर्तमान विदित जालें.

इ. स. १७२६--२७.
सबा अशरीन मया व अलफ.
साबान ८.

आपण मळे खेडावरी गेला होतां, परंतु चंद्रसेन बाहीर निघाला नाहीं याकरितां तेथून कूच करून कलबरगे परगणीयांत आला. या प्रांतीं चालोन आले तरी त्यास नतीजा देतों म्हणून लिहिलें विदित झालें. निजामनमुल्क पुढें आला आहे त्याचे बातमी बारीक चौकशीनें राखोन तुम्हीं व चिमणाजीपंत व नारोराम मंत्री ऐसे एका विचारें राहोन जो मनसबा करणें तो जारी करावा. आमित्राचा उपमर्द होय तो अर्थ करणें. आपण सनदा पत्राविशीं लिहिलें तरी राजश्री

(25) Bajirao Pradhan and Khanderao Dabhade were in the South with their armies. They were recalled as there was likelihood of a disturbance in the country. Udaji Pawar, who was in the Pradhan's service, and Kataji Kadam, and Pilaji Gaikwad, who were in the Senapati's service, were also directed to proceed to Satara with their armies.

A. D. 1726-27.

(26) Kanoji Bhosle wrote to inform the Raja that he attacked Malkheda, but retreated and marched to Kulburga, as Chandrasen did not turn out. He was informed that Nizaman-Muluk was proceeding onwards and that he, Kanoji, should keep a watch on his movements, and act in concert with Chimnaji Pant and Naro Ram Mantri.

A. D. 1726-27.

बापुजी प्रभु यांजबरोबर सनदा पाठविल्या आहेत. जमनाजी महाडीक याचे गांवाविशीं लिहिलें तरी त्याचें स्वामीस अगत्य आहे गांवास उपसर्ग लागणार नाहीं.

[ २७ ] जाबखानगौडा देशमुख परगणे लक्ष्मेश्वर व राजश्री सुरेराव लिंकदेऊ यास पत्रें जे तुह्मीं विनंतीपत्रें पाठविलीं अभिप्राय कळों आला. नबाबानीं आपणावरी बहुत अतीशय मांडला आहे. परगणे मजकुरीं गावगन्ना ठाणीं घालावयाचा उद्योग करितात. तरी स्वामीनीं आपलें साहित्य करून स्थलरक्षण होय तें केलें पाहिजे ह्मणून लिहिलें. ऐशास तुमचा अभिमान पूर्वीपासून स्वामीस आहे. त्या प्रांतीचे बंदोबस्त कर्तव्य आहे याबद्दल राजश्री बाजीराऊ प्रधान व खंडेराऊ दाभाडे सेनापती व सुलतानजीराऊ निंबाळकर सरलष्कर यांस फौजा आणावयाची आज्ञा केली आहे. तुह्मीं प्यादे जलद जमाव करून नबाबास आपल्या स्थळामध्यें पराश्रम होऊं न देणें. दसरीयाकारणें स्वामी फौजा रवाना करतील.

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
जिल्हेज १...

१ खानगौडा १ सुरेराऊ लिंकदेऊ.

[ २८ ] राजश्री चिमणाजी पंडित राजाज्ञा यास पत्र जे तुम्हीं मनसबा काय करितां चंद्रसेन जाधव पाराशराकडे गेले ह्मणून हुजूर वर्तमान आलें तुह्मीं कांहीं लिहिलें नाहीं. हा कोण विचार, याउपर चंद्रसेन व पांढरे यांचें वर्तमान लिहिणें व मनसबा काय करीन अहां तें लिहिणें. जमाव करून फौज दहा हजारपावेतों फौजबंदी करणें. निजामनमुलुक याचे भेटीस जाऊन भागानगर प्रांतींचा तह करून घेणें.

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
जिल्हेज ११.

---

(27) Jabkhan Gauda Deshmukh of Pargane Laxmeshwar and Surerao Linkdeo wrote to say that they were much molested by the Nawab Nizaman-Mulak that he wished to establish his authority in the province and prayed that assistance might be sent to them for the protection of their territory. They were informed that Bajirao Pradhan, Khanderao Senapati and Sultanjirao Nimbalkar Sir Laskar were ordered to proceed with their armies and that they would start on Dasara festival. In the meanwhile the Deshmukhs were asked to collect their men and to prevent the Nabob from entering their province.

A. D. 1726-27.

(28) Chimnaji Pandit Rajdurga was informed that news had reached the Raja about Chandrasen's going to Parashar, and was reproved for not communicating the news himself. He was direcred to collect 10000 men, to pay a visit to Nabob Nizaman-Muluk and to get the terms about Bhagnagar Prant setteld.

A. D. 1726-27.

[ २९ ] परवानगी महाराजांनीं जगन्नाथास दिली. रमाजी हसन चोपदार दिमत तुळाराम मिर्धा राजश्री बाजीराव यास पत्र जे निजामनमुलुक याचे लष्करचे बातमीचें वर्तमान वरचेवर तुह्मांस लिहिलें आहे त्यावरून कळलें असेल आणि एक बातमी आली कीं धारुरीहून तीन-मजली अलीकडे आला. घाटापासून पांच सहा कोस वर आहे ह्मणून वर्तमान आलें असे. गनिमानें जलदी काढली आहे, तुह्मीं त्यांचे शहरावरी जावयाचा उद्योग केलाच असेल. प्रस्तुत कोठपर्यंत गेलां, विचार काय करितां, फौज किती आहे हें लिहिणें. अविलंबें निजामनमुलुक व सबाजीराव याचे पिछावर येऊन पायबंद देणें. सदरहूप्रमाणें खंडेराव यास पत्र असे.

इ. स. १७२७--२८.
समान अशरीन मया व अलफ.
र.विलावल २.

✓ [ ३० ] सरदारांस पत्रें पाठविलीं कीं, आपलाल्या फौजांनिशीं किलीजखान मोगल याचे पिछावर येऊन पायबंद देऊन नतीजा पोहचावून स्वामी तुह्मांवरी संतोषी होत ते गोष्ट करणें. या कामास जासूद लोक दिमती लबे पाठविले पत्र वेतनांत देविले रुपये:—

इ. स. १७२७--२८.
समान अशरीन मया व अलफ.
र.विलावल ८.
१३-१०-१७२७

कानोजी आंग्रे. रायाजी जाधव. कानोजी भोसले. दावलजी सोमवंशी. कंठाजी कदमराऊ. पिलाजी जाधव.

[ ३१ ] देवजी सोमवंशी हिंदुराऊ मोगलाचे कहीवर संताजी घोरपडे पाठविले त्यांणीं कहीवर घातलें. घोडीं घेतलीं. ५।७ माणुस जखमी केले ह्मणून लिहिलें. उत्तम केलें. तुमचे सेवेचा मजुरा जाला. तुह्मीं पत्र पावतांच हुजूर येणें.

इ. स. १७२७--२८.
समान अशरीन मया व अलफ.
रजब १९.

---

(29) The Raja wrote to Bajirao that news had reached him that Nizaman-Muluk had come three stages beyond Dharur and that he was within 5 or 6 Kos of the Ghats. The Raja expressed a hope that steps had been taken by Bajirao to attack the city [of Hydrabad] and requested him to state how far he had proceeded, what plans he had formed and what army he possessed.

A. D. 1727-28.

(30) Kanoji Angria, Dawalji Somawanshi, Pilaji Jadhav and other Sirdars were directed to attack the rear of Kilij-khan Mogul and to distract him.

A. D. 1727-28.

(31) Dawalji Somawanshi reported that Santaji Ghorpade was sent against the advanced party of the Mogul and that he repulsed it and wounded five or six men. He was thanked for his conduct.

A. D. 1727-28.

[ ३२ ] राजश्री शिदोजीराऊ निंबाळकर याचे पत्राचे जाब जे तुम्हीं पत्र पाठविलें

इ. सं. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
जिलकाद ११.

प्रविष्ट जालें. लिहिलें कीं, गनीम धारुरात आहे. या प्रांतें चारा जाला आहे अशा प्रसंगांत फौजा आलियानें कितेक लोक बरोबर आहेत ते पदरीं पडतील ह्मणून लिहिलें तरी तुम्हीं विचार लिहिला तो उत्तमच आहे. मनसुबा करणें तो करून चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोसले याची रवानगी त्या प्रांतें केली जाइल. तुम्हीं गनिमाची खबर वरचेवर लिहून पाठवीत जाणें. पत्र १.

इ. स. १७२७-२८.
समान अशरीन मया व अलफ.
जिल्हेज २३.

[ ३३ ] कितापत्रें राजश्री पंत प्रधान व सेनापती यासी जे तुम्हीं उभयतां पोख्ती फौज करून स्वामीकार्य करणें ह्मणोन पत्र. १ राजश्री बाजीराव प्रधान. १ राजश्री खंडेराव दाभाडे सेनापती.

इ. स. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
रजब १९.

[ ३४ ] साबाजी नाईक निंबाळकर यांस पत्र इंदापूरचे ठाणेंचें वर्तमान लिहिलें कळों आलें. तुह्मां ममतेचे लोक असोन ठाणें गनिमास हस्तगत जालें आहे. तुह्मीं ठाणेचे खटपट करून ठाणें हस्तगत करणें.

इ. स. १७२७-२८.
समान अशरीन मया व अलफ.
रजब २२.

[ ३५ ] जाब महादाजी नाईक निंबाळकर तुह्मीं पत्र पाठविलें वृत कळों आलें. ऐशास प्रस्तुत गनीम निघोन गेला त्याचे पिछावर फौज रवाना केली आहे. तुह्मीं यांतर्ते नाहीं. पुढें आज्ञा करणें ते करवेल.

---

(32) Shidojirao Nimbalker suggested that as the enemy was in Dharur, an attack against him would bring over many persons to the side of Government. His suggestion was approved and he was directed to arrange accordingly. Fatesing Bhosle was to be sent to the Province for his assistance.

A. D. 1727-28.

(33) The Pant Pradhan and the Senapati were directed to collect a large army and to carry out the object the Raja had in view.

A. D. 1727-28.

(34) Sabaji Naik Nimbalkar reported that the Thana of Indapur was taken by the enemy. He was exhorted to take it back.

A. D. 1727-28.

(35) Mahadaji Naik Nimbalkar was told that the enemy had retreated, and that an army was sent to pursue him, and was directed not to leave his station.

A. D. 1727-28.

[ ३६ ] राजश्री दौलतराऊ शिर्के याचा जाब आज्ञा होईल तर दर्शनास येतों ह्मणून लिहिलें तर प्रस्तुत निजामनमुल्क याचे पिछावरी राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधी यांसी रवाना केले असेत. तरी तुह्मीं आपल्या जमावानिशीं पंडित मशारनिल्हेस सामील होऊन स्वामीकार्य करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
रजब २३.
23.2.1728

[ ३७ ] राजश्री कान्होजी भोसले यांमी पत्रें जे प्रधान व सेनापती सरलष्कर वरकड फौजा गुजरात कुली एकत्र होऊन निजामनमुल्क याच्या तोंडावरी आल्या. तुह्मीं त्यास सामील होऊन गनिमास नतीजा देणें. पत्रें राजश्री स्वामींचे दस्तकाचें निशाण.

इ. स. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
साबान १.
2-3-1728

१ राजश्री कानोजी भोसले. १ बापुजी सोनाजी.

[ ३८ ] राजश्री माधवराव गणेश मुतालीक दिमत राजाज्ञा यांसी फौजेनिशीं त्या प्रांतें पाठविले आहेत तर तुह्मीं यास आपले जमावानिशीं सामील होऊन एकामतें वर्तोन स्वामीसेवा करणें.

इ. स. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
साबान १.

१ साबाजी नाईक निंबाळकर. १ माहादाजी नाईक निंबाळकर. १ चिमणाजी बल्लाळ. १ माधवराव गणेश. १ नागोजी घाटगे. १ दुर्गोजी माहाडीक.

✓ [ ३९ ] रघोजी कदम यास पत्र जे तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. लिहिला अभिप्राय कळों आला. सांप्रत तांब्रानें बहुत वळवळ आरंभिली आहे. काळोजी जाधव व जोगोजी जाधव परगणीयांतून येऊन निगोन नजीक वडझिरेवरी येऊन राहिले होते. त्यावरील तुरुक ताजखान

इ. स. १७२७-२८.
समान अशरीन मया व अलफ.
जिल्काद १.
10-6-1727

---

(36) Doulatrao Shirke asked permission to come to the Huzur for an audience. He was informed that Shriniwas Pandit Pratinidhi was sent to pursue Nizaman-Muluk, and that he (Doulatrao) should join him.

A. D. 1727-28.

(37) The Pradhan, the Senapati and the Sir Laskar and others had proceeded against Nizaman-Muluk. Kanoji Bhosle was directed to join them.

A. D. 1727-28.

(38) Madhavarao Ganesh, Mutalak of the Rajadaya, was sent with an army and Ghatge, Nimbalkar and other sirdars were directed to join him.

A. D. 1727-28.

(39) The *Tambras* [Mahammadans] were disturbing the country in various ways. Turuk Tajkhan and other Moguls who had come to Parner, made a sally upon Kaloji

A. D. 1727-28.

व आणखीं मोंगलाची फौज शहरांतून पारनेरास आली होती. त्याणीं याची पाळत ठेवून याजवरी छापा घातला. खासा उभयतां सांभाळून निघाले. वरकड घोडीं बैल नेलीं ह्मणून तपासिलें लिहिलें विदित जालें. पुढें तुरुक ताजखान कोणीकडे गेला हें लिहिणें. तुह्मीं सावध राहोन गनिमाची खबर वरचेवरी लिहीत जाणें पत्र १.

[ ४० ] राजश्री माणकोजी बांडगर याचा जात्र पाम नाइकाकडील मलिकखानास नतीजा दिल्हा बरी गोष्ट केली. मेवेचा मजुरा जाला. निजामनमुल्क याणें आपणावरी फौज रवाना केली आहे त्याचाही हिसाब धरीत नाहीं. आपणास सामील व्हावयास सरदारांस पत्रें पाठवावीं तरी पूर्वीं पत्रें पाठविलीं आहेत. पावलींच असतील. बुबाजी मोहिते व गोंदाजी देवकाते सामील जाले बरें जालें. वरकड सरदारांस सामिल करून घेऊन गनीम आला तर नतीजा देणें. चिरंजीव फत्तेसिंग याचेही रवानगी लौकरच होईल. सविस्तर त्याणीं लिहिलेवरून कळों येईल.

इ. स. १७२७-२८.
समान अशरीन मया व अलफ.
जिल्हेज ३.

[ ४१ ] बाजीराव पंडित प्रधान यास पत्र जे--कानोजी भोसले यासी भेटीचा संदर्भ करून संताजी आठले व भिवजी काकडे यांस पुढें पाठविले त्याशीं त्यांणीं कलह केला ह्मणून लिहिलें तर वराडप्रांतीं न जावें ऐशी तुह्मां आज्ञा होती. बरें होऊन गेलें त्यावर नव जावें. प्रस्तुत राजश्री येशवंतराव व बापुजी प्रभु स्वामीसंनिध आले आहेत. कानोजी भोसले हुजूर-

इ. स. १७२८--२९.
तिसा अशरीन मया व अलफ.
रजब ३३.

Jadhava and Jogoji Jadhava, who had encamped at Wadzire. Kaloji and Jogoji escaped. But their horses, bullocks &c were taken away. Raghoji Kadam communicated this news to Government. He was asked to report where Turuk TajKhan had gone and was directed to be on his guard.

( 40 ) Mankoji Bandgar was thanked for his repulsing Malik Khan in the service of Pam Naik. Mankoji wrote to say that Nizaman-Muluk was about to send an army against him and that other Sirdars might be directed to render him assistance. He was informed that orders had been issued, as desired by him, that Bubaji Mohitye and Gondaji Deokate had probably joined him and that Fatesing Bhosle would soon proceed to that province.

A. D. 1727-28.

( 41 ) Bajirao Pandit wrote to inform the Raja that on his sending Santaji Athole into the territory of Kanoji Bhosle, a dispute took place between Athole and Bhosle. Bajirao was reminded that he was warned against going into that territory.

A. D. 1728-29.

दर्शनास येतात. तुम्हीं वराडप्रांतीं धामधूम न करणें. बुंदेलखंडास जावयाचा विचार केला ह्मणून लिहिलें (फाटलें आहे) दीन प्रतिदीन फत्ते वर्तमान लिहीत जाणें ह्मणून जाब १.

इ. स. १७२९-३०.
सलासीन मया व अलफ.
रविलाखर २.
१४-१०-१७२८

[ ४२ ] संभुशिंग जाधव यास पत्र जे तुह्मीं फौजेनिशीं पनाळे प्रांतें येणें. या कामास केदारजी निकम व शिवाजी सांवत जासूद दिंमत लबे पाठविले यासी रुपये १०.

माणकोजी बांडगर अमीरल उमराव यासी जे तुम्हीं फौजेनिशीं स्वामीसंनिध येणें. या कामास केदारजी निकम व निंबाजी सांवत जासूद दिमत लबे पाठविले यासी रुपये १०.

राजश्री दावलजीराव सोमवंशी सरलष्कर स्वामींचें कूच कार्तिक शुद्ध पंचमीचें आहे. तुह्मीं फौजेनिशीं अविलंब येणें. या कामास सुभानजी साळोखा व केदारजी काळा जासूद दिमत लबे पाठविले यासी रुपये २०.

सिदोजीराव निंबाळकर यासी पत्र जे अविलंबें फौजेनिशीं येणें. या कामास सुभानजी साळोखी व केदारजी काळा जासूद लबे यासी पाठविले देणें रुपये ३०.

१६-१०-१७२८

राजश्री सखोजी आंग्रे यासी पत्र जे स्वामींचें कूच कार्तिक शुद्ध पंचमीचें आहे तरी तुह्मीं फौजेनिशीं स्वामीसंनिध पनाळेखालीं येणें. गोलंदाज ४ घेऊन येणें. या कामास हरजी मोरे व सुभानजी शिंगटे जासूद दिमत लबे यासी रुपये ३०.

इ. स. १७२९-३०.
सलासीन मया व अलफ.
रविलाखर ३.
१५-१०-१७२८

[ ४३ ] स्वामी पनाळे प्रांतीं मसलत मोहिमेस जातात तर फौजेनिशीं पत्रदर्शनीं स्वार होऊन हुजूर येणें एकवडीचा दिरंग न लावणें ह्मणून.

१ काळोजी भोसले. १ देवजी सोमवंशी १ मालोजी पवार. १ कृष्णाजी पवार.

---

With respect to Bajirao's proposal to go to Bundelkhand, he was directed to write about his movements from day to day.

(42) Mankoji Bandgar Amiral Umarao, Dawaljirao Somawanshi Sir Laskar, Sidejirao Nimbalkar and Sakhoji Angria, were directed to come to the Huzur with their armies, as the Raja was to start on the 5th of the bright half of Kartik. Sambhusing Jadhavrao was directed to join the Raja with his army in the province of Panala.

A. D. 1729-30.

(43) Kaleji Bhosle and other Sirdars were invited to the Huzur with their forces, as the Raja intended to lead a campaign against the territory of Panalla.

A. D. 1729-30.

इ. स. १७२९--३०.
सल्लसांन मया व अलफ.
जमादिलाखर २६.
5-1-1730

[ ४४ ] किता पत्रें राजश्री श्रीनिवास परशराम पंडित प्रतिनिधि यांस नबाब निजामनमुलुक याकडे रवानगी केली याबद्दल पत्रें दिधलीं.

## चिटनिशी पत्रें.

राजश्री संभुसिंग जाधव यास पत्र कीं तुह्मांविशीं राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि याणीं विनंति केली, त्यावरून तुह्माविशीं यांस आज्ञा करणें ते केली आहे. तुह्मीं फौजेनिशीं यास सामील होऊन स्वामीसेवा करणें. मशारनिल्हे तुह्मास सांगतील तें स्वामीचीं वचनें जाणोन यासमागमें दर्शनास येणें. स्वामी तुह्मांस सरंजाम देऊन ऊर्जित करतील ह्मणून पत्र १.

राजश्री माधवराऊ पिंगळे यास पत्र कीं राजश्री फत्तेसिंग भोसले याणीं -महाल मुकार उठाऊर प्रांतें तुह्मांस पाठविलें आहे, ऐशास नबाब निजामनमुलुक याकडे राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि यांस रवाना केलें आहे तरी तुम्हीं प्रांतमजकुरीं धामधुम न करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७२९-३०.
सलासीन मया व अलफ.
रजब २१.
9-2-30

[ ४५ ] राजश्री बाजीराव पंडित प्रधान व पिलाजी जाधवराव यांसी पत्र जे स्वामींचें कूच होऊन उंबरजेवरी मुक्काम झाला तरी तुह्मीं पत्रदर्शनीं स्वार होऊन येणें ह्मणून.

१ प्रधान पंतास पत्र. १ पिलाजी जाधवराव यास.

इ. स. १७२९-३०.
सलासीन मया व अलफ
साबान ९.
16-2-1730

[ ४६ ] राजश्री त्रिंबकराव दाभाडे सेनापती याचा जाब कीं तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें प्रविष्ट झालें. आपण व घोरपडे व सरलष्कर त्रिवर्ग एकत्र होऊन हेरलेवरी जाऊन हेरलें घेतलें. वाडा मात्र राहिला तोही घेतों ह्मणून. तरी वाडा घेऊन कोल्हापुराभोंवते राहून चव्हाणास तंबी पोहचवणें त्यांस नम्र जाणें ह्मणून पत्र. निशाण राजहस्ताक्षर १.

---

(44) Shriniwas Parshuram Pratinidhi was sent to Nabob Nizaman-Muluk. A letter was also written to Sambhusing Jadhav desiring him to join the Pratinidhi and promising the grant of a saranjam.

A. D. 1729-30.

(45) Bajirao and Pilaji Jadhavrao were informed that the Raja had left Satara and had encamped at Umbraj, and were directed to repair to that place at once.

A. D. 1729-30.

(46) Trimbakrao Dabhade wrote to say that he, Ghorpade and Sir Laskar, had joined to-gether and had captured Herle and that the palace which alone had remained in the

A. D. 1729-30.

इ. स. १७३०--३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
मोहरम ७.
12-7-1730

[ ४७ ] संभाजी आंग्रे यास पत्र जे तुह्मीं विशाळगडावाले चौकी बसविली आहे ह्मणून वर्तमान आईकोन स्वामी संतोषी जाहले. चौकी जबरदस्त बसवून गडावर दाणा एकंदर जाऊं न देणें ह्मणून पत्र १. मसाला रुपयेः—

१० रात्रो महादेव. १० तुकोजी कदम. एकूण २०.

इ. स. १७३०--३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
रबिलाखर १५.
17-10-1730

[ ४८ ] राजश्री शिदोजीराव निंबाळकर यासी पत्र जे तुह्मांस दोन तीन पत्रें पाठविलीं परंतु अद्यापि आले नाहीं. राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि विशाळगडास हस्तगत करायास गेले त्यासमागमें फौज गेली. येथें स्वामीबरोबर फौज असली पाहिजे तरी फौजेनिशीं येणें. या कामास आवजी पिंगळे व गोंदाजी जाधव दिमत हुजुर पाठविले यासी मसाला रुपये २९.

इ. १७३०--३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
जमादिलावल १४.
14-11-1730

[ ४९ ] किता पत्रें सरदारांस जे राजश्री सवाई कटसिंग कदमराऊ याणीं खानदेश प्रांतें रोख पत्र करून धामधूम मांडिली आहे. राजश्री बाजीराऊ पंडित प्रधान याचे फौजेशीं कटकट करणार ह्मणून विदित जालें, तरी त्यास मुलखांत धामधुम करावयास प्रयोजन काय आहे. याउपर त्यास ताकीद करून मुलखांत धामधुम करूं न देणें व प्रधान पंतांचे फौजेशीं कटकट होऊं न देणें ह्मणून पत्रेंः- -

१ राजश्री त्रिंबकराऊ सेनापती. १ पिलाजी गायकवाड. १ रघोजी कदमराऊ. एकूण ३.

---

hands of the enemy would soon be taken. He was told to remain near Kolhapur and to keep the Chavan in check.

(47) Sambhaji Angria was thanked for establishing a chowki at the fort of Vishalgad and was directed to prevent any grain finding its way into the fort.

A. D. 1730-31.

(48) Shriniwas Pandit Pratinidhi had gone with the army to take Vishalgad. As it was necessary that some force should remain with the Raja, Sidhojirao Nimbalker was directed to come to the Huzur with his army.

A. D. 1730-31

(49) The Senapati, Raghoji Kadamrao and Pilaji Gaikwad were directed to prevent Sawai Katsing Kadamrao from coming into collision with the Peshwa's army and from disturbing the country.

A. D. 1730-31.

इ. स. १७३१–३२.
इसने सलासीन मया व अलफ.
रजब ११.
9.1.1731

[ ५० ] चिटणीशी पत्रें सरदारास जे, फैज अलीखान त्या प्रांतें येऊन धामधुम करितो तरी तुह्मीं फौजेनिशीं जाऊन नतीजा पोंहोचवणें ह्मणून पत्र.

१ रत्नोजी पांढरे शाहामतमुलुक. १ माधवराव पिंगळे. १ कृष्णाजी गुणाजी मजमदार दिमत हैबतराव बांडगर. १ लुकाजी पांढरे समशेरबहादूर. १ व्यासो मुजबळराव उमदेतुलमुल्क. एकूण ५.

[ ५१ ] राजश्री देवजी सोमवंशी हिंदुराऊ याचे पत्राचा जाब कीं, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लिहिला अर्थ अवगत झाला. औरंगाबादेकडून फौजा येऊन मुलखांत उपसर्ग मांडिला आहे ह्मणून लिहिलें तर त्याची पैरवी करणें ते केली आहे. मुलीचें लग्न करून सेवेस येऊं ह्मणून लिहिलें तरी लग्नविधि करून अवश्य येणें. सरलष्करचे सरंजामाच्या सनदा राजश्री आपाजी खंडेराऊ जमेनीस घेऊन येतील. बोशग व सुकेणे या गांवाविशीं व निवोज तर्फेचे सरदेशमुखीविशीं लिहिलें तरी तुह्मीं हुजूर असतां येविशीं तुह्मांस आज्ञा करणें ते केली आहे ह्मणून छ मजकूरचें चिटणिशी पत्र.

इ. स. १७३१-३२
इसने सलासीन मया व अलफ.
साबान १०.
27.2.1731

[ ५२ ] कित्ता पत्रें सरदारास नबाब जमालुद्दीखान व राजश्री सुलतानजीराव निंबाळकर व राव रंभाजी निंबाळकर हे फौजेनिशीं त्या प्रांतें आले आहेत तरी तुह्मीं बहुत खबरदार रहाणें, बातमी राखणें, तहाप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणून पत्रें:—

इ. स. १७३१–३२.
इसने सलासीन मया व अलफ.
सवाल १०.

१ लुकाजी पांढरे समशेर बहादूर. १ रंभाजी पांढरे. १ माधवराव पिंगळे. १ चिमणाजी माणकेश्वर.

---

(50) As Faij Alikhan was molesting the province, Ratnoji Pandhare Shahamut-Muluk and other Sirdars were directed to proceed against him with their army and put him down.

A. D. 1731-32.

(51) Deoji Somavanshi Hindurao reported that forces from Aurangabad were molesting the country and that the necessary arrangements had been made by him.

A. D. 1731-32.

(52) Lukji Pandhare and others informed the Raja that Nabob Jamaluddinkhan and Sultanjirao Nimbalker and Rao Rambhaji Nimbalker had come with their forces to their territory. They were directed to be on their guard, to keep themselves informed of the Nabob's movements and to act in accordance with the treaty.

A. D. 1731-32.

[ ५३ ] राजश्री सूर्याजी पांढरे व माधवराऊ पिंगळे यांस जमावानिशीं सामील होऊन मोगलाचे शहावरी गेला ह्मणोन लिहिलें तें विदित झालें. पुढेंही चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोसले लिहितील त्याप्रमाणें स्वामीसेवा करणें ह्मणोन पत्र.

इ. स. १७३१-३२.
इसने सलासीन मया व अलफ.
साबान ९.

[ ५४ ] राजश्री आनंदराव सोमवंशी सरलष्कर व देवजी सोमवंशी यास खांस दसखताचीं पत्रें जे फौजेनिशीं हुजूर येणें. कामास हुजूर पाठविले आहेत यास उभयतांकडून देविले रुपये २९. राजश्री कृष्णाजी पवार व संताजी अटोळे यास खासदस्तकाचे जे फौजेनिशीं हुजूर येणें. या कामास खेत्राजी जाधव व शिदोजी चव्हाण व जोत्याजी माने पाठविले आहेत.

इ. स. १७३१-३२.
इसने सलासीन मया व अलफ.
साबान ९.

[ ५५ ] राजश्री आनंदराऊ सोमवंशी सरलष्कर यांस खास दस्तखताचें पत्र जे तुह्मांस राजश्री बाजीराऊ पंडित प्रधान यासमागमें जावयाची आज्ञा केली असतां तुह्मीं आणखी उद्योग धरून जात आहां ह्मणून विदित जालें. तरी हे गोष्टी कार्याची आहे ऐसें नाहीं. प्रधानपंत नवाबाकडे जात आहेत आणि तुह्मांस जावयाची आज्ञा केली असतां त्यासमागमें जाण्याचा विचार करीत नाहीं. यावरून काय ह्मणावें. हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें असे तरी पत्रदर्शनीं स्वार होऊन जाऊन पंडित मशारनिलेस सामील होणें. ये गोष्टीस उजूर कराल तरी स्वामी नाखुश होतील ऐसें समजोन वर्तणूक करणें. या कामास महादाजी बाबाजी प्रभू व पुंजाजी पवार हुके बारदार हुजरे पाठविले आहेत. यास देविले दर असामीस रुपये २९ प्रमाणें देणें रुपये ५०.

इ. स. १७३२--३३.
सलास सलासीन मया व अलफ. 29-11-1732
जमादिलाखर २१.

---

(53) Suryaji Pandhare and Madhavrao Pingle informed the Raja of their movement with their army, towards the Mogul camp. They were directed to act under the instructions of Fatesing Bhosle.

A. D. 1731-32.

(54) Letters in the Raja's own handwriting were sent to Anandrao Somawanshi Sir Laskar, Deoji Somawanshi, Krishnaji Powar and Santaji Athole, to come to the Huzur with their armies.

A. D. 1731-32.

(55) Anandrao Somawanshi Sir Laskar was asked to accompany Bajirao Pradhan who was going to the Nizam. He failed to do so. He was reprimanded for his neglect and was directed to join Bajirao at once.

A. D. 1732-33.

[५६] राजश्री रघुनाथ हरी यांस खास दस्तकाचें पत्र जे, चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोसले व राजश्री बाजीराऊ पंडित प्रधान कोंकण प्रांतें मोहिमेस पाठविले आहेत. त्यास सामील व्हावयाविशीं राजश्री सखोजी आंग्रे सरखेल यास आज्ञा केली आहे. ऐशास ये प्रसंगीं सरखेलीनी उभयतांस भेटोन आगेजणें करून स्वामीकार्य करावें. स्वामीस संतोष पावावें हें उचित आहे. त्यास कित्येक आज्ञा करून राजश्री जिवाजी खंडेराऊ चिटणीस पाठविले आहेत. तुह्मीं सरखेलीजवळ असतां ह्मणजे बरी गोष्ट होती, परंतु तुमचें येणें रत्नागिरीस जालें. विचारें पाहतां रत्नागिरीस विशेष प्रयोजन आहे ऐसें नाहीं. याकरितां स्वार होऊन सरखेलीकडे जाऊन त्यास उभयतांस सामील करणें ह्मणून पत्र सादर करून जासूद ( मजकूर लागत नाहीं. ) पाठविले. यांस देविले रुपये:—

इ. स. १७३२-३३.
सलास सलासीन मया व अलफ. २-४-१७३३
जिलकाद २८.

५ गोसाजी सावंत. ५ जिवाजी खानकर. एकूण १०.

[५७] राजश्री चिमणाजी बल्लाळ यांस खास दस्तकाचें पत्र जे सांप्रत उत्तरेकडील फौजांचा चळवळाट दक्षणप्रांतास यावयाचे उद्देशें जाला आहे ह्मणून तत्वतां वर्तमान लिहिलें आलें. ऐशास तुह्मीं त्या प्रांतास जात आहां, तिकडील खबर तुह्मांकडे येत असेल, परंतु तुह्मांस कळावें, तुह्मीं सावध असावें यास्तव हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी उत्तरेकडील बातमी चौकस राखोन जो मनसुबा कर्तव्य तो विचारें करून करणें. या कामास सुभानजी पवार जथे संताजी नाईक पवार व जोत्याजी जाधव निसबत सबनीस दिमत लबे यांस वेतनांत देविले रुपये १०.

इ. स. १७३२-३३.
सलास सलासीन मया व अलफ. १३-११-१७३२
जमादिलाखर ५.

[५८] गंगाजळ निर्मळ उमाबाई व दमाजी गाइकवाड यांस खास दस्तखताचीं पत्रें कीं राजपुरीकर हबशी अमर्यादेनें वर्तो लागला. कोंकणप्रांतें उत्पात आरंभिला. त्यास शासन केल्याविना देवब्राह्मण स्वस्थळीं राहत नाहीं ऐसें जाणोन स्वामीनीं चिरंजीव राजश्री फत्तेसिंग

इ. स. १७३३-३४.
अर्बा सलासीन मया व अलफ.
सफर ६.

(56) Fatesing Bhosle and Bajirao Pandit Pradhan were directed to proceed on a campaign in the Konkan. Raghunath Hari was ordered to induce Sakhoji Angria Sarkhel to assist Bhosle and Pradhan.

A D. 1732-33.

(57) Chimnaji Ballal was informed that news had reached the Raja that armies from the North were preparing for the South, and was desired, as he was proceeding to that territory, to be on his guard and to act with deliberation.

A. D. 1732-33.

(58) Umabai Dabhare and Damaji Gaikwad were told that the Habsi of Rajpuri having acted insolently and having oppressed Konkan, Fatesing, Bhosle, Shri-

A. D. 1733-34.

भोसले व राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि व राजश्री बाजीराऊ पंडित प्रधान यांस आज्ञा करून हबशीयावरी मोहिम करविली. रायगड आदिकरून कोंकणांतील गड कोट हबशीबाखाले होते ते हस्तगत केले. मुलूख कबज केला. राहतां एक जंजिरा व आणखीं दोनचार स्थळें राहिलीं आहेत, त्यांचीही तरतूद कर्तव्य ते करीजेत आहे. ऐशीयास हबशीयाकडील शिद्दी मसूद सुरेतेस आहे तो जमाव करून जलमार्गे जंजिरे याचे कुमकेस येणार म्हणून वर्तमान विदित झालें. तरी हबशी दुष्ट, त्याचें निर्मूल करावें हें स्वामीस परम आवश्यक. स्वामीचे आज्ञेप्रमाणें तिवर्ग साहस करणें तसा करीत आहेत. स्वामीचे पुण्यप्रतापेंकरून योजिला मनसुबा सिद्धीस पावतच आहे. जंजिरेकर हबशीयामध्यें अवसान राहिलें नाहीं; परंतु सुरेतेहून शिद्दी मसूद याचा बेत जंजिरेयाचे कुमकेस न यावें ऐसें करावें लागतें. यास्तव अज्ञापत्र सादर केलें असे. दुष्टाचा निःपात होऊन स्वामीचें राज्य अभिवृद्धीस पावावें हें तुम्हांस आवश्यक आहेच. याकरितां सुरेतचा मोगल फौजदार व कोटचा किलेदार असेल त्यास ताकीद करून पत्रें पाठविणें, आणि शिद्दी मसूद याची कुमक जंजिरेयास न पोहचे ऐसें करणें. यावेळ यांनीं शिद्दी ममुदास हस्तगत करावयाचीही तरतूद करणें म्हणून पत्रें सादर करून हुजरे दिमती हुद्दे व जासूद दिमती लबे चाकर उप्टूखाना पाठविले आहेत यांस वेतनांत देविले रुपये. ६८१०॥८

[ ५९ ] दमाजी गायकवाड यांस खास दस्तकाचें पत्र कीं, स्वामीची मोहिम शामलावरी जाली आहे. शामलाचीं देशदुर्गें हस्तगत जाली. जंजीरा व अंजनवेली राहिली, त्यास अंजनवेलीस राजश्री प्रतिनिधि यांणीं शह दिल्हा आहे, व जंजीरेयास राजश्री प्रधान यांणीं शह देऊन बैसले आहेत. ऐशीयास शिद्दी मसूद सुरेतेस आहे तो याची कुमक करणार. याकरितां तेथील

इ. स. १७३३-३४.
अर्बा सलासीन मया व अलफ.
रबिलावल २२.

niwas Pratinidhi and Bajirao Pradhan were sent against him, that all his forts and places were taken from him except Janjira and a few other places, and that steps were being taken to take these also. It was believed that Sidhi Masud, a subject of the Habshi, and residing at Surat, was about to collect an army and come to the Habshi's assistance. Umabai and Damaji were directed, with the assistance of the Mogul Fouzdar at Surat and the officer of the Surat fort to prevent Sidhi Masud from sending any re-inforcements and to arrest him if possible.

(59) A letter to the same effect as the above, in which it is stated that two places Janjira and Anjanweli alone remained with the Shamal and that the Pradhan had laid siege to the former and the Pratinidhi to the latter.

A. D. 1733-34.

बंदोबस्त करून कुमक न होये तें करणें ह्मणून पूर्वी तुह्मांस एक दोन पत्रें सादर केलींच आहेत. हल्लीं हें पत्र सादर केलें असे तरी तुह्मीं सुरतेचा बंदोबस्त करून जंजिरा व अंजनवेलीची कुमक न होये तें करणें. या कामास दमाजी जाचक व जासूद जथे मजकूर पाठविले आहेत. त्यांस मसाला देविला असे. आदा करणें. रुपये १००.

[ ६० ] राजश्री आनंदराऊ सोमवंशी सरलष्कर यांस जाब कीं तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें प्रविष्ट आलें. दोन वर्षें सरदारीचा विचार राहिला नाहीं. हल्लीं मसलतीस गुंतलों. लोकांची ममजावीस व पुढें फौजबंदीचा विचार राहिला याकरितां वरघाटे यावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणून लिहिलें. राजश्री प्रतिनिधि मनसबीयास राहिले आहेत आणि तुह्मीं यावें हें बेहिसाब आहे. स्वामीकार्य सिद्धीस पाववून स्वामीस संतोपवावें हें उचित आहे. तरी यावयाची उतावळी न करणें. राजश्री पंत मशारनिलेजवळी राहून त्याचे विचारें वर्तोन स्वामीकार्य सिद्धीस पावणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३३-३४. अर्बा सलासीन मया व अलफ. रबिलाखर १.

[ ६१ ] राजश्री सखोजी आंग्रे सरखेल यास जाब जे, तुह्मीं विनंतिपत्र श्रावण वद्य नवमीचें पाठविलें तें प्रविष्ट जालें. लिहिलें वृत्त कळों आलें. स्वामीचे आज्ञेप्रमाणें शामलाचें निर्मूल व्हावयाचें मनमुख्यावरील श्रमसाहस करावयास अंतर करीत नाहीं. उंदेरी साध्य करावयाचा उपाय योजिला होता परंतु इंग्रजामुळें जागा बळावला. इंग्रजास येविशीं लिहिलें त्यास तो

इ. स. १७३३--३४. अर्बा सलासीन मया व अलफ. रबिलाखर ३.

(60) Anandrao Somawanshi Sir Laskar being out, employed on a campaign below the Ghauts for 2 years requested permission to come home to arrange for the pay of his military followers. He was told that the Pratinidhi was engaged in the same campaign and it would be awkward for him to leave the Pratinidhi and to come above the Ghats. He was exhorted to complete the work on which he was engaged, and to be in no hurry to return home.

A. D. 1733-34.

(61) Sakoji Angria Sirkhel wrote to the Raja that he was not sparing himself in the endeavour to extirpate the Shamal, that he had fixed upon a plan for capturing Underi but that the English fortified the place, that he wrote to the English on the subject and was told by them that they had purchased the place and that friendly relations would be established in case the *Korlavana* (the duty paid for permission to pass through a country) levied at the various ports was remitted. The Angria was thanked for his assistance and was informed that if the English had purchased Underi, they should surrender it on receiving back the purchase money. As regards the remission of the duty, the Angria was authorized to make

A. D. 1733-34.

ह्मणतो आपण विकत घेतली. जरी बंदरोबंदरीचे कोलावण दूर कराल, सख्य होईल,ऐसें उत्तर आलें ह्मणून अर्थ लिहिला. ऐशास स्वामिकार्यावरी श्रमसाहस तुह्मीं न करावा तर कोणें करावा. स्वामीच्या मनोदयानुरूप वर्तोन स्वामीस संतोषी करावे हें तुह्मांस व लोकांस उचित आहे. इंग्रेजाचा मजकूर तरी उंदेरी शामलानें विकत दिली असेल. पैके घेतले असतील ते द्यावे. स्थल घ्यावें. सलुखा करावा. कोलावण दूर करावें ह्मणतो, बंदरोबंदरीचे सावकाराशीं इंग्रजास प्रयोजन काय. त्यानें आपलाच मुद्दा घालावा. याउपर जरी इंग्रजाची सावकारी बंदरोबंदरीं असेल त्यास कोलावण माफ केलीयानें सख्य संपादून स्थळ देत असेल तरी अवश्यंमेव करावें. यामध्यें तुमच्या विचारें स्थळ हस्तगत व्हावयाचा प्रसंग असेल तो करणें. वर्तमान वरचेवर लिहून पाठवणें. या कामास जामूद जथे संताजी नाईक (अक्षरें लागत नाहींत) पाठविले यास मसाला देविला रुपयेः—

१५ सुलतानजी पिसाळ. १५ मानाजी साळोखे. एकूण ३०.

[ ६२ ] फोंडसावंत भोसले परगणे कुडाळ यासी चिटनिशी पत्र कीं शामलाकडील

इ. स. १७३३-३४.
अर्बा सलासीन मया व अल्फ.
साबान १९.

ममलतेचा प्रसंग पडला आहे. हा अर्थ तुह्मांस कळलाच असेल. सांप्रत अंजनवेलीस शह देऊन स्थल हस्तगत करावें यासतव राजश्री संभाजी आंग्रे याशी आज्ञा केली आहे. ऐशीयांस त्यांचा तुमचा हर्षामर्ष पाहिलेपासून लागला. ते इकडील मनसुबीयास आल्यावर तुह्मीं त्याकडील प्रांतांत उपसर्ग केलियानें इकडील मनसुबीयास अंतर पडेल, याकरितां आज्ञापत्र सादर केलें आहे. तुह्मीं त्याकडील प्रांतांत उपसर्ग न लावणें. त्यासही आज्ञा करणें ते केली आहे. ते तुह्मांकडील प्रांतास उपसर्ग लावणार नाहींत. त्याचा तुमचा विवेक होऊन संरक्षण चाले तोच अर्थ केला जाईल. वरकड येविषयींचा अर्थ राजश्री नारोराम मंत्री यास आज्ञा केली आहे ते तुह्मांस लिहितील येविशीं पत्र १.

[ ६३ ] सरदारांस पत्रें जे तुह्मीं मुलुकगिरी करून आलेस ह्मणून विदित झालें. स्वामी

इ. स. १७३३-३४.
अर्बा सलासीन मया व अलफ.
जिल्हेज २९.

संतोष पावले. प्रस्तुत मनसुब्याचा प्रसंग आहे. तुह्मीं आपली फौज घेऊन टाकोटाक स्वामीनें दर्शनास येणें ह्मणून पत्रें सादर करून जामूद चाकर रवाना पाठविले यास देविला मसाला रुपयेः—

---

the concession so far as the English trade was concerned, if he could thereby secure Underi and a friendly alliance with the English.

( 62 ) Sambhaji Angria was engaged in reducing Anjanwel belonging to the Shamal. Fond Sawant Bhosle of Kudal was directed not to molest the Angria's territory.

A. D. 1733-34.

( 63 ) The Raja learnt that Udaji Chawan, Vyaso Bhujbalrao, and Sambhusing Jadhavrao had returned from a campaign. He congratulated them on their return

A. D. 1733-34.

२५ राजश्री उदाजी चव्हाण. २५ राजश्री व्यासो भुजबळराऊ २५ संभुसिंग जाधवराऊ

[ ६४ ] राणोजी घोरपडे यास जाब जे तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. लिहिला अभिप्राय अवगत झाला. राजश्री बाळोजी साळोखी यांणींही निवेदन केलें. ऐशीयास तुम्हीं राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक, तुमच्या वडिलीं श्रमसाहस करून यश कीर्ति संपादिली, तुम्हींही त्याचप्रमाणें लौकिक संपादिला, स्वामी संतोषी कराल हा निशा आहे. स्वामीसही तुमचें ऊर्जित, तुमचे हातें स्वामिकार्य घेणें आवश्यक आहे. वरकड बाळोजी साळोखी यास आज्ञा केली आहे ते लिहितील त्यावरून अवगत होईल. पत्र. १.

इ. स. १७३३-३४. अर्बा सलासीन मया व अलफ. जमादिलाखर २४.

[ ६५ ] सरदारांस खास दस्तखताचीं पत्रें जे प्रस्तुत दिल्लीहून फौजा येत आहेत म्हणून वार्ता दाट आली आहे. ऐशीयास प्रसंग कैसा पडेल हें न कळे. यास्तव फौजा संनिधच असाव्या. याकरितां आज्ञापत्रें सादर केलीं असेत. तरी एक महिनापर्यंत दूर प्रांतें गुजराथेकडे एकंदर नच जाणें. फत्तेपुरामार्जींच रहाणें. पेस्तर प्रसंगानुरूप आज्ञा करणें ते केली जाईल म्हणून लिहून पत्रें सादर केलीं. या कामास जासूद चाकर उठूखाना पाठविले त्यास मसाला देविला रुपये:—

इ. स. १७३४-३५. खमस सलासीन मया व अलफ. रजब २८.

५० सुलतानजी पिसाळ जथे मंताजी नाईक पवार. ५० नागोजी पवार जथे दर्याजी नाईक. ५० कृष्णाजी पवार जथे लतीब नाईक. ५० महादजी तोडेकर दिमत सबनीस. एकूण २००. यांसी सरदारांकडून देविले:—१०० रघोजी कदमराऊ यांकडून देविले. ५० कृष्णाजी पवार विश्वासराऊ. ५० उदाजी पवार. एकूण २००.

---

and asked them to repair at once to the Huzur with their armies as an important matter was to be discussed.

( 64 ) A letter to Ranoji Ghorpade, appreciating his devotion to the Raja and expressing a hope that he would exert himself in the service of the Raja and gain fame like his father.

A. D. 1733-34.

( 65 ) There was a thick rumour that an army was coming from Delhi [to the Deccan.] The Raja consequently wrote to the following Sirdars that there was no knowing what contingency might arise and requested them to be near at hand with their forces for one month.

A. D. 1734-35

1 Sultanji Pisal. 1 Nagoji Powar. 1 Krishnaji Powar. 1 Mahadaji Todkar.

४

[ ६६ ] राजश्री आनंदराऊ सोमवंशी सरलष्कर यांस खास दस्तकाचें पत्र सादर केलें जे, गोवळकोटास फौज रवाना करावयाविशीं तुम्हांस आज्ञा केली आहे आणि अद्याप फौज पाठविली नाहीं हे कोण गोष्टी? हल्लीं देखत आज्ञापत्र फौज रवाना करणें. ऐसें पत्र सादर करून जासूद थाकर नाईक निसबत सबनीस पाठविले यांस देविले रुपये:—

इ. स. १७३४-३५.
खमस सलासीन मया व अलफ.
साबान १०.

१० त्रिंबकजी पोर. १० अंदाजी भोसले. एकूण २०.

[ ६७ ] समस्त वतनदार मराठे यांशी आज्ञा केली ऐशी जे, सूर्याजी चव्हाण कोंकणराव यास जमाव करून गोवळकोटास स्वामीकार्यास आज्ञा केली असे. तर तुम्हीं याजवळ येऊन स्वामीसेवा करणें. तुमच्या मुद्यामाफेक स्वामी ऊर्जित करून चालवितील. पत्र १.

इ. स. १७३५-३६.
सीत सलासीन मया व अलफ.
राबिलाखर ८.

सूर्याजी चव्हाण कोंकणराव व समस्त चव्हाण देसाई मामले इमनाबाद यांसी आज्ञा केली एसी जे, तुम्हीं स्वामीसेवा करावी ऐशी उमेद धरली आहे. तर आपले जमावानिशीं राजश्री गोपाळराव यांजपाशीं येऊन स्वामीकार्य करून दाखवणें. तुमचें ऊर्जित होईल. पत्र १.

[ ६८ ] खास दस्तक गंगाजल निर्मळ उमाबाई दाभाडी यासी आज्ञा केली ऐशी जे, सांप्रत शामलानीं सोखी करून बाणकोटास अपाय केला; त्याचें पारपत्य करणें जरूर. हुजूर फौजा होत्या त्या रवाना केल्या. कोंकणचे मसलतीस आज तीन वर्षें जालीं. तुम्हीं आपणाकडील मातबर फौज आणून एकही स्वामीकार्य करून दाखविलें नाहीं. राजश्री येशवंतराव दाभाडे सेनापति स्वामीसंनिध होते त्यांसी मसलतीची आज्ञा केली. त्याणीं दोन महिन्याची मुदत घ्यावी, मातबर फौज

इ. स. १७३५-३६.
सीत सलासीन मया व अलफ.
साबान २२.

---

(66) Anandrao Somawanshi Sir Laskar was reprimanded for not sending an army to Gowalkot as previously directed and was directed to send the army at once without delay.

A. D. 1734-35.

(67) Suryaji Chawan Kankanrao was directed to raise an army and go to Gowalkot for service under Gopalrao. All the watandar Mahrattas in Konkan were urged to join Suryaji.

A. D. 1735-36.

(68) Umabai Dabhade was told that the Shamal having damaged Bankot, armies were sent from the Huzur to punish him; that during the three years of campaign against the Shamal, no assistance in the shape of troops was received from Umabai; that Yeshwantrao Dabhade Senapati had personally pro-

A. D. 1735-36.

आणून स्वामीसेवा करून दाखवूं म्हणून बोलले. त्यावरून मशारनिल्हेस आज्ञा दिली. तुम्हां-कडे रवाना केले. ते तुम्हांजवळी येऊन पावले असतील अथवा हें वर्तमान लिहून पाठविलें असेल. तुम्हीं फौजेची तयारी केलीच असेल. पांच सात हजार फौज पाठवून स्वामीसेवा करून स्वामीस संतोष पावणें. समय हाच आहे. सरकारचे ऐवजाची बाकी चौसाला तुम्हांकडे राहिली त्याची मुदत नवापुरास गेल्यानंतर पावता करूं म्हणून केली. त्यासी नवापुरास जाऊन तीन चार महिने जाले. अद्यापि ऐवजाची रवानगी न केली. यावरून अपूर्व दिसोन आलें. हुजूर साहुकारांनीं व गोसावी यांनीं बहुतच निकड केली आहे. तुम्हांकडील पैकी-यासी दिरंग लागतो हे गोष्टी कार्याची नाहीं. याउपरी पैका झाडियानिशीं रवाना करणें. अतःपर दिवसगतीवरी न घालणें. प्रस्तुत मसलतीचा खर्च लागला आहे. लक्ष कामें एकेकडे ठेवून पैका व फौज आधीं रवाना करणें. मग आपलें थाव्याचें करणें. पैकीयाची निकड बहुत लागली आहे. एक घटीचा विलंब न करितां पैका व पोक्ती फौज देऊन सेनापतीची रवा-नगी अति सत्वर करणें. या कामास हुजरे दिमत पाठविले यासीः—

२०० महादजी बावाजी. ५० कान्होजी संकपाळ. एकूण २५०.

**इ. स. १७३५–३६.**
सीत सलासीन मया व अलफ.
रबिलाखर ८.

[ ६९ ] किता दस्तक सौभाग्यवति रमादेवी व रखमादेवी हें औरंगाबादेहून दोखील भार बारदारी दिल्लीस जात आहेत, त्यास मुजाहिम न होणें. आपलाले हद्देतून बद्रका[?] देऊन पोहचवणें म्हणून सरदार, पागा व शिलेदार यांस दस्तक १.

[ ७० ] किता हातरोखा राजश्री उदाजी पवार यास आज्ञा केली ऐशी जे, गोवळकोटचे मसलतेस तुम्हांकडील स्वार आणविले त्यास तुम्हीं पोक्त जमाव सरंजामप्रमाणें पाठवावा ते गोष्टी केली नाहीं. जे स्वार पाठ-विले त्यांणीं आजपर्यंत चाकरी केली. हल्लीं उष्णकाळ आला

**इ. स. १७३६-३७**
सबा सलासीन मया व अलफ.
जमादिलाखर ६.

mised to send forces to the Konkan, and that she should therefore send him to the Province with about 5000 or 7000 men. She was further directed to remit the tribute due from her without delay as the Raja was hard pressed for cash.

(69) Soubhagyawati Ramadevi and Rukhamadevi were going with attendants from Aurangabad to Delhi. Orders were issued to all Sirdars to escort them through their respective territories.

A. D. 1735-36.

(70) Udaji Powar was informed that the force sent by him for the campaign against Gowalkot was meagre. He was therefore directed to send 100 Sowars more with

A. D. 1736-37.

यामध्यें लगट करून काम फत्ते करावें लागतें. कुल सरदारांस आज्ञा करून चोक्की फौज आणविली. तुह्मांकडून राजश्री आपाजी आले होते त्यांस येविशीं आज्ञा केली आहे. तरी तह्मीं राजश्री दारकोजी पवार यांस शंभर स्वारांनिशीं बहुत लौकर हुजूर पाठवून देणें. तुमचे स्वार येत नाहींत याबद्दल राजश्री बुबाजी पवार, विश्वासराऊ व मानाजी पवार हे तुमच्या सरंजामांत घालमेल करणारे होते; परंतु आपाजी त्रिंबक आल्यावर ते गोष्टी राहिली. तरी स्वार सत्वर पाठविणें. या कामास जामूद जथे दर्योजी नाईक पाठविले आहेत त्यास वेतनात देणें रुपये:—

९० निंबाजी धुमाळ मुबदला सखोजी रोहिला आणि निंबाजी करार. १० शाबाजी टोणपा. एकूण रुपये १००.

[ ७१ ] कित्ता एक चिटनिशी समाधानपत्रें:–सरदार दिमत राजश्री फत्तेसिंग भोसले यांणीं विराप्पा निसबत चंद्रसेन याशीं युद्धप्रसंग करून विराप्पा धरिला. फौज मोडून तारांगण केलें ह्मणून विदित झालें; त्यावरून स्वामी बहुत संतोषी होऊन खुशाल झाले. समाधान पावले. तुह्मीं बरी अंगेजणें करून युद्धप्रसंगीं शर्त केली, हें सविस्तर वृत्त चिरंजीवांनीं लिहिलें, त्यावरून स्वामी समाधान पावले. तुमचे सेवेचा मजुरा झाला. पुढेंही चिरंजीवांचे आज्ञेंत वर्तोन स्वामीसेवा करून आपला जगनामोश करून घेणें ह्मणून पत्रें.

इ. स. १७३८-३९.
तिसा सलासीन मया व अलफ.
जिल्हेज २४.

कित्ता एक नावनिशीवार:-

१ राजश्री हैबतराऊ बांडगर. १ राजश्री संताजी यशवंतराऊ व तुळाजी यशवंतराऊ कोकाटे. १ राजश्री सुभानजी पोळ. १ राजश्री खंडोजी बांडगर. १ राजश्री यशवंतराऊ ओटर[?] १ राजश्री खंडोजी बांडगर वजारतमहा. १ राजश्री आपाजी माने. १ जानराऊ सोळसकर. १ मानसिंग सोळसकर. १ कोंडजी सोळसकर. १ शामराऊ त्रिंबक घोडके धायगुडे. १ डोंगरोजी यादव. १ जयसिंग शिर्के. १ नरसिंगराव कोकाटे. १ यशवंतराऊ शितोळे एकूण १५.

मोघम नांवाग जागा टाकून डाळें पाठविलीं, लष्करांत नांवें भरून देतील पत्रें सुमारें २५.

---

Darkoji Powar as it was intended to bring the campaign to a successful issue during the hot weather.

(71) Fatesing Bhosle gave a battle to Virappa in the service of Chandrasen routed him and made him prisoner. In communicating the intelligence to the Raja, Fatesing made a favourable mention of Haibatrao Bandgar and other Sirdars. The Sirdars were informed that Government was pleased to hear of their exploits.

A. D. 1738-39.

[ ७२ ] कित्ता पत्र चिटनिशी पौष्य बहुल द्वादशी गुरुवासर राजश्री हैबतराऊ बांडगर अमीरुलउमराव यांस जाब ऐसाजेः—तुर्म्ही विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें लिहिलें वर्तमान विदित झालें. विराप्पा वगैरे टाळेटोळे जमा होऊन मुलखांत धूम मांडली आहे. चंद्रसेन जाधव उदाजी चव्हाणास बरोबर घेऊन बिडाकडे आले आहेत ह्मणोन लिहिलें. त्यांस गनिमानीं वळवळ केली आहे. त्यांस नतीजा देऊन (लागत नाहीं.) ठेवावें ह्मणोन स्वामींनीं चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोसले व राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा व राजश्री संभुसिंग जाधवराऊ व राजश्री आपाजी सोमवंशी सरलष्कर यांसी फौजेनिशीं आज्ञा देऊन रवाना केले आहेत. चतुर्वर्ग सत्वरीच त्या प्रांतीं येतील, तुम्हींही चिरंजीवांस सामील होऊन स्वामीसेवा करून दाखवून आपले सेवेचा मजुरा करून घेणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३८–३९.
तिसा सलासीन मया व अलफ.
सवाल २५.

[ ७३ ] किल्ले कलानिधिगड स्वामींचे पदरीं पडला आहे. तेथील पारिपत्य बयाजी जाधव सेनापंचसहश्री यांसी सांगोन रुमालानिशीं पाठविले आहेत. हे किल्लेमजकुरीं राहून बंदोबस्ती करतील. तुम्हीं हरएक-विशीं साहित्य करणें. किल्ले मजकूरच्या तनखेयांस—दिले आहेत तरी आपले तर्फेनें मशारनिल्हेस उजसर्ग न देणें.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
रबिलावल ३.

१ राजश्री फोंड सांवत भोसले सरदेसाई परगणे कुडाळ. १ राजश्री नाग सांवत भोसले. एकूण २.

[७३ ए] कित्ता पत्रें चिटनिशी तीथवार छ० मजकूर राजश्री धारराऊ पाटणकर यांस आज्ञा केली ऐसीजे—तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाहला. महाराजांनी आज्ञा घेऊन स्वार जाहला ते राजश्री हिंदुराऊ घोरपडे ममलकत मदार याची भेट घेतली. पुढें

इ. स. १७४२-४३.
सलास अर्बैन मया व अलफ.
रबिलावल १८.

(72) Haibatrao Bandgar Amirul Umrao reported that Virappa and others were infesting the country and that Chandrasen Jadhav had moved towards Bid together with Udaji Chavan. Fatesing Bhosle, Raghoji Bhosle, Shambhusing Jadhavrao and Appaji Somavanshi were, therefore, sent to the Province with their armies to put down the enemy and Haibatrao was directed to join them.

A. D. 1738-39.

(73) The fort of Kalanidhi, having been obtained by Government Bayaji Jadhava, Sena-Panch-Sahasri was deputed to take charge of it.

A. D. 1740-41.

(73 *a*) Dharrao Patankar wrote to say that he had, in accordance with the Raja's direction, visited Hindurao Ghorpade, Mamalkat-Madar, and that he intended to

A. D. 1742-43

त्रिचनापल्लीकडे जाण्याचा विचार आहे ह्मणून लिहिलें. ऐसीयास नवाब निजामनमुलुक त्रिचनापल्लीस जाऊन बैसला आहे. तेथील उपराळ्यास जावयाची आज्ञा राजश्री हिंदुराऊ घोरपडे ममलकतमतदार यास केली आहे. ते फौजेसहवर्तमान जातील. त्यासमागमें तुह्मीं फौजेसहवर्तमान जाऊन तेथील उपराळा करून आपले सेवेचा मजरा करून घेणें ह्मणून पत्र १.

[ ७४ ] किता साहित्य पत्रें चिटनिशी राजश्री रामचंद्र बाबाजी प्रभू दिमत राजश्री संभाजी राजे चैत्र शुद्ध द्वितीया इंदुवासरे यास फोंडे व कडवाड सिवेश्वर वगैरे हा जिल्हा मशारनिल्हेस सांगून त्या प्रांतें रवाना केले आहेत. तरी तुह्मीं सर्व प्रकारें यास अनुकूल होऊन राज्यांतील स्थळें हस्तगत होत तें करणें. तेणेंकरून तुमचें मनोभिष्ट सिद्धीस पावेल ह्मणून पत्र.

इ. स. १७४३--४४.
अर्बा अर्बैन मया व अलफ.
सफर २.

[ ७५ ] राजश्री जयराम सांवत व रामचंद्र सांवत भोसले सरदेसाई परगणे कुडाळ यासी आज्ञा कीं, फिरंगी व सोंधेकर एकत्र होऊन राज्यांतील स्थळें आक्रमून मनस्वी वर्तणूक करूं लागले आहेत. याचें पारिपत्य करून स्थळें सोडवावीं हें स्वामीस परम अवश्य होऊन रामचंद्र बाबाजी यास फोंडे व मुपे व कडवाड सिवेश्वर हा जिल्हा सांगोन त्या प्रांतीं सरंजामानिशीं उभारणी करून रवाना केले आहेत. मशारनिल्हेचें सर्व प्रकारें साहित्य करणें स्वामीस आवश्यक आहे. मागाहून जें साहित्य कराल तें स्वामी पुरवितील. तरी तुह्मीं या मनसबियास हरोल होऊन मनसबा सिद्धीस जाये तें करणें. तुह्मांसारखे प्रमुख वतनदार स्वामींचे पदरीं असतां राज्यांतील स्थळें कानड्यांनीं अनुभवावीं हें योग्य नव्हे. मशारनिल्हे व तुह्मीं मिळोन मसलत सिद्धीस नेणें ह्मणून पत्र.

इ. स. १७४३-४४.
अर्बा अर्बैन मया व अलफ.
सफर २.

---

proceed to Trichanapoli. He was informed that Nabob Nizaman-Muluk had already gone to Trichanapoli, that Hindurao had been directed to go there to render assistance, and that he, viz Dharrao Patankar, should proceed to the place with his army.

( 74 ) Ramchandra Bapuji Prabhu, in the service of Sambhaji Raja, was entrusted with the management of Phonda, Kadwad, Siweshwar, &c. and sent to that province. Letters were sent to Rudrappagauda, Sir Desai of Hubli, and to the Deshmukhs and Deshpandes of Pargana Kadwad, Ankola, Janehalli, Punch Mahal, Siweshwar and Phonda; directing them to yield obedience to him.

A. D. 1743-44.

( 75 ) Jayram Sawant and Ramchandra Sawant were written to as follows:—

A. D. 1743-44.

The Portugese and Sondhekar have joined together and are encroaching on the territory of Government. It being therefore necessary to

[ ७६ ] विनंति उपरी राजश्री यशवंतराऊ दाभाडे सेनापति व राजश्री दमाजी गायकवाड यांसी फौजेसहवर्तमान हुजूर येणें ह्मणोन खासदस्तक देऊन दर्याजी नाईक पवार व शिदोजी दळवी व संभाजी जाधव पाठविले. यासी मसाला रुपये ५०० दर्याजी नाईक पवार:—

इ. स. १७४३-४४.
अर्बा अर्बैन मया व अल्फ.
रबिलाखर ११.

४०० खासा, १०० जासूद जोड ४ एकूण ५००, २०० शिदोजी दळवी व संभाजी जाधव हुजरे, एकूण ७००.

एकूण सातशें रुपये रास देविले असत. पांचशें रुपये सेनापतीकडे, व दमाजी गायकवाड याजकडे दोनशें, एकूण सातशें देविले आहेत; भरून देविले पाहिजेत हे विनंति.

[ ७७ ] राजश्री रघोजी भोसले यासी पत्र जे, राजश्री पंतप्रधान यासी सामील होऊन तांब्राचा पराभव करणें ह्मणून आज्ञापत्र सादर करून बाळाजी रंगनाथ निसबत पंतप्रतिनिधि हे पाठविले. यासी खर्चास देविले रुपये १००:—

इ. स. १७५०-५१.
इसने खमसैन मया व अल्फ.
मोहरम १८.

राजश्री फत्तेसिंग भोसले यासी पत्र जे, राजश्री पंतप्रधान यासी सामील होणें ह्मणून आज्ञापत्र सादर करून आपाजीपंत निसबत राजश्री बऱ्हाणजी मोहिते पाठविले यास खर्चास देविले रुपये ५०.

राजश्री उदाजी चव्हाण यासी पत्र जे, राजश्री पंतप्रधान यासी सामील होणें ह्मणून आज्ञापत्र सादर करून राजश्री आपाजी नारायण दिमत राजश्री पंतअमात्य पाठविले यासी खर्चास देविले रुपये ५०.

---

punish them. Ramchandra Bapuji has been appointed to Phonda, and Kadwad Siweshwar, and is sent there with an army. You should assist him and carry the plan in view into execution. It is a disgrace that while the Satara Raja had influential Watandars like the Sawant in his service, some places of Government should be in the possession of the Kanarese.

(76) Letters in the Raja's own hand-writing to Yeshwantrao Dabhade Senapati, and Damaji Gaikwad, to come to Satara with their armies.

A. D. 1743-44

(77) Letters to Raghuji Bhosle, Fatesing Bhosle and Udaji Chawan, directing them to join the Peshwa, and to defeat the Tambras. [:Mahomedans]

A. D. 1750-51.

[७८] राजश्री बाळाजी बाजीराव पंडित प्रधान यासी आज्ञा केली ऐसीजे. तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला. बिदनूरच्या तालुक्यांत आलों. सावनूरच्या तालुकीयांतून माघारे लौकरच येऊं ह्मणून एकनिष्ठापूर्वक लिहिलें तें श्रवण होऊन संतोषावाप्ति जहाली. ऐसीयासी तुह्मीं परम एकनिष्ठ सेवक आहांत; यथायोग्य वर्तणूक असेल ते कराल हा तो साहेबांस पूर्ण भरंवसा आहे; त्यास साहेबाचा मनोदय तुह्मीं सर्वप्रकारें जाणतच आहां. जे वर्तणूक करणें ते मनोदयानुरूप करून आपल्यास परंपरा कल्याण तें करणें उत्तम आहे. येविषयीं विस्तारें लिहावें ऐसें नाहीं. सारांश, सेवकधर्मास योग्य आणि साहेबांस संतोष ते गोष्ट करणें ह्मणून पत्र तसलमात जासूद पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब ५.

(७९) राजश्री भगवंतराव पंडित अमात्य याचा व करवीरवासी याचा कलह आज दोन वर्षें लागला आहे. ये निमित्य पंडित मशारनिल्हे याणीं नारो शिवदेव यासीं जमावानिशीं त्या प्रांतें रवाना केले आहेत त्यास धामधूम करून स्वारी शिकारी करतील तरी तुह्मीं यांचें सर्वप्रकारें साहित्य करून रहावयासी आश्रा जागा देऊन अंमल सुरळीत चालवणें पत्रें.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिल्हेज ४.

शिवाजी साळोखे. १ राजश्री हरीराम विसाजी नारायण निसबत घोरपडे. १ सुभानजी सूर्यवंशी. १ गोपाळजी भोसले. १ तुळाजी देसाई शिरोळकर. १ शिदराम देसाई करजवाडकर. १ पालगोडा पाटील समडोली. १ वाटेचें दस्तक. एकूण ८.

---

(78) A reply to Balaji Bajirao Pradhan informing him that Government had heard with pleasure the news of his arrival in Taluka Bidnur and of his intention to return shortly through Taluka Sawnur, and desiring him always to act in a manner befitting a servant of Government.

A. D. 1752-53.

(79) Bhagavantrao Pandit Amatya, and the Raja of Karwir, were on bad terms with each other for 2 years. The Amatya having sent Naro Siwadeo with an army to invade the Province of the Karwir Raja, the following persons were directed to assist him:—Siwaji Salokhe, Ghorpade, Subhanji Suryawanshi, Gopalji Bhosle, Tulaji Desai Sirolkar, Sidram Desai Karajwadkar and Palgauda Patil Samdole.

A. D. 1752-53.

[ ८० ] पार्वती भोसली यासी आज्ञा जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें पावलें. लेखनार्थ अवगत जाहला. ऐशीयास वारणेपलीकडे तुह्मीं उपद्रव केलात ह्मणून तेही मोबदला करावयाच्या विचारांत आहेत. तर आपलीं ठाणीं व खेडीं खबरदारीनें राखणें. छ ४ पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहरम २.

[ ८१ ] राजश्री यशवंतराऊ गाईकवाड यास पत्र जे, चिरंजीवांची स्वारी करवीराहून वडगांवास आली आहे. त्यास तुह्मीं समागमें असतां स्वारीचे लोक व राऊत शिराळें प्रांतीं वगैरे मुलखांत उपसर्ग देऊन गांव जाळून पाटील नेऊन दंगा करितात ह्मणून हुजूर विदित झालें. तर तुम्हीं तेथें असतां स्वराज्य प्रांतांत धामधूम करावी हा अर्थ योग्य नव्हे. याउपरी मुलखांत दंगा न होय तो अर्थ केलिया उत्तम आहे. येविशीं चिरंजीवांसही पत्र पाठविलें आहे:—

इ. स. १७५२—५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहरम १८.

राजमान्य राजश्री आबाजी घाटगे सर्जेराव यांसी पत्र व राजश्री रणोजी घोरपडे सेनापति यांसी पत्र जे, चिरंजीवांची स्वारी करवीराहून वडगांवास आली आहे. त्यासमागमें फौजसुद्धां तुह्मीं आला आहां. ऐसें असतां स्वारीचे राऊत व लोक शिराळें प्रांतीं वगैरे प्रांतांत उपसर्ग देऊन गांव जाळून पाटील नेऊन दंगा करितां ह्मणून हुजूर विदित आलें. तर तुह्मीं लोकीं स्वराज्य प्रांतीं धामधूम करावी हा अर्थ किमपि नाहीं. हें तुह्मां लोकांस कळतच आहे. कदाचित् या प्रांतींहून बाळ गोपाळ भोसले यांनीं वारणेपलीकडे थोडीबहुत स्वारी केली असेल त्याच्याही पारिपत्यास साहेबांस अगाध आहे ऐसें नाहीं. त्यासही जे आज्ञा कर्तव्य ते करीत आहे. ते अमर्याद वर्तणूक करणार नाहींत, हें निभ्रांत जाणून जे स्वारी या प्रांतांत आली असेल ते माघारें जाऊन मुलूख आबाद होय तें करणें. येविषयीं चिरंजीवांस पत्र पाठविलें आहे त्यावरून कळेल.

---

(80) Parvatibai Bhosle was informed, in reply to her letter, that as she had attacked the province on the other side of Warna, the Karvir Government was also thinking of a retaliation, and was directed to protect her posts and villages with care.

A. D. 1752-53.

(81) The Raja of Karvir moved with his army to Wadgaon. Yeshwantrao Gaikwad, Abaji Ghatge, Sarjyarao, Ranoji Ghorpade Senapati, were with the army. On the way the soldiers burnt some villages in Prant Shirale and others, took the Patils prisoners, and plundered the country. The Raja in addressing the three persons in question expressed his amazement that such practices should have been resorted to, while they were with the army. He requested that, for the prosperity of the country the contemplated

A. D. 1752-53.

[ ८२ ] राजश्री घनःशाम नारायण मंत्री यांसी पत्र जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें त्यांत लिहिलें कीं, वडगांवाहून स्वारी येऊन मुलखांत दंगा आरंभला आहे ह्मणून लिहिलें. तर पार्वती भोसली इनें चिरंजीव यांच्या मुलखांत दंगा केला त्यामुळें त्यांनीं उपद्रव केला. तर पार्वती भोसली ईस ताकीद करून दंगा न होय तें करणें. तुह्मीं व शिवाजी साळोखी व बाबाजी थोरात ऐसे जमावासुद्धां त्याचे तोंडावर राहणें. पत्रें २.

इ. स. १७५२--५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहरम २२.

[ ८३ ] राजश्री शिवाजी साळोखी यासी आज्ञा जे, तुह्मीं विनंतीपत्र लिहिलें कीं, करवीरवासी जमाव भारी करून आले ह्मणून लिहिलें व राजश्री नरसींपंत यानीं निवेदन केलें, त्यावरून राजश्री पंतप्रतिनिधि व राजश्री मंत्री व बाळ गोपाळजी भोसले व तमाम सरदार यांस आज्ञापत्रें सादर केलीं आहेत. ते जमावासुद्धां अविलंबें मजत होतील. तुह्मीं ठाण्याची बंदोबस्ती करून व मुलखास उपद्रव न होय तें करून करवीरवासीयांस तंबी पोहोंचवणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सफर १७.

[ ८४ ] राजश्री शिवाजी साळोखी यास पत्र जे, तुह्मांकडून राजश्री गोविंद नरसिंह आले, त्यानीं सविस्तर विनंति केली त्यावरून अवगत झालें. हल्लीं करवीरवासीयाची फौज व उदाजी चव्हाण फौजेनिशीं भिलवडीवर आले. तर तुह्मीं एकनिष्ठ सेवक आहां. हल्लीं पंडित प्रतिनिधि-

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलावल १.

---

invasions should be given up and added that if Parvatibai Bhosle had led an attack beyond the Warna she would be duly punished.

A letter to the same effect was written to the Karvir Raja.

(82) Ghanasham Narayan Mantri, informed Government that the Karvir Raja had come with his army from Wadgaon, and was causing disturbance in the country. He was informed that the invasion was the outcome of the attack led by Parvatibai Bhosle against the Karvir territory, that he should bring this to the notice of the lady and that he and Shivaji Salokhe and Babaji Thorat should all join their armies and oppose the Karvir Raja.

A. D. 1752-53.

(83) Orders were issued to the Pant Pratinidhi, the Mantri, Bal Gopalji and all the Sirdars, to proceed with their armies against the Raja of Karvir.

A. D. 1752-53.

(84) Orders were sent to the following Sirdars to join the Pandit Pratinidhi with their armies, and to attack the Raja of Karvir who, with the army of Udaji Chavan, had encamped at Bhilavadi—Pravatibai Bhosle, Ghanasham Nara-

A. D. 1752-53.

सही रवाना केलें आहे. राजश्री खंडो जगताप व वरकड पथकें यांस पत्रें रवाना केलीं आहेत; तर तुह्मीं आपले फौजेनिा गाहा करून त्यास तंबी पोहोंचवणें. साहित्य पत्रें:—

१ मशारनिल्हेस. १ राजश्री अग्नोजी साळोखी यास. १ राजश्री महादजी शिंदे यास पत्र. १ राजश्री यशवंतराव वोलेकर यास. १ राजश्री खंडोजी जगताप यास. १ थत्राजी भोसले यास. १ खेत्रोजी शिंदे यास. १ राजश्री संभाजी घोरपडे यास. १ संताजी शिंदे यास. १ शिवाजी भोसले. १ राजश्री महादजी शिंदे यास. १ पोसजी गायकवाड. एकूण ११

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलावल १६.

( ८५ ) किल्ले गगनगड येथें चिरंजीव करवीरवासी यांनीं फौज पाठविली त्याचें साहित्य करून किल्ला साहेबाचा जतन होय तें करणें ह्मणून.

१ शिवाजी साळोखे. १ पार्वती भोसली. १ शिदोजी थोरात. १ सुभानजी सूर्यवंशी. १ तुळाजी देसाई. १ राजश्री यमाजी पंत. १ राजश्री प्रतिनिधि. एकूण ७.

[ ८६ ] पानगौडा पाटील मौजे संडोली यासी आज्ञा जे, राजश्री नारो शिवदेव व सुलतानजी जाधव दिमत राजश्री भगवंतराव पंडित अमात्य यांसी स्वामीकार्यास त्या प्रांतें ठेविले आहेत. एशीयासी हे वारणेपलीकडे स्वारी शिकारी करतील त्यास तुह्मीं सामील होऊन सर्वाविशीं साहित्य करणें. गगनगडकरी व करवीरवासीयांनीं आंग्र्याला सामील करून हर्शामर्शा करीत आहेत, तरी तुह्मीं हरएकविषयीं साहित्य करणें- पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
साबान १७.

---

yan Mantri, Jagajivan Pandit Pratinidhi. Yemaji Siwadeo, Shivaji Salokhe, Agnoji Salokhe, Mahadaji Shinde, Yeshvantrao Wolekar, Khandoji Jagtap, Thobaji Bhosle, Khetraji Shinde, Sambhaji Ghorapade, Santaji Shinde, Shivaji Bhosle and Posji Gaikwad.

(85) The Raja of Karvir having sent an army against the fort of Gagangarh, orders were issued to the following officers to protect the fort — Sivaji Salokhe. Parwati Bhosle, Sidoji Thorat, Subhanji Suryawanshi. Tulaji Desai, Yemaji Pant and Pratinidhi.

A. D. 1752-53.

(86) Naro Shivadeo and Sultanji Jadhava in the service of Bhagawantrao Pandit Amatya were kept on duty in the Prant of Sandoli. Pangouda Patil of Sandoli was directed to assist them in their invasions beyond the Warna, and to protect the fort Gagangarh from the attacks of Karvir Raja.

A. D. 1752-53.

# राजकीय (व) इतर माहिती.

## सातारकर महाराज.

[ ८७ ] मौजे येरगटनहळ्ळी संमत बोदिगिरी मामले बासवापट्टण येथें महाराज राजश्री शहाजी महाराज कैलासवासी यांचें वृंदावन आहे, तेथील पूजा उर्फ नैवेद्य नंदादीपास मौजे मजकूर पेशजींपासून कुलबाब, कुलकानू दरोबस्त इनाम आहे, यास चोहोंकडून उपसर्ग लागतो येविषयीं ताकीदपत्र जेः—तपोनिधि ध्यानभारथी गोसावी यांचे शिष्य बालखंडी भारथी वृंदावनासमीप रहातात. याजकडे मौजे मजकूरचा वसूल देणें हे वृंदावनाची पूजाउर्जा चालवतील येविषयीं ताकीद पत्रेंः—१ मौजे येरगटनहळ्ळीस. १ देशमुख व देशपांडे. १ देशाधिकारी. १ राजश्री हिंदुराऊ घोरपडे. एकूण ४.

इ. स. १७३२-३३.
सलास सलासीन मया व अलफ.
साबान १.

[ ८८ ] राजश्री कैलासवासी स्वामी यांचें वृंदावन मौजे वडू तर्फ पाबल प्रांत जुन्नर येथें आहे. तेथें वृंदावनासमीप झाडलोट, सेवा, गोविंद गोपाळ ढगोजी मेगोजी करतात. यांचे योगक्षेमाबद्दल मौजे वडू तर्फ पाबलपैकीं इनाम पडजमीन छ. मजकूर बिघे८९.

इ. स. १७३२-३३.
सलास सलासीन मया व अलफ.
साबान २८.

[ ८९ ] संस्थानें हुजूर खासगीकडे ठेविलींः—

१ प्रांत हरपनहळ्ळी. १ प्रांत चिक बाळापूर देखील बुरूडकोट व केहालनूर. एकूण दोन्ही संस्थानें येथील पारपत्य राजश्री आनंदराव शिवदेव यास सांगून पाठविलें असत. तरी याचें साहित्य करून दोही संस्थानांचा ऐवज याकडे मुरळीत वसूल पावे ते गोष्टी करणें. आपले तर्फेनें संस्थानास कोणेविषयीं उपसर्ग न लागे तें करणें ह्मणून राजश्री हिंदुराऊ घोरपडे यांस पत्रें २.

इ. स. १७३२-३३.
सलास सलासीन मया व अलफ.
जिल्काद २८.

---

(87) The grave of Shahaji Maharaj was at Ergatanhali in Sammat Bodigiri in Mamle Basawapattam. The village was enjoyed as Inam for service in connection with the grave.

A. D. 1732-33.

(88) The grave of the late Raja was at Wadu in Tarf Pabal of Prant Junnar. A piece of land was given in Inam for service in connection with the grave.

A. D. 1732-33.

(89) The Sansthans of Harapanhalli and Chik Balapur were kept under the management of the Huzur Khasgi.

A. D. 1732-33.

[ ९० ] कित्ता इनामपत्रें वेदमूर्ति गंगाधर जोशी बिन नारायण जोशी वाईकर गोत्र कृष्णात्र शाखा वाजसनी यासी दिलें इनामपत्र ऐसें जे, रौद्रनाम संवत्सरे पौष वद्य तृतियेस वाडिगांत देवाज्ञा आली; त्यांचे उत्तरकार्यसमयीं भूमिदान तुम्हांस कसबे वाई परगणे मजकूर येथें धाराइत इनाम दिल्हा असे. बिघे तपशील:—८२ पाटस्थळ. ८१३ जिरायत. एकूण ८१५.

इ. स. १७४०-४१.
इसने अर्बैन मया व अलफ.
जमादिलावल २५.

एकूण पंधरा बिघे जमीन स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई, कुलबाब कुलकानू इनाम करून दिला असे. तरी सदरहु कसबे मजकुरीं वहीत जमीन पंधरा बिघे चतु:सीमापूर्वक तुम्हीं आपले दुमाला करून घेऊन तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम अनुभवून सुखरूप राहणें. अधिक श्रावण वद्य पंचमी भौमवासरे येविशीं पत्रें:—

फडणिशी:—१ इनामपत्र वेदमूर्तीस. १ कसबे वाई परगणे मजकूर चिटणिशी:—१ देशमुख व देशपांडे परगणे मजकूर. १ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत मजकूर एकूण ४.

इ. स. १७४३-४४.
अर्बा अर्बैन मया व अलफ.
रबिलाखर ११.

[ ९१ ] महाराज राजश्री स्वामींस सावकाश वाटलें; छ मजकुरीं अमृतसिद्धीयोगाचे मुहूर्तें सदरेस येऊन बैसले; यास्तव नजर व सत्कार केला:—

राजश्री त्रिंबकराव सेनाखासखेल १० मोहरा. आबूजी नाईक ५ मोहरा. कुसाजी भोसले १० रुपये. भवानी मिर्धा ३ रुपये. बापुभट वैद्य २ रुपये. बहिरव जोशी कलमदाने १ रुपया. बारदार ० राजश्री फत्तेसिंग भोसले ०

इ. स. १७४६-४७.
सबा अर्बैन मया व अलफ.
साबान ५.

[ ९२ ] सौभाग्यादिसंपन्न चिरंजीवी गजराबाई बांडे यासी इनाम धारादत्त यांसी व यांचे वंशपरंपरेनें [ परगणा नंदुरबार व परगणे सुलतानपूर सुभे खानदेशापैकीं इतर गांवें आहेत. ]

---

( 90 ) A Rani died on this date corresponding with the third of the dark half of Paush. A piece of land was given in Inam to a Brahmin in commemoration of the event.

A. D. 1740-41.

( 91 ) The Raja having recovered from illness came to the Darbar on this date. It being an auspicious day, Nazars were presented to him on the occasions.

A. D. 1743-44.

( 92 ) Inams were given to Gajarabai Bande [Raja's daughter], and to her son, in Pargana Nandurbar and Sultanpur in Khandesh.

A. D. 1746-47.

[ ९३ ] कित्ता पत्रें मार्गशीर्ष बहुल चतुर्दशी मंदवासर बनाम लाला प्रतापराव बिन

इ. स. १७४७-४८.
समान अर्बैन मया व अलफ.
मोहरम १४.

गुलाबराव खेत्री यांनीं शाहूनगरनजीक किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसंनिध विनंति केली कीं, महाराजस्वामी पूर्वी मोगलाईत होते तेसमयीं आपले बापांनीं स्वामींची सेवा निष्ठेनें केलियाबद्दल महाराजस्वामीस मोगलाईतून खरगोण जहागीर होती, तेथें आपणास दररोज रुपये २ दोनप्रमाणें नेमून दिले होते. ते कांहीं दिवस पावले, अलीकडे पावत नाहींत. त्यास महाराजस्वामींनीं पत्रें करून देऊन सदरहु दररोज दोन रुपयांप्रमाणें साल दरसाल आपणास वंशपरंपरेनें देविले पाहिजे ह्मणून विनंति करून पूर्वी पत्र करून दिलें होतें तें आणून दाखविलें. तें मनास आणून हे स्वामींचे पुरातन सेवक, यांचे बाप लाला गुलाबराव यांनीं स्वामीची सेवा निष्ठेनें केली; हल्लीं हेही सेवा निष्ठेनें करीत आहेत; यांचें वंशपरंपरेनें चालवणें अवश्य जाणून स्वामी याजवरी कृपाळू होऊन, परगणेमजकूर येथील मुकासबाबेचे ऐवजापैकीं यास दररोज रुपये २ दोनप्रमाणें बारमाही सालिना रुपये ७२० सातशेंवीस यांसी वंशपरंपरेनें नेमणूक करून दिली असे. तरी तुह्मीं सदरहूप्रमाणें परगणे मजकूरचे मुकासबाबेचे ऐवजापैकीं दररोज रुपये दोनप्रमाणें सालिना सातशेंवीस रुपये साल दरसाल यांसी व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें प्रविष्ट करीत जाणें. येविशीं पत्रें:—

१ कमाविसदार निसबत मुकाशी. १ लाला प्रतापराव याचे नांवें मुख्यपत्र. १ देशमुख व देशपांडे परगणे मजकूर. १ राजश्री बाळाजी पंडित प्रधान. १ राजश्री उदाजी व मानाजी पवार. एकूण ५.

[ ९४ ] मौजे राजुरी तर्फ बेलापूर परगणे संगमनेर संमत मजकूर सुज्रो खुदस्ते बुनियाद.

इ. स. १७४७-४८.
समान अर्बैन मया व अलफ.
रबिलावल २७.

हा गांव पेशजीं राजश्री स्वामी मोगलाईत होते तेसमयीं कर्ज जगन्नाथभट यानें दिलें होतें ह्मणून त्यास इनाम दिला होता. त्यास तो मजकूर मनास आणितां तिघे भाऊ एकत्र असतां केशवभट यानें कर्ज महाराज स्वामींस दिलें होतें ह्मणून विदित जाहलें. त्याजवरून गांव तिघांस दिल्याबद्दल नांवनिशी राघवभट बिन रामभट व दामोदरभट बिन केशवभट व केशवभट

---

( 93 ) When the Raja was in the hands of the Mogals, he had the

A. D. 1747-48.

Jahagir of Khargaon given to him. Prataprao's father Gulabrao was then with him, and for his fidelity an allowance was given to his son. (Prataprao)

( 94 ) A debt having been advanced by Jagannatha Bhat Lokhande

A. D. 1747-48.

to the Raja while he was in the hands of the Mogals, a village was afterwards given in Inam to him for his services.

बिन जगन्नाथभट उपनाम लोखंडे गोत्र भारद्वाज सूत्र आश्वलायन शाखा वाजसनी ज्योतिषी मौजे मजकूर या त्रिवर्ग भावांस हल्लीं इनाम दिला तेविशीं पत्रें:—

२ फडणिशी. (१) इनामपत्र त्रिवर्गांचे नांवें, (१) गांवास. ४ चिटणिशी. (१) देशमुख व देशपांडे. (१) देशाधिकारी. (१) राजश्री बाळाजी पंडित प्रधान. (१) बुबाजी पवार विश्वासराव यांस.

इ. स. १७४८—४९.
तिसा अर्बैन मया व अलफ.
रमजान ११.

[ ९५ ] तेरीख ११ रोज भाद्रपद शुद्ध चतुर्दशी गुरुवासर ते दिवशीं अस्तमानीं धाकटी धनीण जेजोरीस मृत्यु पावली. ते दिवशीं महाराज निघोन दुसरे दिवशीं तिसरे प्रहरीं माहुलीस आले. शके ७१ विभव संवत्सरे.

इ. स. १७५०—५१.
इहिदे खमसैन मया व अलफ.
जिल्हेज ७.

[ ९६ ] तेरीख ७ जिल्हेज सुहूसन इहिदे खमसैन मया व अलफ कार्तिक शुद्ध नवमी रविवासर शके ७७ प्रमोद नाम संवत्सरे. मुकाम या पत्राच्या मथळ्यावर महाराज राजा राम साहेब असें लिहिलें आहे.

[ ९७ ] समस्त घोड्याचें सामान दसऱ्यास आणिलें होतें तें तुम्हीं कारखानियास जाऊन

इ. स. १७५२—५३.
सलास खमसैन मया व अलफ.
साबान ७.

अंताजी खंडेराव याजबरोबर पाठविलें. बितपशील :—सोनियाचें सामान:—२ जीन, २ कंडें, २ पट्टे, १ चोइत्या जोडा, एकूण ७. रुप्याचें:—४ कंडे. ४ पट्टे, २ दुमच्या, १ इलास वजा जोड, ३ चरका जोड एकूण ११. येणेंप्रमाणें पाठवणें. पत्र १.

[ ९८ ] धनाजी चौगुला मौजे माहुली संमत निंब प्रांत वाई यांसी ताकीद जे, नाईकजी

इ. स. १७५२—५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल ५.

चौगुला मौजे मजकूर यासी मौजे मजकुरीं सौभाग्यवती सगुणाबाईची बाग बिघे ८९ आहे त्याची निगादास्त व समाधीची पूजा करावयाबद्दल आज्ञा करून मौजे मजकूरपैकीं वेतनाचे ऐवजीं

---

( 95 ) The youngest wife of the Raja died at Jejuri in the evening.

A. D. 1748-49.

The Raja then left the place, and returned to Mahuli on the next day in the afternoon.

A. D. 1750-51.

( 96 ) The words Maharaja Rajaram Sahib appear at the beginning of this diary.

A. D. 1752-53.

( 97 ) This gives a list of the gold and silver riding furniture of the Raja.

( 98 ) There was a tomb of Lady Sagunabai at Mahuli in Samat

A. D. 1752-53.

Nimb in Prant Wai. A piece of Inam land was assigned for service in connection with the tomb.

जमीन बिघे ८१० पावेतों दिली आहे, ते खाऊन समाधीची पूजा व बागेची दास्त करील त्यासी कजिया करायासी तुजला प्रयोजन नाहीं ह्मणून पत्र, नाईकजी चौगुला मौजे मजकूर यासी वेतनांत जमीन बिघे ८१०.

[ ९९ ] राजश्री स्वामी गडावरून खालीं उतरून सिंहासनारूढ जाहले तेसमयीं ब्राह्मणांस इनाम जामिनी वहीत अवल दुम दोन प्रतीची स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व हक चवथाई व सरदेशमुखी व सावोत्रा व नाडगौंडी कुलबाब व कुलकानु हलीपट्टी व पेस्तरपट्टी जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसीहत खेरीज हकदार करून.

इ. स. १७६२–६३. सलास सितैन मया व अलफ. रमजान १२.

६ वेदमूर्ति राजश्री जनार्दनभट बिन नारायणभट उपनाम सातपुत्रे गोत्र वसिष्ठ सूत्र आश्वलायन ज्योतिषी मौजे भुइंज व धर्माधिकारी कसबे वाई यासी संमत हवेली परगणे मजकूरपैकीं चावर -॥-. मौजे पांचवड -।-. मौजे कळंबे -।-. एकूण -॥-. येविशीं पत्रें:—३ सनदी पत्रें. १ मुख्य पत्र, २ मोकदमास. ३ चिटणिशी पत्रें:—१ देशमुख व देशपांडे, १ राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान, १ राजश्री नारो पंडित प्रतिनिधि, एकूण ६. व आणखी तीन ब्राह्मणांस.

कैलासवासी मातोश्री आईसाहेब यांचे दशम एकादशम दिवशीं भूमिदान व जमीन इनाम वहीत अवल दुम दोन प्रतीची स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व हक चौथाई व सरदेशमुखी व सावोत्रा व नाडगौंडी कुलबाब व कुलकानु हलीपट्टी व पेस्तरपट्टी जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसहित खेरीज हकदार करून पत्रें.

९ वेदमूर्ति राजश्री जानजोशी बिन त्रिंबक जोशी उपनाम ढेंकणे गोत्र अत्रि सूत्र आश्वलायन वास्तव्य शाहूनगर यास मौजे वेंचले तालुके सातारा जमीन चावर -।१० चाळीस बिघे. पत्रें:—२ सनदी मुख्य पत्र व गांवांस. ३ चिटणिशी राजश्री प्रतिनिधि व देशाधिकारी व देशमुख व देशपांडे एकूण ९. व आणखी नऊ ब्राह्मणांस.

९ वेदमूर्ति राजश्री यज्ञेश्वर दीक्षित बिन विनायक दीक्षित उपनाम आठले गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन वास्तव्य श्रीक्षेत्र काशी यासी कैलासवासी मातुश्री

---

(99) Inams were given to Brahamins on the occasion of the Raja's leaving the fort and ascending the throne, and also in connection with the obsequies of Matushri Aisaheb.

A. D. 1762-63.

A village was also granted in Inam in fulfilment of a promise made by Matushri Aisaheb on the occasion of an eclipse.

आईसाहेब यांनीं ग्रहणपर्वी धारादत्त मौजे भणंग तर्फ मेढें हा गांव दरोबस्त स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व हकचौथाई व बाबती व सरदेशमुखी व सावोत्रा व नाडगौंडी व धारकरी कुळबाब व कुलकानु हल्ली-पट्टी व पेस्तरपट्टी जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसहित खेरीज हकदार व कदीम इनामदार व सरकार कुरण करून इनाम. २ सनदी मुख्य पत्र व गांवांस. ३ चिटणिशी राजश्री प्रतिनिधि व सुभेदार व जमीदारास. एकूण ५.

## राजकीय (ब) इतर माहिती.

### पेशवे.



(१००) पंत प्रधान.

१ शामराज निळकंठ रांजेकर:—

कधीं नेमिले त्याजबद्दल शाहूदप्तरीं दाखला नसोन कागद पत्र दप्तरीं नाहींत. शिवाजी महाराजांचे कारकीर्दीत हे पेशवे होते ह्मणोन प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरीं एक याद आहे त्यांत लिहिलें आहे. सरंजाम दिलेबद्दलचे कागद दप्तरीं नाहींत.

२ मोरो त्रिमल पिंगळे:—

कधीं नेमिले त्याजबद्दल शाहूदप्तरीं दाखला नसोन कागदपत्र दप्तरीं नाहींत. शिवाजी महाराजांचे कारकीर्दीत हे पेशवे होते ह्मणोन प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरीं एक याद आहे त्यांत लिहिलें आहे. सरंजाम दिलेबद्दलचे कागद दप्तरीं नाहींत.

३ निळकंठ मोरेश्वर:—

मोरो त्रिमल यांचे पुत्र निळकंठ मोरेश्वर यांस राजशक ८ दुर्मति नाम संवत्सरे शके १६०३ रोजीं संभाजी महाराज यांनीं नेमिले. सरंजाम दिलेबद्दलचे कागद दप्तरीं नाहींत.

(100) The information under this head is taken not from the diaries but from a memo prepared and kept in the records of the Satara Raja.

1 Shamraj Nilkanth Ranjekar appears to have acted as Pant Pradhan during the reign of Siwaji [vide a memo in the private records of Raja Pratapsinh.]

2 Moro Trimal Pingle appears to have acted as Peshwa during Siwaji's reign. [vide above]

3. Nilkanth Moreshwar, son of Moro Trimal, was appointed Peshwa in 1681 by Raja Sambhaji.

४ परशराम त्रिंबक प्रतिनिधिः—

परशराम त्रिंबक प्रतिनिधि यांस पेशवाईचीं वस्त्रें दिलीं, शके २१ प्रमाथी नाम संवत्सरे शालिवाहन शके १६२१. सहा महिनेपर्यंत होते. कारकीर्द राजाराम. सरंजाम दिलेबद्दलचे कागद दुसरीं नाहींत.

५ बहिरो मोरेश्वर पिंगळे :—

कधीं नेमले याबद्दल दाखला नसोन शाहू महाराज यांनीं नेमले; अशर मया व अलफचे कागदीं यांस प्रधान असें लिहिलें आहे. सुभा प्रांत कल्याण वगैरे महाल सरंजामास.

६ बाळकृष्ण वासुदेव :—

अर्वा. याप्रमाणें खतावलेला अवर्जा कोरा आहे. त्यांत यांस प्रधान असें लिहिलें आहे. दुसरे कागद नसल्यामुळें समजत नाहीं.

७ बाळाजी विश्वनाथ भट :—

पेशजीं सेनाकर्ते ह्मणोन हुद्दा होता तो दूर करून पेशवाई सांगितली छ ९ जिलकाद सुरुसन अर्बा अशर मया व अलफ. महाल १६ किल्ले २ सरंजामास.

८ बाजीराव बल्लाळ :—

पेशजीं बाळाजी विश्वनाथ मुख्य प्रधान होते ते मृत्यु पावले सबब त्यांचे पुत्र बाजीराव

---

4 Parasharam Trimbak Pratinidhi:—

Parashuram Trimbak Pratinidhi was appointed to the post of the Peshwa in A. D. 1699 by Rajaram. He served for 6 months.

5 Bahiro Moreshwar Pingle:—

The date of his appointment cannot be ascertained. But he was serving as Peshwa in A. D. 1709-10.

Prant Kalyan &c. were assigned to him as Saramjam.

6 Balkrishna Vasudeo:—

The date of his appointment cannot be ascertained.

7 Balaji Vishwanath Bhat:—

Balaji Vishwanath Bhat who formerly held the office of Senakarte was made Peshwa on 9th Jilkad in A.D. 1713-14.

16 Mahals and 2 forts were assigned to him as Saramjam.

8 Bajirao Ballal :—

After the death of Balaji Vishwanath, the Prime Minister, his son Bajirao Ballal was made the Prime Minister on 20th Jamadilakhar in A. D. 1719-20.

बल्लाळ यांस पेशवाईचा धंदा सांगितला. छ २० जमादिलाखर सुरुसन अशरीन मया व अलफ मुकाम मसूर. १३००० सालिना होन, शिवाय सरंजामीं महाल वगैरे.

९ बाळाजी बाजीराव प्रधान :—

पेशजीं बाजीराव पंडित प्रधान होते ते वैशाख बहुल द्वादशी रौद्र नाम संवत्सरे रोजीं मृत्यु पावले सबब त्यांचे पुत्र बाळाजी बाजीराव पंडित प्रधान यांस पेशवाई सांगितली, छ ११ रबिलाखर सुरुसन इहिदे अर्बैन मया व अलफ राजशके ६७ रौद्र नाम संवत्सरे आषाढ बहुल द्वादशी सौम्यवासर मुकाम शाहूनगर.

१३००० सालिना होन, शिवाय सरंजामीं महाल वगैरे.

१० माधवराव बल्लाळ प्रधान :—

इसन्ने सितैन मया व अलफ शके ११८३ वृषा नाम संवत्सरे मिति आषाढ शुद्ध ५ बाळाजी बाजीराव मृत्यु पावले सबब माधवराव बल्लाळ यांस हुजूरचीं वस्त्रें दिलीं. वहिवाट वर्षे ११.

११ नारायणराव बल्लाळ :—

शके ११९४ नंदन नाम संवत्सरे मार्गशीर्षमासीं माधवराव बल्लाळ मृत्यु पावले सबब वस्त्रें झालीं. वहिवाट महिने ८९.

---

His Saramjam consisted of 13000 Hons and some Mahals &c.

9 Balaji Bajirao Pradhan:—

Balaji Bajirao Pandit Pradhan was made the Peshwa on 11th Rabilakhar in A.D. 1740-41 at Shahunagar on the death of his father Bajirao Ballal.

13000 Hons and some Mahals &c were assigned to him as Saramjam.

10 Madhavrao Ballal Pradhan:—

Balaji Bajirao died on the 5th day of bright fortnight of Ashadha in A. D. 1761-62 and Madhavrao Ballal was given the clothes of the Peshwaship.

11 Narayanrao Ballal:—

Narayanrao Ballal was made the Peshwa after the death of Madhavrao Ballal in the month of Margashirsha in the year 1772.

१२ रघुनाथ बाजीराव:—

शके १६९५ विजय नाम संवत्सरे, नारायणराव यांस रघुनाथ बाजीराव यांनीं मारून वहिवाट आपणच केली. अजमासें माहिने ८६. वस्त्रें दिल्याचा दाखला नाहीं.

१३ माधवराव नारायण:—

शके १६९६ जय नाम संवत्सरे सालीं माधवराव नारायण यांचा जन्म पुरंदरीं जाला. त्यापासून वहिवाट शके १७१७ राक्षस नाम संवत्सरे अश्विन अखेरपर्यंत झाली. वर्षे २२८६.

१४ बाजीराव रघुनाथ:—

शके १७१७ राक्षस नाम संवत्सरे कार्तिक मासापासून बाजीराव रघुनाथ वहिवाट २२ वर्षे. शके १७३९ ईश्वरी नाम संवत्सरे अश्विनअखेर राज्यभ्रष्ट होऊन ब्रह्मवर्तास गेले.

पंत प्रधान ह्यांचे दिमतीचे व फडनिशींचे व मुतालकींचे वगैरे इतर लोक होते ते:—

१ कर्णाजी शिंदे. १ खंडेराव दाभाडे. १ खंडोजी सेनवल. १ खंडेराव भगवंत. १ गुणाजी सांवत. १ गोरोजी लेखक. १ गंगाजी काशी. १ चंद्रचूड. १ चिमणाजी बल्लाळ. १ जाऊजी लखोट. १ नारो काशी. १ पंताजी शिवदेव. १ पांडुरंग काशी. १ पदाजी व जाऊजी हेमाडे. १ बापूजी श्रीपत. १ बहिरो पंडित. १ महादाजी

12 Raghunath Bajirao:—

Raghunath Bajirao, having caused the death of Narayanrao Ballal, acted as Peshwa for about 6 months. There is no record to show that he was invested with the clothes of Peshwaship by the Satara Raja.

13 Madhavrao Narayan:—

Madhavrao Narayan was born at Purandhar in A. D. 1774 and acted as Peshwa from the day of his birth till the end of Ashwin A. D. 1795.

14 Bajirao Raghunath:—

Bajirao Raghunath acted as Peshwa from the month of Kartic in the year A. D. 1795 till 1817.

The following is a list of the Fadnis' the Mutaliks and others who were in the service of the Peshwas:—

1 Karnaji Shinde. 1 Khanderao Dabhade. 1 Khandoji Senval. 1 Khanderao Bhagvant. 1 Gunaji Sawant. 1 Goroji Lekhak. 1 Gungaji Kasi. 1 Chandrachud. 1 Chimnaji Ballal. 1 Jauji Lakhota.

गंदाधर. १ मल्हार खंडेराव चिटणीस. १ मल्हार दादाजी. १ राघोराम सबनीस. १ रामचंद्र महादेव. १ रायाजी गरुड. १ रंगराव उद्धव. १रघुजी भोसले. १ रामचंद्रपंत वाकनीस. १ लक्ष्मण जानाजी. १ येशवंतराव महादेव. १ येसजी कानदकर. १ हणगोजी कोकाटे. १ विसाजी कृष्ण. १ सोनजी ठोसर. १ सखोजी शिंदे. १ सखोजी कद्री. १ शिवाजी मानाजी सावत. १ सोनजी सावत. १ हशम लोक. १ हुजुरात. १ होनाजी बालकवडा. १ हरजी भांगारे. १ अबाजी त्रिंबक. १ आनंदराव सहदेव.

**हुडेकरी फडणीस**:—१ नरसो तमाजी. नारो गंगाधर. १ मल्हार तुकदेव.

**मुतालिक**:—१ राघो गणेश. १ रामचंद्र महादेव. १ कृष्णाजी अप्पाजी. १ महादाजी कृष्ण. १ महादाजी आबाजी पुरंधरे. १ चिमणाजी बल्लाळ. १ नारो केशव.

**सभासद**:—१ राघोजी अनाजी.

**चिटणीस**:—१ मल्हारराव बल्लाळ.

[१०१] दिमत राजश्री बाळाजी विश्वनाथ सेनाकर्ते यासी लष्करचा जमाव करावयाची आज्ञा करून जमावाचे बेगमीबद्दल सरंजाम दिला. छ १७ रजब सुरुसन इसन्ने अशीक भाद्रपद बहुल पंचमी भौमवासर मुक्काम किल्ले सातारा:—

इ. स. १७१०-११.
इसन्ने अशर मया व अलफ.
रजब १७.

1 Naro Kasi. 1 Panteji Sivdeo. 1 Pandurang Kasi. 1 Padaji and Jauji Hemade. 1 Bapuji Shripat. 1 Bakiro Pandit. 1 Mahadaji Gadadhar. 1 Malhar Khanderao Chitnis. 1 Malhar Dadaji. 1 Raghoram Sabnis. 1 Ramchandra Mahadeo. 1 Reyaji Garud. 1 Rangrao Udhava. 1 Raghuji Bhosle. 1 Ramchandra-pant Vaknis. 1 Laxman Janaji. 1 Yeshwantrao Mahadeo. 1 Asaji-Kanadkar. 1 Hanagoji Kokate. 1 Visaji Krishna 1 Sonaji Thosar. 1 Sakhoji Shinde. 1 Sakhoji Kadri. 1 Shivaji Manaji Sawant. 1 Sonaji Sawant. 1 Hasham Loka. 1 Huzur. 1 Honaji Balakawada. 1 Harkaji Bhangare. 1 Abaji Trimbak. 1 Anandrao Sahadeo.

HUDEKARS PHADNIS.— 1 Narso Tamaji. 1 Naro Gangadhar. 1Malhar Tukdeo

MUTALIKS.—1 Ragho Ganesh. 1 Ramchandra Mahadeo. 1 Krishaji Appaji. 1 Mahadaji Krishna. 1 Mahadaji Abaji Purandhare. 1 Chimnaji Ballal. 1 Naro Keshav.

MEMBERS.—1 Raghoji Anaji.

CHITNIS.—1 Malharrao Ballal.

A. D. 1710-11.

(101) Balaji Vishwanath Senakarte was directed to raise an army and a Saranjam worth 2510200 was given him for the purpose.

२११११९०० महाल:—(२०८३००० मुकासे, ८३९०० बाबती चाहूर ८.) ३४३७०० देहेमुकासे ४००, एकूण २९१०२००.

[ १०२ ] राजश्री बाजीराव बल्लाळ, राजश्री बाळाजी विश्वनाथ मुख्य प्रधान याचे पुत्र.

इ. स. १७१०-११. अशरीन मया व अलफ. जमादिलाखर २०. १८.४.१७२०

राजश्री बाळाजी विश्वनाथ मृत्यु पावले याकरितां त्याचे पुत्र राव मशारनिल्हे याजवरी स्वामी कृपाळु होऊन पेशवाईचा धंदा सांगितला, छ २० जमादिलाखर. बितपशील तैनात सालिना' होनु' पादशाही १३०००.

सरंजाम मुकासे देखील बाबती छ १९ रजब.

| | देहे. | | देहे. |
|---|---|---|---|
| प्रांत वाई. | २ | कसबा सिन्नर प्रांत संगमनेर. | १ |
| प्रांत पुणें. | ४ | मौजे कुसवे परगणे नेर प्रांत खानदेश. | १ |
| कसबा नारायणगांव व प्रांत जुन्नर. | १ | तर्फ पौनमावळ. | २ |
| प्रांत दौलताबाद. | ३ | तर्फ वाजे प्रांत कल्याण. | २ |
| मौजे गोषळ तर्फ चिपळूण प्रांत दाभोळ. | १ | कसबा खेड प्रांत जुन्नर जास्ती सालमजकुरीं. | १ |

[ १०३ ] राजश्री बाळाजी बाजीराव पंडित यासी पेशवाई सांगितली. छ ११ रबिलाखर

इ. स. १७४०-४१. इहिदे अर्बैन मया व अलफ. रबिलाखर ११.

सुाा इहिदे अर्बैन शके १७ रौद्रनाम संवत्सरे आषाढ शुद्ध १२ सौम्यवासर मुकाम शाहूनगर सातारा यासी तैनात बरहुकूम माजीप्रमाणें होन. पादशाई होन १३०००.

यासी वस्त्रें दिलीं

वस्त्रें:—१ मंदील सरासरी. १ झगा जामेवार मोतेचूर. १ चादर. १ पटका १ इजार. एकूण ५.

---

A.D. 1710-11.

(102) Bajirao was appointed to the office of Prime Minister on the death of his father on the 2nd of Jamadilakhar in 1719–20 and his salary was fixed at—13000 [Hons imperial.]

A. D. 1740-41.

(103) Balaji was appointed to succeed his father Bajirao on 11th Rabilakhar on the same salary as his father.

Some clothes, a seal and an elephant were presented to him on the occasion.

किता:—१ तरवार. १ कटार शिकेसमेत. तुरा मोतियाचा. १ हत्ती राजश्री देवरामाकडून देविला समेत अंबारी. एकूण ४.

इ. स. १७१९-२०.
अशरीन मया व अलफ.
सवाल ३.

[ १०४ ] राजश्री बाळाजी विश्वनाथ उपनाम भट यास नूतन इनाम देर्हील तिजाई:—१ परगणे जळगांव प्रांत वऱ्हाड देखील तिजाई व जकात. १ कसबा सासवड मोगलाई तर्फेनें कुल देखील तिजाई, इनाम व जकात. एकूण २.

इ. स. १७२५-२६.
सित अशरीन मया व अलफ.
रमजान १.
२३-४-१७२६

[ १०५ ] किता पत्रें जे, प्रांत गुजराथ व माळवा येथील तह राजश्री अबाजी त्रिंबक मुतालिक दिमत राजश्री पंत प्रधान यानीं सरबुलंदखान याजपाशीं चौथाई व सरदेशमुखीचा तह केला आहे. तरी तुम्हीं प्रांत मजकूरचा चौथाईचा आकार होईल त्यापैकीं बाबती वजा करून राहिला ऐवज मुकासबाब निमे राजश्री चिमणाजी बल्लाळ याजकडे व निमे राजश्री त्रिंबकराव दाभाडे याजकडे पावले तरी तुम्हीं त्याप्रमाणें उपसर्ग न करणें म्हणून पत्र:—

१ राजश्री कंठाजी कदम. १ राजश्री पिलाजी गायकवाड. १ राजश्री अबाजी पंताचा जाब. एकूण ३. See p. 118 इतिहाससंग्रह

इ. स- १७२५--२६.
सित अशरीन मया व अलफ.
साबान १०.

[ १०६ ] राजश्री बाजीराव बल्लाळ यासी कसबे पुणें प्रांत मजकूर हा गांव पेशजींच्या मुकाशाकडून दूर करून हल्लीं स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देर्हील इनाम. तिजाई, वंशपरंपरेनें इनाम देहे १. एकूण सनदा चैत्र शुद्ध दशमी गुरुवासर उपनाम भट, गोत्र गार्ग्य, शाखा आश्वलायन.

---

A. D. 1719-20.

(104) The villages of Pargana Jalgaon in Prant Berar and Kasbe Saswad were given in Inam to Balaji Vishwanath Bhat.

A. D. 1725-26.

(105) Abaji Trimbak Mutalik of Pant Pradhan had settled with Sarbulandkhan for the surrender of the Chauthai and Sir Deshmukhi of Prant Guzarath and Malwa. Pilaji Gaikwad and Kantaji Kadam were directed to divide the portion representing Mokas-bab equally between Chimnaji Ballal and Trimbakrao Dabhare.

A. D. 1725-26.

(106). The Kasba of Poona was given in Inam to Bajirao Ballal.

[१०७.] राजश्री चिमणाजी बल्लाळ यासी पत्र जे, प्रस्तुत छावणीचे दिवस समीप आले व पुढें चातुर्मास्यामध्यें कित्येक मनसुबा करावा लागतो. याकरितां राजश्री बाजीराव पंडित प्रधान यासही संनिध यावयाची आज्ञा केली आहे. तुह्मीं त्या प्रांतें गुंतोन न राहणें. लष्करचाही प्रसंग तुह्मांस कळतच आहे. याकरितां कुल फौजेनिशीं स्वामीच्या दर्शनास येणें व उदाजी पवार यासही घेऊन येणें. या कामास जासूद दिमत लवे पाठविले यासी रुपये:—

इ. स. १७२८--२९.
तिसा अशरीन मया व अलफ.
सवाल ५.

४० हरजी मोरा. ४० संताजी काळकुटा. ४० लिंगोजी यादव. एकूण १२०.

चैत्र बहुल दशमी भृगुवासर खास दस्तक करून दिलें असे.

[१०८] चिमणाजी बल्लाळ यासी राजश्री प्रधान पंताची हुजूरची मुतालिकी सांगितली असे. यासी वस्त्रें:—१ शेला अष्टगोली. १ मंदील. एकूण २.

इ. स. १७२८--२९.
तिसा अशरीन मया व अलफ.
जिलकाद २१.

विश्वासराव बल्लाळ यासी पेशजीं प्रधानपंताची मुतालिकी होती ते दूर करून हल्लीं सरदारीस लष्करांत पाठविलें असे. १ मंदील अष्ट-गोली. १ शेला. एकूण २. १ कलगी. १ कडें जडावाचें. १ तरवार. १ ढाल. एकूण ७.

इ. स. १७२९-३०.
सलासीन मया व अलफ.
मोहोरम १८.

[१०९] राजश्री कृष्णाजी पवार यास पत्र जे, राजश्री बाजीराव पंडित प्रधान आले. पुढें कित्येक मनसुबेयाचा विचार तुह्मांस आहे. हुजूर यावें लागतें तर देखतपत्र हुजूरदर्शनास येणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३४-३५.
खमस सलासिन मया व अलफ.
जमादिलाखर १८.

[११०] छ मजकूर राजश्री प्रधानपंत व सेनापति यांचें सख्य राजश्री स्वामींनीं केलें.

---

(107) Chimnaji Ballal was directed as the rains were at hand and as several plans were to be arranged during the monsoon to come with his army to the Raja. He was informed that similar orders were issued to Bajirao Pradhan.

A. D. 1728-29.

(108) The office of Huzur Mutalik to the Peshwa was taken from Vishwasrao Ballal and was conferred on Chimnaji Ballal. Vishwasrao Ballal was made a Sirdar in the army. Clothes were presented to both of them.

A. D. 1728-29.

(109) Krishnaji Powar was informed that Bajirao Pandit Pradhan had come to the Huzur and that as some important matters were to be discussed, he should come at once.

A. D. 1729-30.

(110) Reconciliation between the Pant Pradhan and the Senapati was effected by the Raja.

A. D. 1734-35.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
सफर १६.

[ १११ ] किता ताकीदपत्रें राजश्री बाजीराव पंडित प्रधान याकडे देहाय मुकामे पेशजीं आहेत तेणेंप्रमाणें हलीं करार असे. प्रांत वऱ्हाडः—

संमत नरनाळा.

१ मौजे आडगांवखुर्द परगणे आडगांव.
१ मौजे येकंकेरे परगणे बाणविहीर.
१ मौजे भालेगांव परगणे पिंपळगावराजा.
१ मौजे उडणगांव परगणे आकोट.
१ मौजे शिरपूर परगणे दहिवडे.
१ मौजे धणेगांव परगणे मलकापूर.
१ मौजे दलेवार परगणे कुरुंदखेड.
१ मौजे जवळे परगणे नांदेड.
१ मौजे उगवे परगणे आकोलें.
१ मौजे शिरमुली परगणे वडनेरगंगाई.
१ मौजे आकोली परगणे पणजमहागाव.
१ मौजे भोंड परगणे चादूर.
२ परगणे बाळापूर.
 १ मौजे खदारी.
 १ मौजे मस्तो. एकूण २.
१ मौजे नांदेड परगणे कनरूड.
१ कसबे सोनवळे परगणे मलकापूर.
१ मौजे शिराळे परगणे गरुमावरगांव. एकूण १७.

संमत गावळ.

१ मौजे धणेगाव परगणे अंजनगाव सुर्जी.
१ मौजे नांदेड परगणे नांदगांव पेठ.
१ कसबा नेर परगणे चांदूर.
१ मौजे गाईवाडी परगणे माने.
१ मौजे मुरली परगणे करंजगाव.
१ मौजे उदखेड परगणे मलखेड.
१ कसबे शिरसगाव परगणे मलकूर.
१ मौजे बोरखेड परगणे बाळापूर.
२ परगणे वडनेर बिबीचे. पैकीं
 १ मौजे सातफळ.
 १ मौजे अंजनगाव. एकूण २.
१ मौजे टाकळखेड परगणे कुराव एकूण ११.
मौजे [illegible] परगणे तळेगाव, दहा महस्राचा समत कल्वा.
मौजे मुणगाव परगणे जामत प्रांत खानदेश देह १.

एकूण देहाय ३० पत्रें. अधिक मास [illegible] प्रतिपदा [illegible].

[ ११२ ] राजश्री बाळाजी बाजीराव पंडित यांसी पेशवाईचीं वस्त्रें. शिरस्तेदेऊन पेशवाई सांगितली. वस्त्रें:— १ मंदील सरासरी. १ झगा [illegible] मोतेसूर. १ चादर. १ पटका १ इजार. १ [illegible]. १ कट्यार. १ तुरा

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
रबिलाखर ११.

(111) Orders were issued directing that 30 villages of Prant Berar should be continued as Saranjam to Bajirao Pandit Pradhan as before.

A. D. 1740-41.

(112) On this day corresponding with the 12th date of the bright half of Ashadha, Balaji Bajirao was invested with the clothes of Peshwaship.

A. D. 1740-41.

मोतियाचा. १ हत्ती देवरामाकडून देविला समेत अंबारी. राजश्री चिमणाजी बल्लाळ पंडित यांस बहुमानांचीं वस्त्रें दिलीं. वस्त्रें:—१ मंदील. १ झगा जामेवार मेतेचूर. १ चादर. १ पटका. १ इजार. १ तुरा मोतियाचा. एकूण ९.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
रबिलाखर ११.

[ ११३ ] राजश्री महादाजी आबाजी यासी पेशव्याची मुतालकी आहे त्याप्रमाणें करार करून वस्त्रें दिलीं:—१ मंदील कुसुंबी. १ पासोडी पैठणी फुटाणीवजा सफेत. एकूण २.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
जमादिलाखर ४.

[ ११४ ] कित्ता एक पत्रें तीथवार छ मजकूर राजश्री बाजीराव पंडित प्रधान यासी मुकासे गांव होते. ते शांत जाहले. हल्लीं याचे पुत्र राजश्री बाळाजी बाजीराव पंडित प्रधान याकडे वेतनाचे ऐवजीं मुकासे दिल्हे असत. प्रांत वऱ्हाड याकडे रुजू होऊन मुकासबाबेचा ऐवज सुरळीत वसूल देणें. येविशीं पत्रें:—

३० फडणिशी पत्रें गांवगन्ना.

| सरकार नरनाळा. | सरकार गोवळ. |
|---|---|
| १ मौजे आडगांव खुर्द परगणे आडगांव. | १ मौजे धणेगाव परगणे अंजनगांव सुर्जी. |
| १ मौजे येकक्रेरे परगणे बाणविहीर. | १ मौजे नांदेड परगणे नांदगाव पेठ. |
| १ मौजे उडणगाव परगणे आकोट. | १ कसबे नेर परगणे चांदपूर. |
| १ मौजे शिरपूर परगणे दहिवडे. | १ मौजे सुरुल परगणे करंजगांव. |
| १ मौजे धणेगाव परगणे मलकापूर. | १ कसबा शिरसगांव परगणे मजकूर. |
| १ मौजे दलेवार परगणे कुरुंदखेड. | १ मौजे बोरखेड परगणे सोलापूर. |
| १ मौजे जवळे परगणे नांदेड. | १ मौजे सातेफळ परगणे वडनेरबिबी. |

The following clothes and articles were presented to him on the occasion :—

1 Head Turban. 1 Long coat. 1 Embroidered cloth. 1 Cloth for the head. 1 Trousers. 1 Sword. 1 Dagger. 1 Pearl ornament. 1 Elephant (with furniture).

A. D. 1740-41.

(113) Mahadaji Ambaji was continued as Mutalik of the Peshwa as before.

A. D. 1740-41.

(114) Bajirao Pandit Pradhan having died, his Saramjam in Berar was assigned to his son Balaji Bajirao Pandit Pradhan in lieu of remuneration and orders were issued to the villages accordingly..

१ मौजे उगवे परगणे आकोले.
१ मौजे शिरसोली परगणे वडनेरगंगाई.
१ मौजे आकोळी परगणे पणजेमहागांव.
१ मौजे धाड परगणे चादूर.
१ मौजे नांदेड परगणे कनरूड.
१ मौजे शिरोळ परगणे महारगड.
१ कसबे सोनवळे परगणे मजकूर.
२ परगणें बाळापूर.
  १ मौजे पिंपरी.
  १ मौजे सस्ती एकूण २.
१ मौजे भालेगाव परगणे पिंपळगाव राजा एकुण १७.

१ मौजे अंजनगांव परगणे वडनेर बिबी.
१ मौजे गायवाडी परगणे माने.
१ मौजे उदूखेड परगणे मालखेड.
१ मौजे दाकळखेड परगणे.–
१ मौजे विरूर परगणे तळेगांव दहा सहस्रांचा सरकार कलबा देहे.
१ मौजे मुणगांव परगणे जाबूत सरकार असे प्रांत खानदेश देहे.

एकूण गांव ३०.

९ चिटणिशी साहित्य पत्रें. १ राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा, तीसगांव सदरहू-प्रमाणें यास उपसर्ग न देणें. १ राजश्री फत्तेसिंग भोसले मोघम. १ राजश्री राणोजी भोसले मोघम पत्र. १ बिवाजी कोंडे यांस (पुढें फाटलें आहे.) १ जानोजी मुइटे यास मौजे विरूफ विशीं परगणे तळेगांव दहा सहस्रांचा. एकूण ३९.

[११९] राजश्री बाळाजी पंडित प्रधान यासी पत्राचें उत्तर जे, राजश्री यशवंतराव दाभाडे सेनापति व सेनाखासखेल पुण्याहून पळोन गेले ते सातारा आले असतील. येथें आल्यामुळें तुह्मांस साहेबीं निम्मे गुजराथ दिली; व त्यानीं तुह्मांशीं करार केला त्यांत येथील आज्ञा करून

इ. स. १७५१–५२.
इसनै खमसैन मया व अलफ.
मोहरम १७.

(115) A reply to Balaji Pandit Pradhan:—

A. D. 1751-52.

'Your letter shows that you suspect that Yeshwantrao Dabhade Senapati Senakhaskhel, who has fled from Poona, may have come to Satara, and that he may, by a personal interview, so far interest us (the Raja) in his behalf as to induce us (the Raja) to withdraw from you the grant of half the Guzerath which has already been made, or to interfere with the terms of any agreement that he may have entered into with you. We wish to inform you that the Senapati has not come to the Huzur, and that even if he had, the fact would in no way have proved prejudicial to your interest. With a view to remove your suspicions, we formerly sent you, as a token of our good faith, a quantity of turmeric, and it is therefore unbecoming on your part that you should still continue to be suspicious. Rest assured that you stand in our good graces, and that

केल्या करारांत अंतर पाडतील व साहेबही त्यांचें अगत्य धरतील ह्मणून तुह्मांस संशय जाहला आहे ह्मणून हुजूर विदित जाहलें. ऐसीयास सेनापति व सेनाखासखेल हुजूर आले नाहींत. कदाचित् आले असते तथापि तुमचे नुकसानाचा प्रकार सहसा न घडतां तुह्मांस येथील संशय होतात याकरितां बेलभंडार पाठविला अद्यापवर संशय धरिता हे गोष्टी न आणणें. साहेबांची कृपा अंतःकरणापासून तुह्मांवरी जाहली, कांहीं किल्मिष राहिलें नाहीं. तुमचें न्यून तेंच पूर्ण करावें हेंच आवश्यक जाणून शत्रूचा उपमर्द तुमचे हातून करवावा. त्याचे साहित्यास राज्यांतील सरदार अनुकूल व्हावे ह्मणून आज्ञापत्रें व हुजरे रवाना केले. मागाहून वरचेवर आज्ञापत्रें व कारकून रवाना केले. रात्रंदिवस तुमचे साहित्याचीच तरतूद होत असती. याउपरी येथील कोणे गोष्टी संशय न धरितां निःसंशय होऊन शत्रूचा पराजय करणें. सेनापति पळाले त्याचा कांहीं संशय धराल तर, जर धरणें कोठेंही गेलें तथापि निंमे गुजराथ तुह्मांस दिल्ही, व त्यांनीं पैका कबूल केला तो त्यांस सुटतो असें नाहीं. त्यास ताकीद करून देविला जाईल ह्मणून छ मजकूर पत्र १.

[ ११६ ] राजश्री बाळाजी पंडित प्रधान यासी आज्ञा जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें पावलें. कित्येक सलाबतजंग यांस तंबी पोंहचवून सल्ला केला ह्मणून लिहिलें तर तुम्हीं तैसेच पुरातन पराक्रमी सेवक अहां. एकनिष्ठ सेवक आहां. दिवसेंदिवस जयतेचा विभव होईल ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सफर १८.

[ ११७ ] राजश्री यशवंतराव मोरे हवालदार व कारकून वर्तमान किल्ले रायगड यासी आज्ञा केली ऐशी जे, राजश्री विठ्ठलराव येशवंत खासनवीस यांचे निसबतीस किल्ला होता तो दूर करून हल्लीं राजश्री पंडित प्रधान यांजकडे दिला असे. येविशीं तुह्मांस पेशजीं मनद सादर

इ. स. १७७२-७३.
सलास सबैन मया व अलफ.
जमादिलावल ३०.

---

we shall never fail to do what is necessary to protect your interests. Orders have already been sent and messengers have been despatched to the Sirdars of the Kingdom to assist you in putting down the enemies of Government.

(116) The Peshwa informed the Raja that he had brought pressure to bear on Salabat Jung, and had concluded a treaty with him. The Raja replied that the Peshwa was a valiant servant of Government, and that he had the best wishes of the Raja for his further success.

A. D. 1752-53

(117) Orders were issued to Vithalrao Yeshwant Khasnawis to hand over the fort of Raygad and the Thanna of Mahad to Madhavrao Pandit Pradhan.

A. D. 1772-73.

झाली आहे तरी देखत सनद जाकिरासुद्धां पंडित मशारनिल्हे यांचे स्वाधीन करणें ह्मणोन पत्र १.

राजश्री हवालदार व कारकून विद्यमान ठाणें महाड यासी आज्ञा केली ऐसी जे, राजश्री विठ्ठलराव यशवंत खासनिसी यांचे निसनवीस ठाणें होतें, तें दूर करून हल्लीं राजश्री माधवराव पंडित प्रधान यांजकडे दिल्हें असे. येविशीं तुह्मांस पेशजीं सनद सादर झाली असे. देखत सनद जाकिरासुद्धां ठाणे पंडित मशारनिल्हे यांचे स्वाधीन करणें ह्मणोन पत्र १.

राजश्री विठ्ठल यशवंत खासनवीस यांस आज्ञा केली ऐशी जे, किल्ले रायगड व महाडाचें ठाणें तुमचे निसबतीस होतें तें दूर करून हल्लीं राजश्री माधवराव पंडित प्रधान याजकडे किल्ला व ठाणें दिल्हें असे. तरी देखत सनद जाकिरासुद्धां पंडित मशारनिल्हे यांचे स्वाधीन करून पावलीयाचें कबज घेणें ह्मणोन सनद १. परवानगी रुबरू राजश्री स्वामी शिक्के रुबरू.

इ. स. १७९३-९४.
अर्बा तिसैन मया व अलफ.
जमादिलावल. २४.

[ ११८ ] राजश्री सदाशीव अनंत उपनाम अभ्यंकर, गोत्र वासिष्ठ, सूत्र हिरण्यकेशी, शाखा तैतिर्य, खोत व महाजन मौजे कोंडे तर्फ मोदळ प्रांत राजापूर यांस दिलें, इनामपत्र ऐसी जे. तुह्मीं किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं आपण शाहूनगर येथें राजश्री माधवराव पंडित प्रधान यांचे वाड्यानजीक उत्तरेस नवीन देवालय बांधून श्रीची स्थापना केली आहे. तिचे पूजेऊर्जेस स्वामीनीं कांहीं नूतन इनाम देऊन चालविली पाहिजे ह्मणून विदित केलें. त्याजवरून मनास आणतां तुह्मीं देवालय बांधून श्रीची स्थापना केली आहे; त्याचे पूजाऊर्जा चालविलीया स्वामीस व स्वामीचे राज्यास श्रेयस्कर असें जाणून मौजे करंजें तर्फ सातारा येथें कीर्द तर्फ पैकीं पेशजीं महंमद अदल यास बागेस सात बिघे जमीन दिली होती. तो मयत होऊन नकल जाहले, सबब त्याजकडून दूर करून हल्लीं सदरहू अवल जमीन बिघे ८७ सात स्वराज्य व मोंगलाई एकूण इतकी देखील मरशेमुती व साबोत्रा व नाडगौंडी व कसरपंचोत्रा व इनाम तिजाईसुद्धां दरोबस्त कुलाबाब व कुलकानु हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण निधिनिक्षेपसहित, खेरीज हक्कदार करून श्रीचे पूजेऊर्जेस हुजुरून नूतन इनाम जमीन करार करून दिल्हीं असे. तरी तुह्मी सदरहूप्रमाणें सात बिघे अवल जमीन चतुःसिमापूर्वक आपले दुमाला करून घेऊन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें श्रीची पूजाऊर्जा करून जमीन इनाम अनुभवून सुखरूप राहणें जाणिजे ह्मणून, सनद १.

---

A. D. 1793-94.

(118) In a grant of land for the temple of Laxmi Narayan built at Satara by Sadashiv Anant Abhyankar Mahajan of Konde, it is stated that the temple was near the Peshwa's Wada and to the North of it.

# राजकीय (व) इतर माहिती.

## प्रतिनिधि.

इ. स. १७१०-११.
इहिदे अशर मया व अलफ.
जिल्काद ६.

[ ११९ ] राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि यांकडे छ ६ जिलकाद सन इहिदे जिल्हे राजश्री गदाधर प्रल्हाद याकडे होती ते दूर करून दिली.—

**मुलुखगिरी सुभेहाय.**—१ प्रांत राजापूर. १ प्रांत दाभोळ. १ प्रांत महिपतगड. प्रांत जावली. १ प्रांत मंगळगड. १ प्रांत वाई. १ प्रांत सातारा. १ प्रांत कऱ्हाड. १ प्रांत व्याघ्रगड. १ प्रांत मलकापूर. १ प्रांत पन्हाळा. १ प्रांत तारळे. १ प्रांत कोल्हापूर. १ प्रांत खटाव. १ प्रांत माण. १ प्रांत मिरज. एकूण १६.

**किल्लेहाय.** १—किल्ले विशाळगड. १ महिमतगड. १ प्रचीतगड. १ सारंगगड. १ जयगड. १ व्याघ्रगड. १ महिमलिनगड. १ रसाळगड. १ सुमेरगड. १ महिपतगड. १ मकरंदगड. १ प्रतापगड. १ मंगळगड. १ गहनगड. १ जंजिरे रत्नागिरी. १ कमळगड. १ पांडवगड. १ वैराटगड. १ वंदनगड. १ चंदनगड. १ कल्याणगड. १ वर्धनगड. १ संतोषगड. १ महिमानगड. १ वारागड. १ भूषणगड. १ सातारा. १ सज्जनगड. १ सुंदरगड. १ गुणवंतगड. १ वसंतगड. १ पन्हाळा. १ पावनगड. १ गगनगड. १ कोटकोल्हापूर. एकूण ३५.

---

(119) The office of Pratinidhi and the territory and forts under Gadadhar Pralhad were taken from him and made over to Parsharam Pandit Pratinidhi on 6th of Jilkad.

A. D. 1710-11.

PROVINCES.—1 Rajapur, 1 Dabhol. 1 Mahipatgad, 1 Jawli, 1 Mangalgad, 1 Wai, 1 Satara, 1 Karhad, 1 Vyaghragad, 1 Mulkapur, 1 Panala, 1 Tarale, 1 Kolhapur, 1 Khatav, 1 Man, 1 Miraj. Total 16.

FORTS.—1 Vishalgad, 1 Mahimatgad, 1 Prachitgad, 1 Sarangagad, 1 Jayagad, 1 Vyghragad, 1 Mahimalingad, 1 Rasalgad, 1 Sumergad, 1 Mahipatgad, 1 Makarandgad, 1 Pratapgad, 1 Mangalgad, 1 Gahangad, 1 Janjira Ratnagiri, 1 Kamalgad, 1 Pandavgad, 1 Vairatgad, 1 Vandangad, 1 Chandangad, 1 Kalyangad, 1 Vardhangad, 1 Santoshgad, 1 Mahimangad, 1 Waragad, 1 Bhushangad. 1 Satara, 1 Sajjangad, 1 Sundergad, 1 Gunwantgad, 1 Vasantgad, 1 Panala, 1 Pawangad, 1 Gagangad, 1 Kot Kolhapur. Total 35.

[ १२० ] कित्ता वतनपत्र छ ९ रमजान वतन सरदेशमुखी प्रांत कडेविलीत येथील पूर्वी कैलासवासी राजश्री काकासाहेबीं अजरामऱ्हामत करून दिलें त्याप्रमाणें अनुभवींत आलें. स्वामीनींही वतनाचीं पत्रें करून देऊन वतन चालविलें. त्यावरी छ २० सवाल सन इसने मशारनिल्हेकडून स्वामीसेवेस अंतर पडलें. हे सबबे अमानत करून हुजूर ठेवून जोत्याजी केदारकर यांचे स्वाधीन केलें होतें; ऐशीयास मशारनिल्हे स्वामीचे पुरातन सेवक, या राज्यामध्यें सहसाहस बहुतच करून राज्य अभिवृद्धीस पाविलें. प्रस्तुत स्वामींची सेवा निष्ठापूर्वक करितात; यांचें वंशपरंपरेनें चालवणें अगत्य जाणून स्वामी कृपाळू होऊन प्रांत मजकूरची सरदेशमुखीस वतन करार करून दिलें आहे. वतनाचा उपभोग करतील. या वतनास हक्क लाजिमा इनामत व हल्लीं पूर्वील मनदांप्रमाणें देत जाणें. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें ह्मणोन पत्रें:—

इ. स. १७१५-१६.
सित अशर मया व अलफ.
रमजान ९.

कमाविसदार सरदेशमुखी दिमत जोत्याजी देशमूख देशपांडे परगणे मजकूर.

देशाधिकारी वर्तमान भावी कित्ता मोकदमा महालानिहाय :—१ तर्फ नगर हवेली, १ तर्फ कडे, १ अष्टी, १ तर्फ रावीन, १ तर्फ जामखेड, १ तर्फ चांभारगोंदें. १ तर्फ पेडगांव १ परगणे कडेविलीत मोकदमानी १ देशमूख देशपांडे प्रांत मजकूर. एकूण ९.

[ १२१ ] राजश्री सदाशिव परशराम यासी आज्ञा केली ऐसी जे, राजश्री श्रीनिवासराव यास पेशजीं सरंजाम होता त्यास प्रतिनिधि सांगितली, आणि त्याकडील सरंजाम दूर करून स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन तुह्मांकडेस सरंजाम दिला असे. तर पोक्ती फौज करून स्वामीस संतोषवीत जाणें. ह्मणून पत्र १.

इ. स. १७१६-१७.
सबा अशर मया व अलफ.
सफर १८.

[ १२२ ] राजश्री नारो प्रल्हाद यासी छ प्रतिनिधि सांगून प्रतिनिधीचा जिल्हा स्वाधीन केला.

इ. स. १७२१-२२.
इसने अशरीन मया व अलफ.

---

(120) The Sir Deshmukhi Watan enjoyed by Parasharam Trimbak Pratinidhi was, for his unsatisfactory behaviour towards Government, attached on 20th Sawal of A. D. 1711-12. It was now released from attachment in consideration of his loyalty and the services previously rendered by him to Government.

A. D. 1715-16.

(121) Shrinivas Parasharam being appointed Pratinidhi, his former Saranjam was given to Sadashiv Parasharam and he was directed to keep up a large army.

A. D. 1716-17.

(122) Naro Pralhad was appointed Pratinidhi.

A. D. 1721-22.

वर्ष लिहिलें नाहीं.

[ १२३ ] राजश्री श्रीनिवास परशराम पंडित प्रतिनिधि वतन सालिना होनूपैकीं १५०००.

[ १२४ ] तर्फ साळशी प्रांत राजापूर येथें चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांजकडील अंमल होता त्यास तहामध्यें तर्फ मजकूर या तर्फेस आला. याकरितां तेथील अंमल राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि याचे स्वाधीन केला आहे. यांनीं आपले तर्फेनें तर्फ मजकुरास कमाविसदार पाठविले आहेत. तरी पेशजीं चिरंजीवाकडे निमा ऐवज पावत होता त्याप्रमाणें ऐवज याकडे वसूल देववगें ह्मणून पत्रें:—१ तर्फ मजकुरास पत्र बनाम देशमुख देशपांडे. १ सखाजी आंग्रे सरखेल. १ फोंड सावत भोसले. एकूण ३.

इ. स. १७३१-३२. इसन्ने सलासीन मया व अलफ. मोहरम १६.

[ १२५ ] सरंजाम राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि पेशजीं राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि यांजकडे सरंजाम होता, ते मृत्यु पावले. हल्लीं त्यांचे बंधु राजश्री मशारनिल्हे प्रतिनिधि यांजकडे मुकासे सनदा फडणिशीः--

इ. स. १७४७--४८. समान अर्बैन मया व अलफ. जमादिलाखर २६.

१६ कित्ता सरंजाम पेशजीं जमावाचे बेगमीबद्दल राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि यांजकडे मुकासबाब व बाबती होत्या ते शांत जाहले. हल्लीं त्याचे बंधु राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यांजकडे जमावाचे बेगमीबद्दल मुकासा दिला आहे. तरी तुह्मीं यांजकडील कमाविसदाराशीं रुजू होऊन वसूल सुरळीत देणें. पत्रें:—

६ बाबतींचे महाल:—३ संस्थान सोलापूर ( १ परगणे सोलापूर. १ परगणे अहिरवाडी. १ परगणे मंद्रूप. एकूण ३. ) २ संस्थान अक्कलकोट ( १ परगणे अफजलपूर. १ परगणे महिंदरगी. एकूण २. ) १ परगणे अलमेल प्रांत विजापूर.

१० देहाय मुकासबाब देखील बाबती देहाय:— ३ संस्थान अक्कलकोट. ( १ कसबा मणूर. १ कसबा मशाल. १ कसबा हिंदरग मागाचें. एकूण ३. ) २ परगणे मोहाळ

Year not specified.

(123) The annual salary of Shrinivas Parasharam Pratinidhi was 15000 Hons.

(124) Tarf Salsi in Prant Rajapur which belonged to Sambhaji Raje of Kolhapur was by treaty surrendered to the Satara Raja and was made over by him to Shrinivas Pandit Pratinidhi.

A. D. 1731-32.

A. D. 1747-48

(125) Shrinivas Pandit Pratinidhi having died his Saranjam was given to his brother Jagjiwan Pratinidhi.

संस्थान परंड (१ मौजे सोवाळे. १ मौजे ढोके बाभुळगांव. एकूण. २) १ मौजे सावेळी परगणे पाथरी संस्थान मजकूर. २ परगणे प्रतापपूर संस्थान कल्याण. (१ मौजे लउलगे. १ मौजे उदगांव. एकूण २.) २ परगणे कलबुर्गे संस्थान मजकूर. (१ मौजे निंबाळ. १ मौजे येळसंगी. एकूण २.)

९ पेशजीं राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि यांजकडे मुकासबाब देखील बाबती मुकास होता, ते शांत जहाले. हल्लीं त्यांचे बंधु राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि याकडे देखील बाबती मुकास देहः—३ परगणे पांगरी संस्थान परंड (१ मौजे नारी. १ मौजे कारी. १ मौजे भातांबरे.) १ मौजे गुळपाली परगणे पानगांव. १ मौजे रानरास परगणे रातंजन एकूण ९.

[१२६] राजश्री पंत प्रतिनिधि यांसी आज्ञा जे, तुह्मीं विनंतीपत्रांत करवीरवासीयांचा मजकूर लिहिला, तर सर्व राज्यभार तुमचे माथां आहे. फौजबंदी करून निवारण करणें. राजश्री अंताजी शिवदेव व राजश्री रामाजी नाईक यांकडे तुह्मांकडे पाठविले त्यांस हुजूर पाठवावे पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहरम २२.
2-6-11-1752

[१२७] राजश्री ब्राणजी मोहिते व राजश्री विठ्ठल बयाजी व राजश्री सदाशीव दीक्षित व राजश्री इनाइत अल्लीखान नबाब यांसी पत्र जे, राजश्री पंत प्रतिनिधि यांसी किल्लेः—किल्ले वारूगड, किल्ले कमळगड, किल्ले नांदगिरी व किल्ले पांडवगड. एकूण किल्ले चार यांमध्यें त्यांच्या विचारास जो किल्ला येईल तो एक करार करून हवालदार व हकीम सरकारचे ठेवून वरकड त्यांचे निसबतचे लोक ठेवणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहरम २५.

---

(126) In answer to his letter about the Karvir Raja, the Pant Pratinidhi was informed that the burden of the administration lay on him, that he should raise a large army and repulse the enemy.

A. D. 1752-53.

(127) Baranji Mohite was directed to hand over to the Pant Pratinidhi, any one of the forts of Warugarh, Kamalgarh, Nandigiri and Pandavgarh, that might be selected by him, and to allow him to employ his own men for the management of such fort, except the Havildar and Hakim who were to be the nominees of Government.

A. D. 1752-53.

[ १२८ ] राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यासी पत्रें जे, १ तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तेथें अंगारकाच्या दर्शनाचे योग घडून विशाळगडची तहरब होऊन आल्याचें वर्तमान लिहिलें, त्यास हुजूरचे ऐवजाची बोली केलीच असेल ह्मणून पत्र.

इ. स. १७५२--५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर २१.

[ १२९ ] राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यासी आज्ञा जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाहला. राजेश्री तुळाजी आंग्रे सरखेल यांची तुमची भेटी जाहली उत्तम प्रकारें सौरस्य जाहला. कित्येक मनसबियाच्या गोष्टी राजोपयोगी कर्तव्यार्थ ह्मणून विनंतीपत्रलेख केला. तरी तुह्मीं कार्यकर्ते धुरंधर, साहेबांचें स्वहित कराल हा भरंवसा आहे. हुजूरचा दरमहाचा ऐवज मशारनिल्हेकडे येणें व फडफर्मास येणें. त्याची विल्हे तुह्मीं केलीच असेल. मशारनिल्हे दर्शनास यावयाचा निश्चय आहे ह्मणून लिहिलें तरी ते पुरातन सेवक, त्याणीं हुजूर दर्शनास येऊन साहेबांची कृपा संपादून घ्यावी हेंच उत्तम आहे. वरकड ते प्रांतींचें वर्तमान सेवेसीं लिहोन पाठविणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५२--५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर २६.

[ १३० ] प्रतिनिधि याणीं कुलधर्मास चिरंजीव पाठवावे ह्मणून लिहिलें त्या उत्तर जे, चिरंजीव पुरातन सेवक हुजूर ठेवून घेतले. कुलधर्म तुमच्या वाड्याच्या उरकून घेणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५३--५४.
अर्बा खमसैन मया व अलफ.
साबान १२.

(128) A letter was sent to Jagjiwan Pandit Pratinidhi in answer to his letter informing Government that he had been able to secure an interview with the Angria and that a treaty had been concluded in regard to Wishalgarh. The Raja expressed a hope that provision had been made in the treaty for the payment by the Angria of the amount due by him to the Huzur.

A. D. 1752-53.

(129) A letter to the Pant Pratinidhi to the following effect:—

A. D. 1752-53.

You state that you had an interview with Tulaji Angria, and that friendly feelings have been established; and you detail various political schemes that you intend to carry into effect. Knowing your statesman like abilities, we feel confident that you will do what is for the advantage of the state. You must have arranged to secure the payment by the Angria of the arrears due on account of monthly tribute and Fad Farmas. You say that the Angria is anxious to pay his respects to the Huzur. He is an old servant, and it is but fitting that he should, by a personal visit, secure the good will of Government.

(130) The Pratinidhi requested that his son might be sent back to be present at a family ceremony. He was informed that his son, who was an old servant of Govern-

A. D. 1753-54.

[ १३१ ] राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यासी पत्र जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें, कित्येक अर्थ लिहिला. तुह्मीं एकनिष्ठ सेवक आहां. तुह्मीं शब्द हरएकविषयीं लावून ख्याल हें बरोबर नाहीं. चिरंजीवास पाठवावें ह्मणून लिहिलें, त्यास पांच सात मास साहेबांसन्निध आहेत; मुहूर्त पाहून रवानगी केली जाईल. तुह्मीं संशय न धरणें. सविस्तर राजश्री अंताजी शिवदेव लिहितील, त्यावरून कळों येईल. पत्र १.

इ. स. १७५३-५४. अर्बा खमसैन मया व अलफ. साबान १५.

[ १३२ ] जगजीवन पंडित प्रतिनिधि यासी पत्र जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. हुजऱ्याबरोबर सांगून पाठविलें कीं, नाइकजी बरगा सोडिलियावर शिदोजीचीं मुलें सोडिलीं जातील. नाइकजीस साहेब मारतील. तुह्मीं मुलें मारणार कीं काय हें लिहिणें. जर हुकूम मानणें आहे तर मुलें सत्वर सोडून देणें. ह्मणून पत्र १.

इ. स. १७५३-५४. अर्बा खमसैन मया व अलफ. साबान १८.

[ १३३ ] राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यासी जरूर हुजूर बोलाविले दिमत सुभानजी तात्या. पत्र १.

इ. स. १७५३-५४. अर्बा खमसैन मया व अलफ. साबान २२.

१.८.१७८२

## राजकीय (व) इतर माहिती.

### आंग्रे.

[ १३४ ] बदल देणें वेतनांत हुजरे नाईक रवाना कामगारी राजश्री कान्होजी आंग्रे सरखेल यास आणायास पाठविले यास वेतनांत देविले रुपये:—

५० आवजी पिंगळा हुजरे, ३० नागोजी महाडीक हुजरे, २० दामाजी केशव एकूण १००.

इ. स. १७१४-१५. खमस अशर मया व अलफ. मोहोरम ६.

---

ment, was retained at the Huzur on business, and that the ceremony might be performed without him.

(131) The Pant Pratinidhi was informed that he was a loyal servant of Government, and that he would do nothing deserving of blame, that his son who was at the Huzur for about 5 or 7 months would be sent back on an auspicious day, and that he need entertain no suspecion about him.

A. D. 1753-54.

(132) Jagjivan Pratinidhi sent a message to the Raja that he would set Sidoji's sons at liberty on Naikji Barga being released by the Raja. He was informed that the Raja was at liberty to kill Naikji Barga if he chose, and that if the Pratinidhi wished to obey orders Sidoji's sons should be released at once unconditionally.

A. D. 1753-54.

(133) Pant Pratinidhi was urgently called to the Huzur.

A. D. 1753-54.

[ १३५ ] राजश्री कान्होजी आंग्रे सरखेल यास जाब जे, तुह्मीं पत्र पाठविलें, लेखनार्थ कळों आला. स्वामींचे भेटीचे उद्देश कुलाबियाहून स्वार होऊन मौजे कुंभारली माथा बोरघाट येथें जेष्ठ वद्य सप्तमीस भानुवारीं मुक्काम केला. पुढें मजल दरमजल सेवसीं येतों ह्मणून लिहिलें, उत्तम गोष्ट केली. याउपरी अति सत्वर स्वामीसंनिध येणें. पत्र १.

इ. स. १७२५--२६.
सित अशरीन मया व अलफ.
रमजान १७.

[ १३६ ] राजश्री कान्होजी आंग्रे सरखेल यास राजपत्र कीं, तुह्मांकडे सरकारचा ऐवज येणें आहे. १००० रुपये सन अर्बा पैकीं, १२००० ( ६००० कापड व ६००० नक्त असे १२००० ) सन खमस पैकीं, एकूण १३००० हजार. पैकीं नक्त सहा हजार व कापड सहा हजाराचें येणें. ऐशास हुजूर खर्चाची निकड आहे, तरी सदरहु कापड व नक्त बहुत सत्वर हुजूर पाठविणें. या कामास महादजी निकम व काशी भोसला हुकेबारदार यास दर रुपये ३० एकूण साठ रुपये प्रविष्ट करणें. ३० महादजी निकम व ३० काशी भोसला एकूण ६०.

इ. स. १७२५-२६.
सित अशरीन मया व अलफ.
रमजान १७.

[ १३७ ] राजेश्री कान्होजी आंग्रे सरखेल यास पत्र जे, तुह्मांकडे मक्ता दरसाल रुपये १७५०० राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांजकडे पावावयाचा तह आहे, त्यास सन सित व सन सबा दुसाला ऐवज रुपये ३५००० पस्तीस हजार येणें, त्यापैकीं एक रुपयाहीं पावला नाहीं. याखेरीज सन अर्बा व सन खमसची बाकी राहिली आहे ह्मणून हुजूर विदित झालें. ऐशास तो ऐवज हुजूर खर्चाचा आहे, खर्च चालला पाहिजे, याकरितां हलीं हें आज्ञापत्र सादर केलें असे; तरी पत्रदर्शनीं दुसाला ऐवज पंचतीस हजार रुपये व सन अर्बा खमसची बाकी राहिली असेल ते झाडेनिशीं पाठविणें.

इ. स. १७२६--२७.
सबा अशरीन मया व अलफ.
राबिलावल २५.

---

(134) Messengers were sent to get Kanoji Angria Sarkhel.

A. D. 1714-15.

(135) Kanoji Angria Sarkhel was coming via Borghaut to see the Raja.

A. D. 1725-26.

(136) Kanoji Angria was directed to remit the amount of his tribute of Rs. 12000 for the year Khamas together with the arrears of the previous year, at an early date.

A. D. 1725-26.

(137) Kanoji Angria was bound by an agreement to pay Rs. 17500 annually to Bajirao Pandit Pradhan. The amount was in arrears for two years. It was assigned for the expenses of the royal house-hold. Angria was therefore directed to send the arrears without delay.

A. D. 1726-27.

[ १३८ ] राजेश्री कान्होजी आंग्रे सरखेल यास पत्र जे, तुह्मांकडे दरमाहेचे सन खमस व सन सित दुसाला बारा हजार रुपये नक्त व कापड बारा हजार एकूण दुसाला चोवीस हजार रुपये येणें. त्यास तुह्मांकडे हुजुरून माणसें पाठविलीं, त्यास तुह्मीं लिहिलें कीं, शामल व वरकड शत्रूंचा उपद्रव बहुत आहे. हुजुरून साहित्य गनिमास नतीजा पाठवावयाचें होत नाहीं. स्वामीनीं आपले स्थलरक्षणास दुसरा पाठवून आपणांस मामल्यापासून मुक्त करावें, ह्मणून विशदर्थ लिहिलें; तर स्थळें स्वामींचीं साहित्य करणें. जरूर तुह्मांसारखे एकनिष्ठ सेवक कार्यकर्ते आजतागाईत श्रमसाहस करून स्थळें रक्षिलीं. पुढें तुमचा भरंवसा आहे. दसऱ्याकारणें स्वामी तुह्मांस हुजूर बोलावतील. जें साहित्य लागेल फौजेचें, स्वामी करून देतील. आपलें समाधान असों देणें. दरमाहेच्या ऐवजाकरितां लोकांचा गवगवा झाला आहे; तरी दुसाला ऐवज चोवीस हजार रुपये पाठवून देणें. हुजूर दोन हजार स्वार व कारखाने पांच हजार माणूस बारा महिने सेवा करितात त्याचा ऐवज पत्रदर्शनीं पाठविणें.

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
जिल्हेज १.

[ १३९ ] राजश्री सखोजी आंग्रे बिन कान्होजी आंग्रे यांचे पितें कान्होजी आंग्रे मृत्यु पावले. त्यांचे स्वाधीन किल्ले कोट मुलूख होता. त्याचें संरक्षण झालें पाहिजे, याकरितां मशारनिल्हेवरी स्वामी कृपाळु होऊन त्याचा सरखेलीचा कार्यभाग होता तो त्यास सांगून कोट किल्ले व मुलूख पूर्ववत स्वाधीन केला. स्वामीसेवा एकनिष्ठेनें करून कोट किल्ले व मुलुखाचें पारिपत्य यथोचित करून स्वामीस संतोष पावविणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७२९-३०.
सलासीन मया व अलफ.
21-7-1729 मोहरम ५.

[ १४० ] राजश्री संभाजी आंग्रे छ २६ रोजीं राजश्री प्रतिनिधि सामोरे जाऊन भेटीस आणले, ते शहरांत येऊन राहिले. आणि छ मजकुरीं राजश्री स्वामींनी भेटी तृतीय प्रहरीं झाली. अंगावरी वस्त्र घातलें. त्यांणीं स्वामीस नजर केलें. पुतळ्या नाणें १००, रुपये २९. 2 ...1.3

इ. स. १७३०--३१.
इहिदे सलासिन मया व अलफ.
रजब २६.
24 ... 1731

(138) Kanoji Angria was asked to remit his tribute which was in arrears. He replied that he was put to much expense in protecting the province against the attack of the Shamal, and added that some other person might be sent to relieve him of the responsibility of protecting the country. An answer couched in conciliatory terms was sent to him.

A. D. 1726-27.

(139) Kanoji Angria having died, the territory and forts in his charge were made over to his son Sakhoji.

A. D. 1729-30.

(140) Sambhaji Angria came to Satara on this date and was received by the Pratinidhi, and had an interview with the Raja in the afternoon.

A. D. 1730-31

सदरहूप्रमाणें देहुडीसही जाऊन मातुश्री बाईसही नजर केली असे.

[ १४१ ] राजश्री संभाजी आंग्रे यास पत्र जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लिहिलें वर्तमान कळों आलें. सारांश, अर्थ राजश्री रघुनाथ हरी यानीं स्वामीचीं कृपावचनें सांगितलीं. त्यासमागमें सेखोजी आंग्रे यास आह्मांस स्वामीच्या पायाविना दुसरें दैवत नाहीं. दर्शनास यावें, हाच निजध्यास लागला आहे. उभयतांनीं यावें परंतु शत्रूचा शह, त्याहीमध्यें स्वामीचे आज्ञेपेक्षां सेवकास दुसरा विचार काय आहे ह्मणून लिहिलें; ऐशास तुमचे वडिलीं स्वामीची सेवा बहुत निष्ठेनें केली; स्वामींची मर्जी राखून वर्तले, कृपा संपादून घेतली, हा अर्थ तुह्मीं जाणतच आहां, त्याप्रमाणें वर्तून स्वामीस संतोषी करावें हें तुह्मांस उचित आहे. शत्रूचा शह ह्मणावा तर तो कांहीं नूतन प्राप्त झाला आहे ऐसें नाहीं. राजश्री कान्होजी आंग्रे शह संभाळून कर्तव्य तें करीत होते. दर्शनासही गेले आले. त्यांचे पुत्र तुह्मीं उभयता अहां, पराक्रमही करितां; केवळ शहच राखोन राहों ह्मटल्यानें तुमचा लौकिक कसा नांदों पहातां. सावतास पत्र पाठविलें असे. सरखेल स्वामीच्या दर्शनास येतील; तुह्मीं स्थळाचा बंदोबस्त करून यासमागमें येणें ह्मणून पत्र १ छ मजकूर.

इ. स. १७३०–३१.
इसन्ने सलासीन मया व अलफ.
जमादिलाखर १३.
2 Dec. 1731

रघुनाथ हरी यास जे, उभयतांस घेऊन येणें पत्र १. एकूण २.

[ १४२ ] कसबे चेऊल येथील कोट मोगलाचा मोगलास द्यावयाचा करार झाला आहे. त्यास चेऊल प्रांतें शामलाचा अंमल पेशजीं होता; त्याप्रमाणें राजश्री संभाजी आंग्रे याणीं अंमल करावा. शामल ज्याप्रमाणें मोगलानें चालवित होता त्याप्रमाणें यांनीं चालवावें. कोट मोग-

इ. स. १७३३–३४.
अर्बा सलासिन मया व अलफ.
साबान ९.

---

( 141 ) Sambhaji Angria was called to the Huzur. While expressing the ardent desire of himself and his brother Shekhoji to pay their respects to the Raja, he excused himself and his brother on the ground that their enemy would take advantage of their absence. They were told that in spite of his enemies, their father Kanoji could arrange to pay a visit to the Raja, that it would not speak well for their bravery if they refrained from leaving the province through fear of the enemy, that the Sawant had been addressed on the subject and that they should therefore proceed to the Huzur making every arrangement for the protection of the country during their absence.

A. D. 1730-31.

( 142 ) The Prant of Cheul was formerly under the jurisdiction of the Shamal. It was now made over to Angria and he was directed to restore the fort of Cheul to the Mogals. Letters to this effect to Sambhaji Angria, Manaji Angria, Laxmibai Angria and to Bajirao Pradhan.

A. D. 1733-34.

लास द्यावा ऐसा आंग्रे यांचा करार झाला होता, त्याप्रमाणें मोंगलांचे स्वाधीन करणें. कराराप्रमाणें मोगलाशीं बोलीचाली करून संभाजी आंग्रे यास लिहून पाठवून तहाप्रमाणें चाले ऐसें करणें. येविषयींचीं पत्रें. मुक्काम पाली.

१ राजश्री बाजीराव पंडित प्रधान १ लक्ष्मीबाई आंग्रे १ संभाजी आंग्रे १ मानाजी आंग्रे एकूण ४.

# राजकीय (व) इतर माहिती.

## सचीव.

[ १४३ ] १ शंकराजी मल्हारः—कधीं नेमिले ते कागदपत्र नसल्यामुळें समजत नाहीं. हे सचीव होते असें प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरीं एक याद आहे त्याजवरून दाखल केलें आहेत. कारकीर्द शिवाजी व संभाजी महाराज. सरंजाम किती काय हें या कारकीर्दीतील कागद नसल्यामुळें समजत नाहीं.

२ अण्णाजी दत्तोः—कधीं नेमले ते कागदपत्र नसल्यामुळें समजत नाहीं. हे सचीव होते असे प्रतापसिंह महाराज यांचे खाजगीं दप्तरीं एक याद आहे त्याजवरून दाखल केले आहेत कारकीर्द शिवाजी व संभाजी महाराज. सरंजाम किती काय हें कारकीर्दीतील कागद नसल्यामुळें समजत नाहीं.

३ शंकराजी नारायण पंडितः—सचीव कधीं नेमिले तें समजत नाहीं; परंतु तिसा तिसैन अलफ म्हणजे सन १६९८ इसवीचे कागदीं यास सचीव असें लिहिलें आहे. कारकीर्द राजाराम महाराज. यांचे नांवचे सरंजामाचे कागद नाहींत. किरकोळ कागद आहेत.

(143) The information under this head is taken not from the diaries but from a memo prepared in and kept in the record of the Satara Raja.

1. Shankraji Malhar :—
   It appears from a memo in the private records of Raja Pratapsinh that Shankraji served as Sachiv in the time of Siwaji and Sambhaji.

2. Annaji Datto :—
   Served as Sachiv during the reigns of Siwaji and Sambhaji.

3. Shankraji Narayan:—
   Was Sachiv in A. D. 1698-99 during the reign of Rajaram.

४ नारोशंकर पंडित सचीवः—कधीं नेमिले ती तारीख समजत नाहीं; परंतु तिसा अशर-पासून याचे नावचे सचीव म्हणून सरंजाम वगैरे दिल्याचे कागद आहेत. कारकीर्द शाहू महाराज. १०००० वतन सालिना होन. १ साहोत्र्याचें वतन, १ सरंजाम महाल, १ किल्ले वगैरे.

५ चिमणाजी नारायण पंडित सचीवः—राजश्री चिमणाजी नारायण यांचे बाप राजश्री नारो पंडित मृत्यु पावले याकरितां स्वामी कृपाळु होऊन मुरनिशी सांगितली. छ ९ रबिला-वल जल नाम संवत्सरे सुरुसन सबा सलासिन रोजीं वस्त्रें पांच व नग दिले. कारकीर्द शाहू महाराज. १०००० वेतन सालिना होन. १ साहोत्र्याचें वतन, १ मरंजाम महाल १ किल्ले वगैरे.

६ सदाशिव चिमणाजी यांचेबद्दल कागदपत्र दप्तरीं नाहींत. कागद नाहींत.

७ रघुनाथ चिमणाजी यांचेबद्दल कागदपत्र दप्तरीं नाहींत. कागद नाहींत.

८ चिमणाजी शंकर यांचेबद्दल कागदपत्र दप्तरीं नाहींत. कागद नाहींत.

सचीव याचे दिमतीचे व फडणिशीचे व मुतालकीचे वगैरे इतर लोक होते तेः—

मुतालिकः—१ कृष्णाजी काशी, १ त्रिंबक शिवदेव, १ लक्ष्मण त्रिंबक, १ रामचंद्र त्रिंबक. १ रामचंद्र कृष्ण.

---

4. Naro Shankar Pandit Sachiv:—
   Was given Saramjam in A.D. 1718-19. His annual remuneration was 10000 Hons.

5. Chimnaji Narayan Pandit Sachiv:—
   The Raja was pleased to appoint Chimnaji Narayan to the post of the Sachiv, on 9th Rabilaval in the year A. D. 1736-37 on the death of his father Naro Pandit.

6. Sadashiv Chimnaji:—
   The date of his appointment cannot be ascertained.

7. Raghunath Chimnaji:—
   The date of his appointment cannot be ascertained.

8. Chimnaji Shankar:—
   The date of his appointment cannot be ascertained.

The Mutaliks, Phadnis, Karkuns &c. and other persons who were in the Service of the Sachivs were:—

MUTALIKS.—1 Krishnaji Kasi, 1 Trimbak Siwadeo, 1 Laxman Trimbak, 1 Ramchandra Trimbak, 1 Ramchandra Krishna.

PHADNIS'.—1 Shankraji Shamraj, 1 Nanaji Raghunath, 1 Laxman Nanaji. Naro Gangadhar, 1 Nano Shankar.

फडणीसः—शंकराजी शामराज, १ नानाजी रघुनाथ, १ लक्ष्मण नानाजी, १ नारो गंगाधर, १ मानो शंकर.

कारकूनः—१ नारो यादव, १ विसाजी निळकंठ, १ लिहिणार मोघम. १ दप्तरदार मोघम नांव लागलें नाहीं. १ यादव प्रभु, १ यादव शामराज.

( १४४ ) कित्ता पत्रें किते ४१—राजश्री नारो शंकर सचीव किल्ले विचित्रगडाखाले रहात होते. तेथें दमाजी थोरात यानें स्वारी पाठवून दगा करून धरून नेले, याकरितां त्याचा जिल्हा व वतनी बाबेचा साहोत्रा राजश्री पंताजी शिवदेऊ याचे स्वाधीन करून जिल्हे पाठविले असे. तरी याचे आज्ञेनें स्वामीकार्य करणें, व साहोत्र्याचा ऐवज मशारनिल्हेकडे वसूल देत-विणें म्हणून पत्रें ४१. तपशील.

इ. स. १७१६-१७.
सबा अशर मया व अलफ.
रबिलाखर २६.

कित्तापत्रेंः—१ पंत प्रधान, १ प्रतिनिधि, १ सेनापति, १ मरलष्कर, १ राजाज्ञा, १ सेनाकर्ते, १ कान्होजी आंग्रे. एकंदर ७. किल्ले व मुलकी मामलेदारास कीं मशारनिल्हे-चे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणेंः—१ विचित्रगड, १ सिंहगड, १ प्रचंडगड, १ बालेकिल्ला राजगड, १ माची प्रावरती, १ माची संजीवनी, १ माची मुलेक, १सुधागड, १ कडीणगड, १ वितंडगड, १ सुभेदार प्रांत मावळे, १ सुभेदार इंदापूर, १ वतनदार इंदापूर. एकूण १४.

कित्तापत्रेंः—कृष्णाजी विठ्ठल, १ शामराजं रुद्र नाम वपाल मलकापूर, १ मोरो शामराज, १ केशव शंकर नामजाद राजगड, एकूण ४.

सरदार लष्करः—१ सुभानजी अटोळे धुरंधर समशेरबहाद्दर, १ कान्होजी भोसले, १ संताजी कदम, १ देऊजी सोमवंशी. १ संताजी भोसले, १ धर्माजी बळवंतराव देवकाते, १ भोजजी दुधे [पुढें फाटलें आहे] १ सुभानजी [पुढें फाटलें आहे] १ केरोजी पिलाजी जाधव, १ सखोजी थोरात, १ रायाजी जाधव, एकूण १२.

कित्तापत्र बनाम राजेश्री पंताजी शिवदेव यास राजेश्री शंकराजी शामराज यासी मजमूनचे मशारनिल्हे सचीव यांस ठेविले होते. त्या प्रांतीं तुम्हांपासून ठेविले आहेत. याचे बेत मजमून-कदील फडणिशीचा धंदा होणें.

---

KARKUNS.—1 Naro Yadav, 1 Visaji Nilkantha, 1 Writer (name not known), 1 Daftardar (name not known), 1 Yadav Prabhu, 1 Yadav Shamraj.

**(144)** Naro Shankar Sachiv, while residing at the foot of the fort of Vichitragarh was attacked and carried prisoner by Damaji Thorat. Pantaji Siwadeo was therefore sent to manage the Sachiv's territory. Orders to the effect were issued to the different ministers, Sardars and forts officers.

A. D. 1716-17.

किरकोळपत्रें :—१ कंक मालपुरे व बाजे सरदार हाशम. १ गोपाळ शंकर कामाविसदार सावोत्रा राजश्री पंताजी शिवदेऊ यास पत्र कीं, तुमचे स्वाधीन पिलबाव व सावोत्रा केला असे. पारपत्य करून सेवा करून रहाणें १.

[ १४५ ] कित्तापत्रें चिटणिशी माघ शुद्ध सप्तमी गुरुवासर नलनाम संवत्सरे जिल्ह पूर्वी राजश्री नारो शंकर सचीव याचे स्वाधीन होता त्यास ते मृत्यु पावले. हल्लीं त्यांचे पुत्र राजश्री चिमणाजी नारायण सचीव याचे स्वाधीन केला असे. तर तुह्मीं याकडील अंमलदाराकडे रुजू होऊन मशारनिल्हेकडे वसूल देणें ह्मणून पत्रें ३२.

इ.स.१७३६-३७.
सबा सलासीन मया व अलफ.
जिल्हेज ३.

## तपशील.

चौथाईचा आकार होईल त्यापैकीं चौथाई बाबती व निंमे जकाती व कमाविसबाबेचा वसूल सुरळीत देणें ह्मणून पत्रें देशमुख व देशपांडे यांसः—१ प्रांत बीड. १ परगणे अंबू. एकूण २. प्रांत मावळ जिल्ह्याचा अंमल पेशजींप्रमाणें सुरळीत वसूल देणें ह्मणून देशमुख व देशपांडे यांस पत्रेंः—१ तर्फ रोहिडखोरें, १ तर्फ हिरडस मावळ, १ तर्फ वेलवडखोरें, १ तर्फ गुंजणमावळ, १ खेडेबार, १ तर्फ कर्यात मावळ, १ तर्फ कानदखोरें. १ तर्फ मोसेखोरें, १ तर्फ मुठेखोरें, १ तर्फ शिरवळ, एकूण १०. मौजे कोथळे परगणे सुपे. मौजे मजकूरचे मुकासबाबेपैकीं तिसरी तक्षीम व बाबतीचा ऐवज जिल्ह्याकडे पावतो त्याप्रमाणें बाबतीचा ऐवज तिसरी तर्फ मुकासबाबेचा ऐवज सुरळीत वसूल देत जाणें ह्मणऊन गांवास पत्र १ व पंत प्रधानास पत्र १ एकूण २.

प्रांत कडेविलीत बाबती व निंमे जकात व कमाविसबाब यांजकडील अंमलदारांशीं रुजू होऊन वसूल सुरळीत देणें ह्मणऊन पत्रें देशमुख व देशपांडे तर्फानिहाय एकूण पत्रेंः— १ तर्फ जामखेड, १ तर्फ राशीन, १ तर्फ आष्टी, १ तर्फ मांडोगण. १ तर्फ कंड, १ तर्फ पांभारगोंदें, १ तर्फ नगर हवेली, १ तर्फ पेडगांव, एकूण ८. देशमुख व देशपांडे यांस आज्ञा कीं, बाबतीचा व निंमे जकातीचा व कमाविसबाबेचा वसूल मशारनिल्हे कमाविसदाराकडे रुजू होऊन वसूल सुरळीत देणें ह्मणऊन पत्रेंः—१ परगणे सुपे, १ कर्यात बारामती, १ प्रांत इंदापूर, १ परगणे कडे रांजणगांव, १ सुभा प्रांत राजापुरी, ५ पंचमहाल प्रांत चेऊलपैकीं ( १ हवेली पल मामले मजकूर, १ तर्फ आसरे आधारणे, १ तर्फ आतोणे, १ तर्फ अष्टमी, १ तर्फ नागोठणें) तेरीजः—२ कित्ता, ८ कित्ता, १० कित्ता, १० कित्ता, २ कोथळ, एकूण ३२.

---

(145) Naro Shankar Sachiv having died, the office and the Saramjam attached thereto was conferred on his son Chimnaji Narayan.

A. D. 1736-37.

# राजकीय (व) इतर माहिती.

## मंत्री.

[ १४६ ] १ गंगोजी मंगाजी ब्राह्मण :—कधीं नेमले त्याचा दाखला कागदपत्र नसल्यामुळें समजत नाहीं. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरीं एक याद आहे त्याजवरून दाखल केलें आहे. कारकीर्द शिवाजी महाराज. सरंजाम किती हें कागद नसल्यामुळें समजत नाहीं.

२ दत्तोजी गोपिनाथ बोकील :—कधीं नेमले त्याचा दाखला कागदपत्र नसल्यामुळें समजत नाहीं. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरीं एक याद आहे त्याजवरून दाखल केलें आहे. कारकीर्द शिवाजी महाराज. सरंजाम किती हें कागद नसल्यामुळें समजत नाहीं.

३ रामचंद्र त्रिंबक :—तिसा मया अलफचे कागदीं यास वाकनीस असें लिहिलें आहे. कारकीर्द शाहू महाराज. सालीना नेमणूक १०००० शिवाय सरंजाम.

४ नारोराम शेणवी मंत्री:—छ जिलकाद सुरुसन सबा अशर राजाज्ञा पद दूर करून वाकनिशी सांगितली. १०००० सालीना नेमणूक शिवाय सरंजाम.

५ घनःशाम नारायण :—पेशजीं नारोराम मंत्री होते ते मृत्यु पावले सबब मशारनिल्हेकडे वाकनिशी सांगितली. सुरुसन इहिदे खमसैन राजशक ७७ प्रमोद नाम संवत्सरे श्रावण शुद्ध तृतीया सौम्यवासर छ १ रमजान. सालीना नेमणूक १०००० शिवाय सरंजाम.

---

(146) The information under this head is taken not from the diaries but from a memo prepared in and kept in the records of the Satara Raja.—

1. Gungoji Mungaji Brahmin served as a Mantri during Siwaji's reign.
2. Dattoji Gopinath Bokil served as a Mantri in Siwaji's reign.
3. Ramchandra Trimbak:—

   He is referred to as a Vaknis in a document of A. D. 1708-9. His annual salary was 10,000 Hons a year; he had besides a Saranjam.
4. Naro Ram Shenvi Mantri:—

   The office of Rajadnya was taken away from him in the year A.D. 1716-17 and that of Vaknis was conferred on him.
5. Ghanasham Narayan:—

   Naro Ram Mantri having died his son Ghanasham Narayan was made a Vaknis in A. D. 1750-51.

६ रघुनाथराव घनःशाम :—याबद्दल दाखला दुसरीं बिलकुल मिळत नाहीं. कागद नाहींत.

७ जयवंतराव रघुनाथ :—याबद्दल दाखला दुसरीं बिलकुल मिळत नाहीं. कागद नाहींत.

मंत्री यांचे दिमतीचे व फडणिशीचे व मुतालकीचे वगैरे इतर लोक होते ते :—

मुतालिक :— १ विठ्ठल कानो, १ बाळाजी जनार्दन, १ रामाजी बल्लाळ, १ धोंडो बल्लाळ. १ फडणीस बहिरो रघुनाथ.

लिहिणार :—१ बहिरो बापूजी, १ लक्ष्मण महादेव.

इ. स. १७५०-५१. इहिदे खमसैन मया व अलफ. रमजान ९.

[ १४७ ] पेशजीं नारोराम मंत्री होते ते मृत्यु पावले. हल्लीं त्यांचे पुत्र राजश्री घनःशाम नारायण मंत्री यांसी वेतनाचे ऐवजीं मुकासे पत्रें फडणिशी :—

मुकासबाब देखील बाबती देहाय :—३ तर्फ सातारा ( १ मौजे कुमठे, १ मौजे कुसवडें, १ मौजे उपलावी. ) १ मौजे कोपर्डे तर्फ तारगांव प्रांत कऱ्हाड १ मौजे कामखेड परगणे हरदापूर. १ कसबा रेणापूर सरकार धारूर प्रांत बालाघाट. १ कसबा उडचण सरकार अक्कलकोट. ४ सरकार दौलताबाद ( १ मौजे नांदगाव परगणे माणिकपुंज, परगणे येरुळपैकीं ३, १ मौजे दरेगांव, १ मौजे देजोगांव, १ मौजे देवकर्णे. एकूण ३ ) १ कसबा बेडल परगणे गालफ सुभे खानदेश. १ मौजे टेंभें परगणे जलालाबाद सरकार खरगोण. १ मौजे बारंद तर्फ शिवथर तर्फ बिरवाडी सुभा मंगळगड. १ मौजे कोरले तर्फ रोहिडखोरें प्रांत मावळे. १ मौजे दिगरजखुर्द कर्यात दिगरज परगणे कागल. १ कसबा भिलवडी कर्यात मजकूर प्रांत मिरज. १ मौजे सोमेश्वर तर्फ हरचरी. एकूण १८. मुकासबाबेचे देहे :—कर्यात भाळवणी ( १ मौजे कळंबी, १ मौजे खांबले ) १ मौजे कार्वे परगणे विटें, १ मौजे हेळगांव तर्फ उंब्रज प्रांत कऱ्हाड, १ मौजे नागूर परगणे कलबुर्गे, १ मोजे रंजल परगणा चिटगोवें, १ मौजे कोथळ कडेरांजणगांव एकूण ७. शिवाजी पांडुरंग वाकनीस दिंमत राजश्री फत्तेसिंग भोसले यास सरंजाम होता तो

6. Raghunathrao Ghanasham.

7. Jayavantrao Raghunath.

The Mutaliks, Phadnis and other persons who were in the service of the Mantris were :—

Mutaliks.—1 Vithal Kano, 1 Balaji Janardan, 1 Ramaji Ballal. 1 Dhondo Ballal, 1 Bahiro Raghunath Phadnis.

Writers:—1 Bahiro Bapuji, 1 Laxman Mahadeo.

A. D. 1750-51.

( 147 ) Naro Ram Mantri died, and was succeeded by his son Ghanasham Narayan. The Saramjam enjoyed by Naro was made over to Ghanasham.

हल्लीं त्याचे पुतणे पांडुरंग शिवदेव यांसी वेतनांतः—२ परगणा धारूर पैकीं, १ मौजे कालगांव, १ मौजे शिदी. २ तर्फ गाजभुइरे संमत जुन्नर नूतनपैकीं, १ मौजे झर्से, १ मौजे गुणारें. १ मौजे खलेवबुद्रुख कर्यात आकलूजें. एकूण ९. पत्रें श्रावण शुद्ध ९ सौम्यवार.

कित्ता देहाय मुकासबाव देखील बाबती पेशजीं आहेत त्याप्रमाणें हल्लीं मशारनिल्हेकडे मुकासा दिला असे. तरी तुम्हीं यासी रुजू होऊन मौजे मजकूरचा ऐवज पुरातन शिरस्त्याप्रमाणें याजकडे वसूल देणें. ३ परमणे पारनेर सरकार हुजूर (मौजे विरोली, मौजे किन्हई, मौजे करंदी.) २ कित्ता देहाय सरकार जुन्नर (१ मौजे रायेतले तर्फ रांजणगांव, १ मौजे पेंढारपिंपरी तर्फ बोलवे.) ३ प्रांत कडेविर्लात (१ मौजे पारगांवसुदरीक तर्फ चांभारगोंदें, १ मौजे बाबुर्डी तर्फ पेडगांव,१ मढवडगांव तर्फ चांभारगोंदें.)एकूण ८.बहिरो रघुनाथ फडणीस दिंमत मंत्री होते ते मृत्यु पावले. हल्लीं त्यांचे पुत्र गणेश भैरव यासीः—१ मौजे दांडेगांव परगणे जोपड. १ मौजे देवळाली परगणे धारासिंव सरकार नल्दुर्ग. एकूण २. स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील बाबतीः—१ मौजे बागणी कसबा दिगरज परगणे हुकेरी रुजू दुदगांव. १ मौजे पुणदी कर्यात तासगांव मामले मिरज. एकूण २. तेरीजः—१८ देखील बाबती. ८ पुरातन शिरस्त्याप्रमाणें. ७ मुकासबाबेचे देहे. २ बहिरो रघुनाथ. २ दुतर्फा. एकूण ३७. तपशील—खासा ३५ व गणेश भैरव २, रामाजी बल्लाळ यासी पेशजीं सरंजाम होता तो दूर करून हल्लीं त्यांचे बंधु धोंडो बल्लाळ मुतालिक पंत मंत्री यास वेतनांत मुकासे दिले असत. श्रावण शुद्ध ९ सौम्यवार. १ मौजे आऊसगांव परगणे आंबेजोगाई सरकार धारूर. १ मौजे बिरहली परगणे आळंद. १ मौजे बारूड परगणे धारूर संमत मजकूर. १ कसबा भिलवडी प्रांत मिरज जमीन वाण १ एकूण ४.

---

# राजकीय (व) इतर माहिती.

## सुमंत.

[१४८] १ सोनोपंत डबीरः—यांस पद दिल्याबद्दल वगैरे कागद दप्तरीं नाहींत, परंतु हे सुमंत होते अशाविषयीं प्रतापसिंह महाराज यांनीं एक याद केली आहे त्याजवरून समजतें.

२ जनार्दनपंत हणमंतेः—यांस पद दिल्याबद्दल वगैरे कागद दप्तरीं नाहींत, परंतु हे सुमंत होते अशाविषयीं प्रतापसिंह महाराज यांनीं एक याद केली आहे त्याजवरून समजतें.

---

(148) The information under this head is taken not from the diaries but from a memo prepared in and kept in the records of the Satara Raja.
1. Sonopant Dabir.

३ बाळकृष्ण वासुदेवः—अशर मया अलफांत यांस सुमंत असें लिहिल्याचे कागद आहेत.

४ महादाजी गदाधरः—इसन्ने अशरीन सालीं यांस सुमंत असें लिहिल्याचे कागद आहेत.

५ अनंदराव रघुनाथः—यासी सुमंती सांगून पांच सनंग दिले, छ २३ रबिला अखो अशरीन पौष बहुल दशमी भृगुवासर.

६ विठ्ठलरावः—यांस पद दिल्याबद्दल वगैरे कागद दप्तरीं नाहींत, परंतु हे सुमंत होते अशाविषयीं प्रतापसिंह महाराज यांनीं एक याद केली आहे त्याजवरून समजतें.

७ मल्हारराव कृष्णः—यांस पद दिल्याबद्दल वगैरे कागद दप्तरीं नाहींत, परंतु हे सुमंत होते अशाविषयीं प्रतापसिंह महाराज यांनीं एक याद केली आहे त्याजवरून समजतें.

८ जिवनराव विठ्ठलः—यांस पद दिल्याबद्दल वगैरे कागद दप्तरीं नाहींत, परंतु हे सुमंत होते अशाविषयीं प्रतापसिंह महाराज यांनीं एक याद केली आहे त्याजवरून समजतें.

९ महिपाजी आनंदरावः—इहिदे सलासिन सालीं.

सुमंत यांचे दिमतीचे व फडणिशीचे व मुतालकीचे वगैरे इतर लोक होते तेः—१ यादोगोपाळ मुतालिक, १ नारोराम फडणीस, १ नारो काशी.

पारसनीसः—१ घनःशामदास कावन, १ भगीरथ, १ लाला भगीरथ.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
मोहरम २०.

[ १४९ ] छ २३ रोजीं सोमवारीं मंत्री राजश्री अनंदराव सुमंत यांची रवानगी नबाब किलीचखान याजकडे केली, शिरपाव दिल्हा.

---

2. Janardanpant Hanamante.
3. Balkrishna Vasudeo.—He is referred to as Sumant in some documents of A. D. 1709-10.
4. Mahadaji Gadadhar.—He is referred to as Sumant in some documents of A. D. 1721-22.
5. Anandrao Raghunath was appointed to the office of Sumant on 23 Rabilakhar in A.D. 1723-24, and was given one emerald and 5 ornaments.
6. Vithalrao.
7. Malharrao Krishna.
8. Jiwanrao Vithal.
9. Mahipaji Anandrao.—was Sumant in A. D. 1730-31.

The Mutaliks, Phadnis and other persons who were in the service of the Sumants were:—

1 Yado Gopal Mutalik, 1 Naro Ram Phadnis, 1 Naro Kasi.

Parasnis:—1 Ghanashamdas Kavat, 1 Bhagiratha, 1 Lala Bhagiratha.

A. D. 1740-41.

(149) Anandrao Sumant was despatched to Nabob Kilichkhan.

# राजकीय (व) इतर माहिती.

## अमात्य.

[ १५० ] १ बाळकृष्ण वासुदेव हणमंतेः—थोरले शिवाजीचे कारकीर्दीत नेमल्याची तारीख लागत नाहीं. अर्बा अशर मया अलफ सालीं इनाम वगैरे दिल्याचे कागद आहेत.

२ निळो सोनदेव बावडेकरः—थोरले शिवाजीचे कारकीर्दीत नेमल्याची तारीख लागत नाहीं. या नांवचे कागद दप्तरीं नाहींत. माहितीनें नांव लिहिलें आहे. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरांत याद आहे त्याजवरून दाखल केलें.

३ रघुनाथ त्रिमल हणमंतेः—थोरले शिवाजीचे कारकीर्दीत नेमल्याची तारीख लागत नाहीं. या नांवचे कागद दप्तरीं नाहींत. माहितीनें नांव लिहिलें आहे. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरांत याद आहे त्याजवरून दाखल केलें.

४ रामचंद्र निळकंठ बावडेकरः—थोरले शिवाजीचे कारकीर्दीत नेमल्याची तारीख लागत नाहीं. मया अलफचें एक पत्र आहे त्यांत अमात्य असें लिहिलें आहे.

५ जनार्दन नारायण हणमंतेः—थोरले शिवाजीचे कारकीर्दीत नेमल्याची तारीख लागत नाहीं संभाजी राजाचे कारकीर्दीपर्यंत. कागद नाहींत. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरांत याद आहे त्याजवरून दाखल केलें.

६ रघुनाथपंत हणमंतेः—राजाराम राजाची कारकीर्द. नेमल्याची तारीख लागत नाहीं. कागद नाहींत.

---

(150) The information under this head is taken not from the diaries but from a memo. prepared in and kept in the records of the Satara Raja.

1. Balkrishna Mahadeo Hanamante.—Some Inams were granted to him in A. D. 1713-14.
2. Nilo Sondeo Bavadekar.
3. Raghunath Trimal Hanamante.
4. Ramchandra Nilkantha Bavadekar.—He is a referred to as Amatya in a document dated A. D. 1699-1700.
5. Janardan Narayan.
6. Raghunathpant Hanamante.

७ परशराम त्रिंबकः—नेमल्याची तारीख नाहीं, परंतु तिसा मया अलफचे सरंजामाचे कागद आहेत व इहिदे अशर मया व अलफ सालीं प्रतिनिधि पद दिलें. पन्हाळा वगैरे कांहीं सरंजाम दिल्यचे कागद आहेत.

८ भगवंतराव रामचंद्र बावडेकरः—नेमल्याची तारीख नाहीं, परंतु या नावचें पत्र समान अशरीनचे दप्तरीं आहे. सरंजाम दिलेबद्दल कागद नाहींत.

९ आपाजी बाबुराव हणमंतेः—धाकटे शिवाजी महाराज. या नांवचे कागदपत्र नसल्यामुळें समजत नाहीं. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरांत याद आहे त्यावरून दाखल केलें.

१० अंबुराव पंडित अमात्यः—थोरले शाहूची कारकीर्द. तारीख मिळत नाहीं, परंतु सरंजाम दिल्याबद्दल कागद आहेत व इहिदे सलासीन मया अलफ सालीं या नावानें कीर्दीस पत्रें बार असत. संगमनेर वगैरे ठिकाणीं सरंजाम.

११ महादाजी गदाधर पंडित अमात्यः—नेमल्याची तारीख समजत नाहीं, परंतु सरंजाम दिल्याचे कागद सित सलासीन मया अलफचे आहेत. परगणे चांदवड वगैरे महाल सरंजाम दिल्याचे कागद आहेत.

१२ बाबुराव शिवराम अमात्यः—रामराजे व शाहू धाकटे वगैरेची कारकीर्द. नेमल्याची तारीख लागत नाहीं, परंतु सितैन मया अलफ सालीं याचे नांवें कीर्दीस पत्रें बार आहेत. सरंजामाबद्दल कागद नाहींत.

१३ निळकंठ बाबुराव अमात्यः—तारीख २६ माहे सवाल मार्गशीर्ष शुद्ध १३ सुरुसन सित सबैन मया अलफ बाबुराव शिवराम यास देवाज्ञा झाली सबब त्याचे पुत्रास वस्त्रें दिलीं. सरंजामाबद्दल कागद नाहींत.

---

7. Parasharam Trimbak.
8. Bhagawantrao Ramchandra Bavadekar.
9. Apaji Baburao Hanamante.
10. Amburao Pandit Amatya.—Was appointed Amatya in the reign of Shahu.
11. Mahadaji Gadadhar Pandit Amatya.—He is referred to in document dated A. D. 1735-36.
12. Baburao Siwaram Amatya.—Is referred to in document dated A. D. 1759-60.
13. Nilkantha Baburao.—Was on the death of his father Baburao Siwaram appointed to the post of Amatya on 26th Sawal of A. D. 1775-76.

१४ सर्वोत्तमराव बाबुराव अमात्यः—सरंजामाचे वगैरे कागद नाहींत. कागद नाहींत. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरांत याद आहे त्याजवरून दाखल केलें.

अमात्य ह्यांचे दिमतीचे व फडणिशीचे व मुतालकीचे वगैरे इतर लोक होते तेः—

**मुतालिकः**—१ तिमाजी यमाजी, १ रंगराव उद्धव, १ रामाजी गणेश.

**फडणीसः**—१ जनार्दन जगजीवन, १ मल्हार खंडेराव.

**दप्तरदारः**—१ शिवाजी रुद्र, १ हरी गणेश, १ नरसोराम व शिवाजी रुद्र, १ राघो दामोदर, १ सोयरो नरसिंह, १ बावाजी शंकर, १ नारो तुकदेव, १ नारो केशव, १ प्रल्हाद सोयराजी व १ नारो रामचंद्र, १ भगवंत हरी.

**लिहिणारः**—१ पांडुरंग काशी लिहिणार, १ विठ्ठल नरसिंह दप्तरदार, १ बाळाजी जनार्दन फडणीस, १ केरो कोंडो फडणीस, १ विनायक गंगाधर फडणीस, १ राघो पांडुरंग लिहिणार, १ प्रल्हाद सोयराजी, १ नारो रामचंद्र, १ भगवंतराव.

**इ. स. १७०८-९.**
**तिसा मया व अलफ.**
**जमादिलाखर १४.**

[ १५१ ] परशराम त्रिंबक यावरी स्वामी कृपाळू होऊन अमात्यपणाचा अधिकार सांगितला. वतन होन पावणें सालिना १२०००.

---

14. Sarwottamrao Baburao Amatya.

The Mutaliks, Phadnis and other persons who were in the service of the Amatyas were:—

MUTALIKS.—1 Timaji Yemaji. 1 Rangrao Udhav. 1 Ramaji Ganesh.

PHADNIS.—1 Janardan Jagjivan. 1 Malhar Khanderao.

DAFTARDARS.—1 Siwaji Rudra. 1 Hari Ganesh. 1 Narso Ram and Siwaji Rudra. 1 Ragho Damodar. 1 Soyaro Narsinh. 1 Bawaji Shankar. 1 Naro Tukdeo. 1 Naro Keshav. 1 Pralhad Soyaraji. 1 Naro Ramchandra. 1 Bhagavant Hari.

WRITERS.—1 Pandurang Kasi writer. 1 Vithal Narsinh Daftardar. 1 Balaji Janardan Phadnis. 1 Kero Kondo Phadnis. 1 Ragho Pandurang writer. 1 Pralhad Soyaraji. 1 Naro Ramchandra. 1 Bhagwantrao.

(151) The Raja was pleased to confer on Parsharam Trimbak, the Post of Amatya. His remuneration was 12,000 Hons a year.

A. D. 1708-9.

[ १९२ ] पत्रें विद्यमान राजश्री माधवराव पंडित प्रधान यांचे तर्फेनें कारभारी राजश्री विसाजी दादाजी यांचे वेळेस परवानगीचिठ्ठी आली होती; त्याजवरून मशारनिल्हे मृत्यु पावलियावर पंडित मशारनिल्हेकडून राजश्री कृष्णराव अनंत कारभारास सालमजकुरीं श्रावणमासीं आले. तेव्हां पत्रें तयार होऊन शिक्के जहाले रुबरू राजश्री स्वामी. फेरिस्तावर एकुणांत राजश्री पंत अमात्य यांनीं करावी. ते कृष्णराव अनंत यांनीं गोपाळ नाईक तांबवेकर यांचे पत्रावर एकुणांत केलियाबद्दल राजश्री पंत प्रधान यांचें पत्र कृष्णरावास राजश्री पंत अमात्य यांनीं आणिलें. त्याजवरून या फेरिस्तावर एकूण एकुणांत आपण करावी ह्मणोन कृष्णराव यांनीं राजश्री पंत अमात्य यांस आग्रह करीत असतां अमात्य पंतांनीं बहुतच आग्रह केला कीं, आह्मीं एकुणांत केली तेच तुह्मीं. तुमचा आमचा ऐक्यभावें दुसरा अर्थ नाहीं. ऐसा आग्रह करून याही फेरिस्तावर एकुणांत कृष्णरावाची झाली. देणें राजश्री स्वामींनीं केलें तदनंतर येथें पद्धत शिक्के जाहले.

इ. स. १७७०-७१.
इहिदे सबैन मया व अलफ.
जमादिलावल ११.

# राजकीय (व) इतर माहिती.

## न्यायाधीश.

[ १९३ ] १ निराजीराव:—नेमल्याची तारीख वगैरे लागली नाहीं. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरीं एक याद आहे त्यावरून दाखल केलें. कागद नसल्यामुळें समजत नाहीं.

२ बाळाजी सोनदेव:—नेमल्याची तारीख वगैरे लागली नाहीं. प्रतापसिंह महाराज यांचे खाजगी दप्तरीं एक याद आहे त्याजवरून दाखल केलें. कागद नसल्यामुळें समजत नाहीं.

---

(152) The concluding words of this Sanad were to have been written by the Pant Amatya. The Peshwa's Karbhari Krishnarao Anant having written the words himself in the case of a Sanad given to the Tambvekar, the matter went up to the Peshwa. It was ordered that the Pant Amatya should write the concluding words. The Pant Amatya however refused to do so on this occasion alleging that it was the same whether the words were written by himself or by Krishnarao Anant.

A. D. 1770-71.

(153) The information under this head is taken not from the diaries but from a memo prepared in and kept in the records of the Satara Raja.

1. Nirajirao.
2. Balaji Sondeo.

३ सखो विठ्ठल न्यायाधीश :—नेमल्याची तारीख लागली नाहीं, परंतु सरंजाम वगैरे दिल्याचे कागद तिसा मया अलफचे कागद आहेत त्यांत लिहिलें आहे. कारकीर्द शाहू महाराज. सुभा व्याघ्रगड वगैरे सरंजामास.

४ होनाजी पंडित न्यायाधीश :—पेशजीं सेनाकर्ते हुद्दा होता तो दूर करून हल्लीं न्यायाधीशाचा हुद्दा सांगितला. छ ५ सवाल सुरूसन सलास " अशर मया अलफ " सदरहु नांवची कारकीर्द सुरूसन सित अशरीनपर्यंत लागली आहे असें त्यास सरंजाम दिल्याबद्दल खतावणी व यादी वगैरे आहेत त्याजवरून समजतें.

५ काशीराव अनंत न्यायाधीश :—पेशजीं होनाजी अनंत न्यायाधीश होते ते फत्तेसिंग भोसले याचेबरोबर फौजेनिशीं असून कैलासवासी जाहले, सबब मशारनिल्हेचे बंधु काशीराव अनंत यांस न्यायाधीशपणाचा किताब देऊन पेशजींचा सरंजाम दिला. सुरूसन सबा अशरीन मया अलफ. व काशीराव अनंत यांचे कारकीर्दीतील कागद अर्बा सलासीनपर्यंत आहेत. सरकार नांदेड वगैरे ठिकाणीं सरंजाम.

६ खंडेराव काशी न्यायाधीश : —पेशजीं त्याचे बाप होते, ते वृद्ध झाले सबब मशारनिल्हेस धंदा सांगितला, छ २९ जिलकाद सन इहिदे खमसैन राजशक ७७ प्रमादी नाम संवत्सरें. कारकीर्द शाहू महाराजाचा दत्तक राजाराम याची आहे. सरकार पाथरी वगैरे महाल सरंजामास.

७ अपाजी खंडेराव न्यायाधीश :—अर्बा सबैन मया अलफ राजशक १०० सालीं वस्त्रें दिलीं. नेमणूक १००० व शिवाय सरंजाम.

---

3. Sakho Vithal Nyayadhish.—There is a record of Saramjam being given to him in A. D. 1708-9. The Saramjam consisted of the Subha of Vyaghragarh &c.
4. Honaji Pandit.—Who held the office of Senakarte was in A.D. 1712-13 appointed Nyayadhish and continued in that Post till A. D. 1725-26.
5. Kasirao Anant Nyayadhish.—The former Nyayadhish, Honaji Anant who accompanied Fatesing Bhosle with his army having died, his brother Kasirao Anant was made Nyayadhish. His Saramjam consisted of Sarkar Nanded &c.
6. Khanderao Kasi Nyayadhish.—The father of Khanderao Kasi having become old, he was appointed to the post of Nyayadhish in A. D. 1750-51. His Saramjam consisted of Sirkar Pathari and other Mahals.
7. Apaji Khanderao Nyayadhish.—He was appointed in A. D. 1773-74. He was given a yearly Salary of 1,000 ; in addition to Saramjam.

The Mutaliks, Phadnis and other persons who were in the service of

न्यायाधीश यांचे दिमतीचे व फडणिशीचे व मुतालकीचे वगैरे इतर लोक होते ते:— १ केसो मल्हार फडणीस व मुतालिक, १ जिवजी गोविंद पोतनीस, १ निरंजन दुबाजी मुजुमदार १ खंडोराम सबनीस, १ गोविंद मल्हार मुतालिक.

[ १५४ ] राजश्री खंडेराव काशी न्यायाधीश याजकडे बाबतियाबद्दल मुकासे पेशजी-पासून आहेत, तेणेंप्रमाणें करार महाल्लानिहाय बितपशील छ २७ रोजीं बार असे.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
साबान १५.

सरकार कानूर:—१ परगणे कानूर, १ परगणे शेवाळे, १ परगणे अणशिंगे, १ परगणे मनाटे, १ परगणे पुसद, १ परगणे कोरटे, १ कसबे इंगवळी, १ कसबा ठाणकी, एकूण ८.

संस्थान नांदेड:—॥- परगणे नांदेड, -॥- परगणे व संमत, १ परगणे वसे, १ कसबा खेड, एकूण ३.

संस्थान मेहेकर:— -॥- आहांगपूर, १ परगणे शिरपूर, १ परगणे बाकंद, १ परगणे मलकापूर पागे, १ परगणे जाफराबाद, १ परगणे देऊळघाट, १ परगणे साकरखेडल, एकूण ६॥.

संस्थान वेताळवाडी:—१ परगणे सावेली, १ परगणे चांडोलबेग, एकूण २.

पत्र फिरवून महाल व देहाये.

संस्थान पाथरी:—१ परगणे शेवली, १ परगणे जितूर, १ परगणे झरी, १ परगणे पांचोगांव, १ परगणे परभणी, -॥- परगणे हवेली पाथरी, १ कसबा भोगाव, एकूण ६॥.

संस्थान वाशीम:—१ परगणे आंवढे नागनाथ, १ परगणे बालहणी, १ परगणे नबशी, १ परगणे कलमनुरी, १ कसबा टाकळी कुंभकर्णाचा, एकूण ५.

संस्थान जालनापूर:—१ परगणे आंधेगांव, १ परगणे राजणी, एकूण २.

संस्थान धारूर:—१ परगणे पाहजरें, १ परगणे शेळगांव, एकूण २.

मुकासे एकंदर पत्र दिलें छ २७ रोजीं बार असे.

एकूण महाल ३५ पस्तीस यांस आपलीं ताकीदपत्रें सन सलास खमसैनचीं देऊन अंमल सुरळीत चाले तें करणें ह्मणून राजश्री पंत प्रधान यांसी पत्र दिलें पा. हुजूर.

---

the Nyayadhish, were :—

1 Keso Malhar Phandnis and Mutalik. 1 Jivji Govind Potnis. 1 Niranjan Dubaji Mujumdar.—1 Khanderam Sabnis. 1 Govind Malhar Mutalik.

A. D. 1752-53.

(154) The Mahals held in Saramjam by Khanderao Kasi Nyayadhish are specified in this Sanad.

# राजकीय (ब) इतर माहिती.

## दाभाडे सेनापति,

[१५५] १ तुकोजी चोरः—शिवाजी महाराजांचे कारकीर्दीत नेमल्याची माहिती मिळते.

२ माणकोजी दहातोंडेः—शिवाजी महाराजांचे कारकीर्दीत नेमल्याची माहिती मिळते.

३ नेताजी पालकरः—शिवाजी महाराजांचे कारकीर्दीत नेमल्याची माहिती मिळते.

४ प्रतापराव गुजरः—शिवाजी महाराजांचे कारकीर्दीत नेमल्याची माहिती मिळते.

५ बासाजी मोहिते हंबीररावः—संभाजी महाराज यांचे कारकीर्दीत नेमल्याची माहिती मिळते.

६ महादाजी पानसबाळः—राजारामसाहेब यांनीं नेमल्याची माहिती मिळते. याचा वर्ग दुसरीकडे.

७ संताजी घोरपडेः—राजारामसाहेब यांनीं नेमल्याची माहिती मिळते. दुसरीकडे वर्ग लष्करांत.

८ धनाजी जाधवः—राजारामसाहेब यांनीं नेमल्याची माहिती मिळते. दुसरीकडे वर्ग लष्करांत.

९ जयसिंग जाधवः—कधीं नेमले ती तारीख समजत नाहीं, परंतु सन १७०९ यांस सेनापति असें लिहिलें आहे.

---

(155) The information under this head is taken not from the diaries but from a memo. prepared in and kept in the records of the Satara Raja.

1. Tukoji Chour.
2. Mankoji Dahatonde.
3. Netaji Palkar.
4. Prataprao Gujar.
5. Basaji Mohite Hambirrao.
6. Mahadaji Panasbal.
7. Santaji Ghorpade.
8. Dhanaji Jadhav.
9. Jaysing Jadhav.—He is referred to as Senapati in a document dated A. D. 1709.

१० मानसिंगराव मोरे :—सन १७०९ सालांत यांस सेनापति असें लिहिलें आहे.

१०(अ) चंद्रसेन जाधवः—या नांवचा कागद झालेला आढळत नाहीं परंतु हा मनुष्य या दिमतींत असे.

११ संताजी जाधव :—मुकाम किल्ले सातारा येथें छ १६ जिल्काद इसन्ने अशार रोजीं वस्त्रें दिलीं.

१२ खंडेराव दाभाडे :—खमस अशरीन मया अलफ.

१३ त्रिंबकराव दाभाडे :—छ २९ जमादिलाखर माघ शुद्ध १ सौम्य नाम संवत्सरे सुरूसन सलासीन मया अलफ.

१४ यशवंतराव दाभाडे छ १७ रबिलाखर अश्विन बहुल ४।९ भृगुवार विरोधिकृत नाम संवत्सरे सुरूसन सलासीन मया अलफ.

[ १९६ ] किती सनद छ ८ रोज राजश्री खंडेराव दाभाडे यांस पेशजीं सेनाखासखेलीचा धंदा होता तो दूर करून हल्लीं राजश्री मानसिंग मोरे यांस सेनापति होती ते दूर करून हल्लीं यांस सेनापति सांगितली असे, यांस वेतन देखील चाकर सालिना होन पातशाही १००००.

इ. स. १७१६-१७.
सबा अशर मया व अलफ.
सफर १०.

[ १९७ ] राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति यांस जाब जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें विदित जहालें. लिहिलें कीं अमला-मदरचा सरंजाम निंम्मे राजश्री कान्होजी भोसले यांस द्यावयास कबूल करून आणायाची आज्ञा केली त्यावरून त्याचें चित्त ठिकाणीं ठेविलें, ऐसें असतां तें कार्य

इ. स. १७२५-२६.
सित अशरीन मया व अलफ.
मोहरम १५.

10. Mansing Rao More.—He is referred to as Senapati in a document dated A. D. 1709.

10(A) Chandrasen Jadhav.

11. Santaji Jadhav.—He was given clothes at the fort of Satara in A. D. 1711-12.

12. Khanderao Dabhade A. D. 1724-25.

13. Trimbakrao Dabhade A. D. 1729-30.

14. Yeshwantrao Dabhade A. D. 1729-30.

(156) Khanderao Dabhade Senakhaskhel was appointed Senapati, in place of Mansing More. The annual emoluments of the office were 10,000 Hons.

A. D. 1716-17.

(157) Khanderao Dabhade Senapati wrote to the Raja expressing his regret that though he, the Senapati, had at the Raja's request consented to surrender half his Saramjam to Kanoji Bhosle in order to conciliate him, and bring him to the Raja, that duty was entrusted to the Pant Pradhan, and prayed

A. D. 1725-26.

राजश्री पंतप्रधान यांस सांगितलें. उत्तम जहालें. याउपरी सेवकाकडील सरंजाम येथपूर्वक देविला पाहिजे म्हणून लिहिलें, व राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि व राजश्री नारोराव मंत्री यांनीं येविषयीं विनंति केली. तुह्मांस दक्षण प्रांतें मसलतेस जाण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे. फौजेचा गाहा करून विजयादशमीकारणें यावें लागतें येविषयीं आज्ञा केलीच आहे. तुमचा पूर्वील सरंजामाचे ताकीदरोखे पाठविले आहेत. दसऱ्याच्या मुहूर्तें फौजेचा गाहा करून स्वार होऊन येणें. लोकमनसबा सिद्धीस पाठवावा लागतो हें जाणून स्वामी संतोष पावे तें करणें. १.

[ १५८ ] किताबपत्रें.—१ राजश्री सेनापति यास पत्र जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें, प्रविष्ट झालें. आपले पोटांत सांप्रत शूळवेथ जहाली तेणेंकरून बहुत श्रमी झालों. स्वामीचे पुण्येंकरून कांहीं आरोग्य झालें ह्मणून लिहिलें, विदित झालें. वेथ उताराखालीं पडली याणेंकरून चित्त संतोषातें पावलें. याउपर औषधउपाय करून वेथा निशैल्य झालियानें वर्तमान लिहिणें.

इ. स. १७१६-१७.
सबा अशर मया व अलफ.
जिल्हेज २६.

[ १५९ ] प्रांत गुजराथ निंमे राजश्री चिमणाजी बल्लाळ यांजकडे मुकासा होता तो दूर करून हल्लीं राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति यांजकडे जमावा बेगमीस मुकासा दिल्हा. प्रांत मजकूर निंमे .।।.

इ. स. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
जिल्हेज २३.

[ १६० ] चिटणिशी पत्रें.—सरदारास समाधान पत्रें जे, तुमचेविषयीं राजश्री सेनापति यांनीं सांगितलें तें कळलें. सर्व प्रकारें तुमचें अगत्य आहे. स्वामी तुमचें ऊर्जित करणें तें करतील ह्मणोन पत्रें व खर्चें पाठवून देणें ह्मणोनः– १ राजश्री कंठाजी कदम, १ राजश्री कृष्णाजी दाभाडे, १ रघूजी कदम, १ पिलाजी गायकवाड, एकूण ४.

इ. स. १७२६–२७.
सित अशरीन मया व अलफ.
रजब २९.

---

that his former Saranjam might be restored to him. His prayer was granted and he was directed to be ready with his army to proceed on a campaign to the South as previously ordered.

(158) The Senapati was suffering from some stomach complaint; satisfaction was expressed that he was now recovering..

A. D. 1716-17.

(159) Half the Guzerath was formerly given in Mokasa to Chimnaji Ballal. It was now made over to Khanderao Dabhade Senapati.

A. D. 1727-28.

(160) Pilaji Gaikwad, Raghoji Kadam and other Sardars were informed that the Senapati had spoken highly about them, that the Raja took an interest in their welfare, and that they would be raised to higher positions.

A. D. 1726-27.

[ १११ ] राजश्री दमाजी गायकवाड यास समाधान पत्र जे, पिलाजी गायकवाड यासी घोगडसिंगानें दंगा केला त्यामागें तुह्मी हिंमत धरून अंगेजणी बरीच केली ह्मणून राजश्री यशवंतराव दाभाडे सेनापतीनें लिहिलें त्यावरून विदित जालें. तरी होणार ते गोष्ट झाली. त्याचा खेद न करणें. तुह्मांविषयीं सेनापति यासी आज्ञा केली आहे, ते तुमचें उभारणी करून चालवती-ल. तुह्मीं त्यांचे हुकुमाप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणून पत्र १ वैशाख शुद्ध प्रतिपदा.

इ. स. १७३१--३२.
इसन्ने सलासीन मया व अलफ.
जिलकाद ४.
19 april 1732

---

# राजकीय(व)इतर माहिती.

## रघुजी भोसले.

[ ११२ ] राजश्री रघुजी भोसले यास राजपत्र जे, या प्रांतें कित्येक मनसुबा येऊन प्राप्त झाला आहे. स्वामींनीं कुल फौजांचा गाहा करविला आहे. तुह्मींही पवृदर्शनीं फौजेनिशीं येणें.

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
साबान १. 22-3-1727

[ ११३ ] राजश्री कान्होजी भोसले यास आज्ञा केली ऐसी जे, तुह्मीं स्वामीचे दर्शनास हुजूर आलेत. राजश्री राणोजी भोसले हुजूर होते, त्यास स्वामींनीं तुह्मां उभयतांचें समाधान करून सरंजामाची वांटणी करून दिले असे. बितपशील मसुरचे मुकामींः--

इ. स. १७२६--२७.
सबा अशरीन मया व अलफ.
रमजान ७.
18-4-1727

---

(161) Dhogadsing raised an insurrection against Pilaji Gaikwad. After Pilaji's death, Damaji Gaikwad fought courageously with Dhogadsing. Yeshwantrao Dabhade having reported the fact to the Raja, a letter was addressed to Damaji intimating to him that the inevitable had occurred, that he should not feel sorry for it and that the Senapati would make suitable provision for him.

A. D. 1731-32.

(162) Raghoji Bhosle was directed to repair to Satara with his army.

A. D. 1726-27.

(163) A division of Kanoji Bhosle's Saramjam was effected; of the Saramjam granted through 2-3rds Peshwa and 3-4ths of the Saramjam granted by the Raja were given to Kanoji, and the rest to his brother Ranoji and Raghoji. The

A. D. 1726-27.

राजश्री बाळाजी पंडित प्रधान याचे विद्यमानें सरंजाम करार करून दिला आहे त्यापैकीं दोन तक्षिमा तुह्मीं व राजश्री राणोजी व रघुजी भोसले यास एक तक्षीम दिला. कलम १.

हल्लीं प्रभव संवत्सरीं मार्गशीर्षमासीं सातारियाचे मुक्कामीं स्वामींनीं हुजूरून सरंजाम दिला, त्यापैकीं तीन तक्षिमा तुह्मीं व चौथाई राजश्री राणोजी भोसले व रघुजी भोसले यास सरंजाम दिला कलम १.

येणेंप्रमाणें सरंजामाची वांटणी करून देऊन राजश्री राणोजी भोसले यास तुह्मांसमागमें दिले असत. स्वामीचे आज्ञेप्रमाणें तुह्मीं मान्य करून स्वामीचे पायाचा शपथ केलात. याउपरी सदरहु वांटणीप्रमाणें सरंजाम त्यास चालवणें. ते व तुह्मीं एका विचारें वर्तोन स्वामीकार्य करणें. ते तुमचे महालांत दखल होणार नाहींत. सरंजामाखेरीज परमुलखांत खंडण्या घ्याल त्यापैकीं चौथाई सरदारीचा वांटा काढणें; बाकी ऐवज राहील तो तुमचे व राणोजी भोसले ह्याचे फोजेबरहुकूम वांटून घेत जाणें. राणोजी भोसले व रघुजी भोसले तुह्मां दिमतींत दिले असत, तुमचे विचारें स्वामीसेवा करतील. तुह्मीं त्यांचें चालवावयास अंतर न करणें. तुमचा दुमाला तुह्मीं करीत जाणें. सदरहू तहाप्रमाणें वर्तावयास उभयतांही अंतर न करणें. छ ७ सवाल पत्र १.

[ १६४ ] राजश्री रघुजी भोसले यास खासदस्तकाचें पत्र सादर केलें जे, तुह्मांस ऐवजाविषयीं वरचेवरी आज्ञापत्रें पाठविलीं परंतु तुह्मीं निकाल करून पाठविला नाहीं, डोळेझांकी करून दिवस घालविले. यानें परिणाम लागतो ऐसें नाहीं. याउपर हें आज्ञापत्र सादर केलें असे; तरी सालगुदस्त व सालमजकूरचे ऐवजाचा निर्वाह करून शिताबीनें पाठविणें. हे गोष्टी तुह्मांपासून होत नाहीं तरी स्वामी विचार करणें तो करतील. मग तुह्मांस विचार भारी पडेल, हें जाणून वर्तणूक करणें. या कामास महादजी तोडकर व संताजी तोडकर जासूद पाठविले असत. यास दर असामीस रुपये ५० पन्नास प्रमाणें मसाला देविला रुपये १००.

इ. स. १७३४--३५.
खमस सलासीन मया व अलफ.
रमजान ५.

---

three brothers swore by the Raja's feet to bury all their differences and to live amicably in future. Kanoji was directed to continue to the brothers the share assigned to them, and also to divide 3-4ths of the tributes levied by him in foreign territories between him and Ranoji in the proportion of their respective armies.

(164) The annual tribute due from Raghoji Bhosle was in arrears. Raghoji was frequently written to but without effect. He was now warned that if the amount for the current and the preceding years was not paid, the Raja would take severe steps and that it would then go hard with him.

A. D. 1734-35.

[ १६५ ] राजश्री रघुजी भोसले यास खासदस्तखताचें पत्र जे, तुह्मांस दर्शनास येणें

इ. स. १७३५-३६.
सित सलासीन मया व अलफ.
जमादिलावल ५.

ह्मणोन दोन चार आज्ञापत्रें सादर केलीं असतां यावयाचा विचार केला नाहीं यावरून अपूर्व वाटतें. सेवकलोकीं स्वामींची आज्ञा होईल तेणेंप्रमाणें वर्तावें हें उचित आहे. हुजूर यावया अनमान करितां हे गोष्टी कार्याची नाहीं. तुह्मांस कित्येक प्रयोजनप्रसंगाची आज्ञा कर्तव्य आहे; यास्तव हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी जे क्षणीं पत्र पावेल ते क्षणीं स्वार होऊन टाकोटाक स्वामीसंनिध येणें. अतःपर दिवसगतीवरी न घालणें. या कामास लोक दिंमत हुकेबारदार पाटील नाईक पाठविले आहेत यांस मसाला देणें रुपयेः—२०० पुंजाजी पवार, २०० राणोजी जाधव, एकूण ४००. छ १३ मिनहू मसाला भरून दिला.

[ १६६ ] किता हातरोखे बनाम राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यास आज्ञा

इ. स. १७४२-४३.
सलास अर्बैन मया व अलफ.
साबान २.

कीं, तुह्मीं खंडे राजुरीचे मुकामीं दोन लक्ष रुपये द्यावयाची बोली केली, तो ऐवज अद्याप आला नाहीं; याजकरितां हल्लीं हुजरे पाठविले असत, तरी यास वेतनांत देणें आणि ऐवज सदरहु शिताबीनें पाठविणें, ह्मणून पत्र १. एकूण मसाला भरून रुपयेः—

२०० जथे शिदोजी साळोखी. १ तुळाजी कदम, १ अबाजी जाधव एकूण २. १०० कान्होजी येलकर जथे प्रतापजी नाईक. १०० संताजी सूळ जथे बुधजी नाईक. एकूण ४००.

[ १६७ ] राजश्री रघुजी भोसले सेनासाहेब सुभा यांसी पत्र जे, तुह्मांकडील हुजूरचा

इ. स. १७५३-५४.
अर्बा खमसैन मया व अलफ.
साबान १५.

ऐवज येणें व कर्जाबाबद येणें येविषयीं तुह्मांस आज्ञापत्रें सादर होतात त्यास अनादर करावा ऐसें नाहीं. स्वल्पकालें राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांच्याही भेटी होतील आणि सर्व सर-

---

(165) Raghoji Bhosle was often requested to come to the Huzur

A. D. 1735-36.

but without effect. He was now informed that a servant ought to obey his master and that he should repair to the Huzur without a moment's delay as some important mission were to be entrusted to him.

(166) Raghoji Bhosle Sena Sahib Subha was asked to remit

A. D. 1742-43.

two Lacs of Rupees as agreed upon at Khande Rajpuri.

(167) Raghoji Bhosle Sena Sahib Subha was reprimanded for his

A. D. 1753-54.

disregard of Government orders directing him to remit Government dues, and was informed that the Peshwa and other Sardars would soon meet the Raja, and that Raghoji would also have to come on that occasion.

आरही येतील. तेव्हां तुह्मांसही हुजूर यावें लागेल. साहेबांविना दुसरा परिणाम नाहीं ऐसें आणून आजितागाईत कर्जाचा व तुह्मांकडील ऐवज राहिला असेल तो हुजूर पाठविणें. या कामास (जागा कोरी आहे) पाठविले यासी खर्चास रुपये देणें पत्र १.

इ. स. १७७३-७४.
अर्बा सबैन मया व अलफ.
रबिलाखर ६.

[१६८] राजश्री शहाजी भोसले सेनासाहेब सुभा यांणीं राजश्री स्वामीस नजर बितपशील:—

५ जवाहीर:—१ तुरा (मोती सर सात दर ३१ प्रमाणें २१७ व दांडी १ साधी सोनियाची.) १ जिगा मदनाईक पाचेचा व लोलक पाचेचा, १ चौकडा मोती दाणे ४ बनाय सोनें, १ कंठी मोतीं ३२ पदक निळाचें बनाय लोलक नीळ, १ शिरपेच मदनाईक पाचेचा व लोलक पाचेचा. एकूण ५.

१ पोषाख:—१ चिरा पैठणी, १ दुपट्टा जरी पैठणी, १ जामेवार हादली जोडी, १ किनखाप काशीचा.

१ महालांत:—२ पातळें पैठणी, २ चोळखण पैठणी, २ पासोड्या पैठणी, २ किनखाप अमदाबादी, एकूण ८.

१ पट्टे बारदार मकणा हत्ती:—१ सिरी बनाती, १ गाशा बनाती, २ लंगर व बेडी लोखंडाची, २ कंठबंधन व नमदा, एकूण ६.

१ घोडा सरंजामासुद्धां. एकूण ९.

येणेंप्रमाणें पाठविलीं तीं गोपाळ शेषाद्री कारकून नि बत मल्हारनिल्हे यांनीं हुजूर येऊन गुदरलीं.

# राजकीय (ब) इतर माहिती.

## होळकर.

[१६९] बेशाम खंडोजी बिन मल्हारजी होळकर निमे मोकदम मौजे वाफगांव तर्फ खेड संमत जुन्नर यांनीं सातारचे मुकामीं हुजूर येऊन विनंति केली कीं, मौजे मजकूरचे मोकदमीचे तिवे तक्षीमदार आहेत, त्यास वतनमुळें कर्जेवाम झालें. तें वारावयास मवसर नाहीं, याजकरितां

इ. स. १७३४-३५.
खमस सलासीन मया व अलफ.
साबान १८.

(168) A present consisting of 5 Jewels, some clothes, 1 horse, 1 Elephant was made to the Raja by Sabaji Bhosle, Sena Sahib Subha.

A. D. 1773-74.

(169) Half the Patilki Watan of the village of Wafgaon in Turf Khed was purchased by Khandoji bin Malharji Holkar for Rs. 2,752. The purchase was ratified by Government, and a Nazar of Rs. 1,000 was imposed.

A. D. 1734-35.

आपणाजवळी येऊं. बाजीद होऊन आपले तक्षिमेपैकीं निंमे निंमे वतन आपणास विकत देऊन खरेदीखतें दिधलीं आहेत. तें स्वामींनीं मनास आणून निंमे मोकदमीचे वतनाचीं हुजूरचीं पत्रें आपणांस करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे म्हणून विनंति केली, आणि खरेदीखतें दाखविलीं त्याचा मजकूर तपशीलवार अवर्जा बार असे:—

१२९१ रखमाजी बिन सुभानजी पाटील वगैरे कराले मोकदमी चौथी तक्षीम नाव, नांगर, वडीलपण, मोहोरपपैकीं निंमे मोकदमी व नांव, नांगर, मोहोरप, वडीलपण दिलें व मानपान हक, निंमे बरहुकूम खरीद शके १६९९ प्रमाथी संवत्सर अश्विन शुद्ध दशमी सन अर्बा सलासीन.

१००१ जयराम निळकंठ याची मोकदमी तक्षीम निंमेपैकीं निंमे दिली. मानपान, हक, निंमे बरहुकूम खरीदखत शके १६९९ प्रमाथी संवत्सर फाल्गुन वद्य द्वितीया सन अर्बा सलासीन.

५०० रामोजी व हणमाजी बिन रामाजी वगैरे कराले मोकदम चौथी तक्षीमपैकीं निंमे निंमे दिली. मानपान हक निंमे बरहुकूम खरीदखत शके १६९६ आनंद संवत्सर चैत्र शुद्ध नवमी सुरुसन अर्बा सलासीन. एकूण २७९२.

येणेंप्रमाणें खरीदखतें आणून दाखविलीं त्यावरून मनास आणितां तिघां तक्षीमदारांनीं आपले मोकदमीपैकीं निंमे निंमे त्यास दिली. ऐसें जाणोन याजवरी स्वामी कृपाळू होऊन मौजे मजकूरचें निंमे मोकदमीचें वतन यास व याचे वंशपरंपरेनें करून दिलें. या वतनास शेरणी रुपये १००० एक हजार स्वराज्य व मोगलाई अंमल एकूण दुतर्फा करार केले. येविषयीं पत्रें:—१ वतनपत्रें बनाम खंडोजी बिन मल्हारजी होळकर, १ मोकदम, १ देशमुख देशपांडे तर्फ मजकूर, १ देशाधिकारी, १ राजश्री पंतप्रधान, एकूण ५ पत्रें पौष शुद्ध षष्ठी भृगुवासर आनंद संवत्सरे.

[ १७० ] राजश्री मल्हारजी होळकर यासी आज्ञापत्र जे, राजश्री राय जोगीदास व

इ .स. १७५३--५४.
अर्बा खमसैन मया व अल्फ.
रमजान १३.

राजश्री राय लछीराम हे राजश्री तुळजाराम वकील हुजूर याचे शरीरसंबंधी दिल्लींत आहेत. त्यास धंदे अलमगीर याजपासून चालत होते, हल्लीं चालत नाहीं, म्हणून हुजूर विदित झालें त्यावरून तुम्हांस हें आज्ञापत्र सादर केलें जे, तुमचें जाणें हुजूर झालें तरी अगर न झालें तरी रुबीत अगर कागदीं पत्रीं सदरहु उभयतां मशारनिल्हेची पूर्ववत् स्थापना करणें म्हणून आज्ञापत्र १.

---

(170) Ray Jogidas and Ray Lachiram were related to Tuljaram,

A. D. 1753-54.

the Huzur agent, and were at Delhi, certain offices enjoyed by their families from the time of Alumgir were not now continued to them. Malharji Holkar was directed either by personal communication on his visit to Delhi, or by a letter in case he did not go there, to arrange for the continuance of their offices to them.

# राजकीय (व) इतर माहिती.

## घोरपडे.

[ १७१ ] राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकत मदार यांसी पत्र जे, सगुणाबाई व राजश्री मुरारजीराव घोरपडे स्वामीसन्निध आले. उभयतांची स्वामीची भेटी झाली. तुह्मीं केल्या निश्चयाप्रमाणें यास दर्शनास पाठविले यावरून स्वामी संतोषी झाले. स्वामींनीं सर्व प्रकारें याचा अभिमान भरिला आहे, येविषयीं कित्येक आज्ञा राजश्री नारोराम मंत्री यांस केली आहे. त्यांनीं तुह्मांस लिहिलें आहे. तें वचनें स्वामींचीं मानून आपलें समाधान असों देणें ह्मणून चिटणिशी पत्र १.

इ. स. १७३०-३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
जमादिलावल १४.

# राजकीय (व) इतर माहिती.

## कोल्हापूरकर महाराज.

[ १७२ ] मातुश्री आईसाहेब यास राजश्री स्वामींनीं पत्र लिहिलें कीं, वडिलीं आशिर्वादपत्र पाठविलें. प्रविष्ट होऊन लेखन अभिप्राय कळोन आला. वडिलीं ममतायुक्त लिहिलें तरी वडिलीं ममतायुक्त परामर्श केला येणेंकरून अनंदावाप्ति जहाली. वस्त्रें पाठविलीं तीं प्रविष्ट झालीं. हसूरचे पाटलाविषयीं लिहिलें त्यावरून रामजी जाधव यास आज्ञा करून पाटील सोडून देविला असे. ते सोडून देतील. लौकरीच गांवास येतील. पत्र १.

इ. स. १७२३-२४.
अर्बा अशरीन मया व अलफ.
रमजान ६.

[ १७३ ] मातुश्री आईसाहेब मुक्काम पन्हाळा यास पत्र जे, राजश्री नारोराम मंत्री यांच्या पुत्रास कुडाळ प्रांतें वधु योजिली आहे. गतवर्षी लग्ननिश्चय करून वडिलांस लिहिलें त्यावरून वडिलीं कार्याचें दस्तक पाठविलें होतें, परंतु गतवर्षी लग्नप्रसंग राहिला. यंदां वैशाख-

इ. स. १७२५-२६.
सित अशरीन मया व अलफ.
रजब १२.

(171) Hindurao Ghorpade Mamalkat Madar was thanked for sending Sagunabai and Murarjirao Ghorpade for an interview with the Raja.

A. D. 1730-31.

(172) At the desire of Aisahib (of Kolhapur) who is addressed as Matushri the Patil of Hasur was ordered to be set at liberty.

A. D. 1723-24.

मासीं लग्नाचा सिद्धांत करून हें पत्र वडिलांस लिहिलें आहे. तरी वडिलीं कार्याचें दस्तक पाठवावें ह्मणजे मशारनिल्हेचे पुत्र समुदायसहवर्तमान स्वार होऊन येतील. वडिलीं त्याबराबर आपली संगिनात देऊन सुरक्षित त्या स्थळास पाठवून लग्नसिद्धि झाल्यावर आपणास स्वस्तिक्षेम निरुपद्रव प्रविष्ट होतें तें केलें पाहिजे. पत्र १.

[ १७४ ] राजे संभाजी राजे यास व मातोश्री आईसाहेबांस जाब. राजश्री महादजी घाडगे याचा पुत्र वर आहे तर चिरंजीव चिमाबाईचा निश्चय करावा ह्मणोन लिहिलें. तर आपण माणसें त्याजकडे पाठवून त्यांचीं माणसें आपलेसंनिध नेऊन निश्चय करणें तो केला पाहिजे. ते पुरातन शरीरसंबंधींच आहेत ह्मणोन पत्रें दोन २.

इ. स. १७२८--२९.
तिसा अशरीन मया व अलफ.
मोहोरम १८.

[ १७५ ] छ मजकुरीं राजश्री स्वामी कऱ्हाडास जाऊन राजश्री संभाजी राजे यांची भेट १४ वे घटकेस जाहली आणि सांयकाळीं माघारे कऱ्हाडास गेले. मुदपाक कऱ्हाडास केले. कल्हाड व जखीणवाडीमध्यें माळावरी भेट होऊन कसबे मजकुरीं श्री कृष्णातीरावरी मुकाम केले. शके ९७ साधारण नाम संवत्सरे फाल्गुन शुद्ध द्वितीया मंदवासरे.

इ. स. १७३०--३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
रमजान १.

[ १७६ ] चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांकडे ठाणें देविलीं येविषयीं पेशजीं आज्ञापत्रें सादर केलींच आहेत, तरी ठाणीं त्यांचे स्वाधीन करावीं ह्मणून पत्रें देऊन भिवाजी शिंदे व महादजी पवार हुजरे पाठविले यास देविले रुपये:--१० बाबाजी थोरात यास पत्र जे, वडगांवाचें ठाणें

इ. स. १७३०--३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
जिल्काद १७.

---

(173) The son of Naro Ram Mantri was to be married to a girl in Kudal Prant. Matushri Aisaheb of Panalla was requested to send a passport for the safe conduct of the bridegroom and his men into the province.

A. D. 1725-26.

(174) Sambhaji Raja and Matoshri Aisaheb asked the Raja to settle the marriage of Chimabai with Mahadji Ghatge's son. They were informed that the Ghatges were already related to the royal family, and that Sambhaji and Aisaheb should send their men to Ghatge and invite their relations and settle the matter themselves.

A. D. 1728-29.

(175) The Raja met Sambhaji Raja at Karad on this date.

A. D. 1730-31.

(176) The following Thanas were ordered to be made over to Sambhaji Raje :—

A. D. 1730-31.

पाडून देणें व हरकर्चे ठाणें देणें ह्मणून पत्र या कामास मसाला, १० व्यंकटराव नारायण ममलकतमदार यास मांदणीचें ठाणें देणें ह्मणून पत्र, १० आनंदराव साकदेव भिवराव गोविंद यास आळते येथील ठाणें याविषयीं, एकूण रुपये ३०.

[ १७७ ] हातरोखा राजश्री संभाजी राजे याचे मुलखांत उपसर्ग देतात, गड, किल्ले कोट ठाणीं घेतात, याजकरितां त्यास ताकीदपत्रें देऊन राजश्रीकडील हुजरे पाठविले आहेत. तरी त्याचे प्रांतास उपसर्ग न देणें आणि रामचंद्र बाबाजी यास त्यांनीं फोंडे व सुपे कोंकण प्रांतें पाठविले आहेत त्यास सामील होऊन ठाणीं व गड किल्ले व प्रांत सोडवून देऊन त्याचा अंमल चाले ऐसें करणें येविषयींपत्रें व मसाला रुपये:---

इ. स. १७४०--४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
जिल्हेज १२.

राजश्री राघोजी घोरपडे सेनापति पत्र १, मसाला रुपये ०. राजश्री दादुराव नवलगुंदकर पत्र १, मसाला रुपये १००. गंगाजळ निर्मळ सगुणाबाई शिंदे मामी पत्र १, मसाला रुपये १००. राजश्री हिंदुराऊ घोरपडे ममलकतमदार पत्र १, मसाला रुपये ३००. दौलतराव घोरपडे पत्र १, मसाला रुपये १००. एकूण पत्रें ५ व रु. ६००.

[ १७८ ] छ २३ रोजीं सोमवारीं महाराज राजश्री संभाजी राजे आज्ञा घेऊन कोल्हापुरास आपल्या स्थळास गेले.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
मोहोरम २०.

[ १७९ ] कित्तापत्रें चिटनिशी फाल्गुन शुद्ध ९ इंदुनासर रोजीं संभाजी राजे महाराज यांच्या प्रांतांतील जमीदार व संस्थानेक वगैरे घाटगे आदीकरून हसीत होऊन मर्यादेनें वर्तत नाहीं ह्मणून हुजूर विदित झालें, तरी हे गोष्टी कार्याची नाहीं. याउपरी त्यासी निष्ठापूर्वक मर्यादेनें

इ. स. १७४४–४५.
खमस अर्बैन मया व अलफ.
सफर १२.

---

1 The Thana of Wadgaon (after destroying the fortifications). 1 The Thana of Harela. 1 The Thana of Madni. 1 The Thana of Alate.

(177) Letters to Ranoji Ghorpade Senapati, Dadurao Navalgundkar, Sagunabai Sinde and Hindurao and Daulatrao Ghorpade directing them to abstain from plundering the territory of Raja Sambhaji and to recover and surrender to him his forts and stations in Fonde and Supe in Prant Konkan.

A. D. 1740-41.

(178) On the 23rd of Moharum, Raja Sambhaji took leave of the Satara Raja and went back to his kingdom of Kolhapur.

A. D. 1740-41.

(179) Government having learnt that the Jamidars, Sansthanics &c. (including Ghatge and others) in the territories of the Sambhaji Raja were behaving rudely with

A. D. 1744-45.

वर्तणूक करून त्यांचीं पत्रें निष्ठापूर्वक मर्यादेनें वर्ततां ऐशीं स्वामीस येत ते गोष्टी करणें. फिरोन बोभाटा आलिया फौज पाठवून पारपत्य करणें लागेल ऐसें स्पष्ट समजोन वर्तणूक करणें ह्मणून पत्रें.

इ. स. १७४४-४५.
खमस अर्बैन मया व अलफ.
सफर १२.

(१८०) राजश्री बाबूराव सदाशीव यास पत्रें २ मजकूर. १ चिकोडीपासोन तुंगभद्रेपावेतों मुलूख मारून ताराज केला. सोंधे, बिदनूर, बंकापूर या तिन्ही संस्थानांपासून टका घेतला. यामुळें राजश्री येऊन रुसवा करून बसले आहेत. तेव्हां तुह्मीं टका जो चिकोडीपासून तुंगभद्रेपर्यंत तिन्ही संस्थानें आदीकरून घेतला त्याची चौथाई व हत्ती घोडे निंमे येणेंप्रमाणें द्यावयाचा करार करून स्वामींनीं त्यासी शपथ केली आणि हें आज्ञापत्र तुह्मांस सादर केलें आहे. तर चिकोडीपासून तुंगभद्रेपर्यंत संस्थानें देखील जो टका घेतला असेल त्याची चौथाई व हत्ती घोडे निंमे याप्रमाणें आले आहेत याचे पदरीं घालणें. पावलियाचें कबज हुजूर पाठविणें ह्मणून पत्र.

१ कित्तापत्र कीं. सोंध्यास शिवाजी त्रिमल पाठविले होते त्यांकडे संस्थानचा ऐवज पावों दिला नाहीं व शिवाजी त्रिमलास नागवून त्याची अप्रतिष्ठा केली ह्मणून कळों आलें यावरून हें उत्तम केलें नाहीं. तुह्मीं व ते सेवकपणांत दोन नाहींत. तर सोंध्याचा पैका जो घेतला असेल तो त्याचा त्याकडे देणें; व शिवाजी त्रिमलाचा बहुमान करून त्याजकडे रवाना करणें. एकूण २.

---

him, they were directed to submit to his authority, and were told that if they failed to do so, a force would be sent against them, and they would be punished.

A. D. 1744-45.

(180) Baburao Sadashiv levied contributions from the Sansthans of Bidnur, Bankapur and Sidhi. The Raja (Sambhaji Raja of Kolhapur) being displeased at this levy, the Satara Raja promised to give him the Chouthai, namely, a fourth of the amount and one-half of the number of elephants and horses received. Baburao was directed to carry out this promise.

Baburao was censured for levying the revenue of Sondha and for insulting Siwaji Trimal sent to the province by the Kolhapur Government. He was ordered to apologize to Siwaji Trimal and to remit to him the money levied on him.

[ १८१ ] करवीरवासीयांनीं पार्वती भोसली यासी युद्धप्रसंग केला, त्यास तंबी पोहोंचवणें ह्मणोन ताकीदपत्रें सादर केलीं:--१ राजश्री घन:शाम नारायण मंत्री यासी, १ राजश्री उदाजी चव्हाण यासी, १ राजश्री शिवाजी साळूखी यासी, १ पार्वती भोसली यास आज्ञा जे, साहित्यपत्रें पाठविलीं आहेत त्याप्रमाणें पारपत्य करणें. एकूण ४.

इ. स. १७५२–५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहोरम २९.

[ १८२ ] राजमान्य राजश्री कृष्णराव पंडित अमात्य यांस आज्ञा केली ऐसी जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला. चिरंजीव राजश्री करवीरवासीयांचा व आपला विवेक जाहला ह्मणोन लिहिलें तें ऐकून साहेबास संतोष पावलें. कर्जदार शिबंदीमुळें जाहलों ह्मणोन लेख केला व कर्ज वारलें. चिंता काय आहे? तुह्मांवरी साहेब ( फाटलेलें आहे ) आहे. तुह्मीं पुरातन एकनिष्ठ, तुमचें चालवणें साहेबांस अवश्यक, कालानुरूप सर्व गोष्टी घडोन येतील ( पुढें फाटलें आहे ) समाधान असों देणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर २९.

[ १८३ ] राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यांहीं विनंतीपत्र पाठविलें त्याचें उत्तर जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तेथें अंगारकाची तहरबाचा विचार लिहिला नाहीं. व वडिलांकडील उभयतांमध्यें कलह आरंभिला, त्यांचें ऐक्य करून द्यावयाची आज्ञा होती त्याचें उत्तर लिहिलें नाहीं. बावडेकडील सौरस्य होऊन आला आहे ह्मणून लिहिलें विदित जहालें. त्यास बावडेकरी व करवीरवासी चिरंजीव यांचा सौरस्य संपादनावें तुह्मांस उचित. सावताकडील योग ऐक्य उभयतां होऊन सौरस्य चालेल तें करणें ह्मणून आज्ञापत्र सादर केलें. ता। रामचंद्र पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर १५.

---

(181) The Raja of Karvir having led an army against Parvatibai Bhosle, Ghanasham Narayan Mantri, Udaji Chavan and Siwaji Salokhe were directed to proceed against him.

A. D. 1752 53.

(182) A letter to Krishnarao Pandit Amatya expressing the satisfaction of Government at the reconciliation that took place between him and the Karvir Raja.

A. D. 1752 53.

(183) A letter to Jagjiwan Pandit Pratinidhi approving his action in effecting a reconciliation between the Bowdeker and the Karvir Raja.

A. D. 1752-53.

# राजकीय (व) इतर माहिती.

## फत्तेसिंग भोसले अक्कलकोटकर.

[ १८४ ] कित्ता पत्रें सरदारांस जे, तुह्मीं मुलखांत जाऊन जबरदस्तीनें खंडणी आकाराल त्याची सरकारची चौथाई काढावी ऐशी आज्ञा केली आहे. तरी जेथील जो ऐवज खंडणीचा येईल त्यापैकीं चौथाई ऐवज काढोन साहुकाराजवळी जमा करीत जाणें ह्मणून पत्रें. चिटनिशी पत्रें:—

इ. स. १७३०-३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
जमादिलावल १४.

१ चिरंजीव राजे फत्तेसिंग, १ दावलजीराव सोमवंशी सरलष्कर.

# राजकीय (व) इतर माहिती.

## निजाम.

[ १८५ ] कित्ता पत्रें लष्करचे सरदारांस जे, नबाब निजामनमुलुख यास परगणे जंबुसर वगैरे महाल प्रांत गुजराथ जहागिरा आहेत, तेथें तुह्मीं धामधूम करून महाल गांवमुद्धां घेतला आहे ह्मणोन हुजूर विदित जाहलें. तर काय वसूल घेतला असेल, तपशीलवार लिहून पाठविणें. याउपरी त्यानें महालीं धामधूम न करणें. या कामास हुजरे पाठविले त्यास वेतनात:—

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
मोहारम ७.

हुजरे:—जरीलानखान, महादजी कऱ्हाडकर. जासूद.—ह्मसाजी पवार व बहिरजी जाधव.

[ १८६ ] परगणे जंबुसर वगैरे महाल प्रांत गुजराथ नबाब निजामनमुलुख यास जहागीर आहेत, तेथें तुह्मीं धामधूम करतां तरी तेथें धामधूम न करणें.

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
सफर २२.

---

(184) Fatesing Bhosle and Dawaljirao Somawanshi Sir Laskar were directed to pay to Government one-fourth of the tributes exacted by them in their campaigns.

A. D. 1730-31.

(185) The officers of the army were directed to report the amount of the revenues recovered by them from the Pargana of Jambusar and other Mahals held in Jahagir by Nizaman-Mulukh, and to abstain from creating any disturbance in the Mahals in future.

A. D. 1726-27.

(186) The Senapati, Pilaji Gaikwad and Kanthaji Kadam were directed not to molest the Pargana of Jambusar and other Mahals in Guzerath held in Jahagir by Nizaman-Muluk.

A. D. 1726-27.

१ सेनापतीस, १ पिल्लाजी गायकवाड, १ कंठाजी कदम, एकूण ३.

[ १८७ ] राजश्री शिदोजी निंबाळकर याचा जाब जे, नबाब निजामनमुलुख आसारडोबावरी आहे. पुढें विचार करील तो लिहून पाठवीन ह्मणून लिहिलें विदित झालें. हुजूर ही बातमी बरोबर येतच आहे. याउपर बातमी राखोन गनिमाचें व त्या प्रांतीचें वर्तमान लिहून पाठवीत जाणें. पत्र १.

इ. स. १७२७--२८. समान अशरीन मया व अलफ. जिल्हेज ६. 15-7-1727

[ १८८ ] कित्तापत्रें मजकूर जे, भागानगर व वराड व देवगड चांदे या प्रांतें स्वारी जाणार ह्मणोन हुजूर विदित झालें. ऐसीयास नबाबाचा व स्वामीचा सल्ला आहे. यास्तव त्या प्रांतीं फौज गेलियानें नबाब अजुर्दा होऊन सल्ल्यास विक्षेप होतो; यास्तव भागानगर व वराड व चांदे व देवगड या प्रांतीं एकंदर स्वारीस नच जाणें ह्मणोन पत्रें, धामधूम न करणें ह्मणोन.

इ. स. १७२८–२९. तिसा अशरीन मया व अलफ. जमादिलाखर २५. 15.1.1729

राजश्री पंत प्रतिनिधि व फत्तेसिंग बाबा भोसले; कानोजी भोसले प्रधान व सरलष्कर राणोजी भोसले.

[ १८९ ] अजम अबदुल्लाखान याची कन्या सुरतेहून औरंगाबादेस येत होती त्यासी मार्गी येतां नवापुरानजीक राजश्री बाबुराव दाभाडे सेनाखासखेल यांणीं अटकावून ठेविली ह्मणून हुजूर विदित झालें. तरी नबाबाचा व स्वामीचा स्नेह, अबदुल्लाखान त्याचे दिवाण, त्याची कन्या अटकावी हे गोष्टी कार्याची नव्हे. प्रस्तुत नबाबानीं व राजश्री पंत सुमंत यांणीं व खान मशारनिल्हेनीं कित्येकविषयीं लिहिलें त्यावरून आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुह्मीं

इ. स. १७३५–३६. सित सलासीन मया व अलफ. मोहरम ३.

---

(187) Sidoji Nimbalkar informed the Raja that Nabob Nizaman-Mulak was at Asardob and that he would communicate the Nabob's future plans when settled.

A. D. 1727-28.

(188) The Raja was informed that some of his officers desired to lead a campaign into Bhaganagar, Berar and Devgad Chande. As it was thought that this would lead to hostilities with the Nabob who was at peace with Government the Raja directed the Pratinidhi, Fatesing Bhosle, the Pradhan and Kanoji Bhosle to give up the idea.

A. D. 1728-29.

(189) A daughter of Abdullakhan, Divan of the Nabob while on her way from Surat to Aurangabad was arrested near Nawapur by Baburao Dabhade Senakhaskhel and kept in confinement. The Nabob, Pant Sumant, and Abdullakhan

A. D. 1735-36.

बाबुरायास ताकीद करून कन्यासमेत भार बारदारी वस्तभाव देखील निरोप देऊन शहरास मुखरूप पोहोंचवणें. स्वामीच्या स्नेहास अंतर होई ऐशी गोष्ट न करणें; यांउपरी घडीचा विलंब न लावितां निरोप देवणें. त्याची वस्तभाव पावलियाची रसीद घेऊन हुजूर पाठविणें. या कामास कमाजी भाकरे व जिवनराव कदम दिंमत हुद्दे पाठविले यासी दर असामीस रुपये २०० एकूण चारशें रुपये देणें ह्मणून पत्रें हातरोखे येणेंप्रमाणें पत्र:—

१ उमाबाई दाभाडी याजकडे रुपये १०० एकशें पत्र, १ राजश्री बाबुराव सेनाखासखेल यांजकडे रुपये ३०० तीनशें एकूण पत्रें २.

---

# राजकीय (व) इतर माहिती.

## पोर्तुगीज.

[ १९० ] गोवेकर विजरे यांचा व स्वामीचा स्नेह जाहला आहे, ऐशीयास याच्या प्रांतें धामधूम न करणें ह्मणोन पत्र:—१ रामचंद्र महादेव यासी पत्र जे, वसई वळणें वगैरे बंदरीं धामधूम न करणें, १ पिलाजी गायकवाड. एकूण २.

इ. स. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
रबिलावल ४.

[ १९१ ] गोवेकर विजरे यांचा व स्वामींचा स्नेह जाला आहे. त्याणीं दारूगोळा व शिसें रवाना केलें आहे. हद्दी हद्दीतून पोहोंचवून देणें ह्मणून दस्तक १.

इ. स. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
रबिलावल ६.

---

wrote to the Raja on the subject. Umabai Dabhade was therefore requested to direct Baburao to set the lady at liberty, to safely escort her to Aurungabad with her property, and to be careful to do nothing which would alienate the feelings of the Nabob who was on friendly terms with the Raja. Baburao was also addressed to the same effect.

(190) Government had entered into friendly relations with the Viceroy of Goa. Ramchandra Mahadeo and Pilaji Gaikwad were directed not to attack their territory.

A. D. 1727-28.

(191) The Viceroy at Goa, who was on friendly terms with Government supplied gun-powder and lead. A permit was given for their import into the country.

A. D. 1727-28.

[ १९२ ] राजश्री सेखोजी आंग्रे सरखेल यांस पत्र जे, जुवाकद्दिन फिरंगी तुह्मांजवळ होता तो हुजूर आला, त्यास स्वामींनीं चाकर ठेविला आहे. ऐशी-यास त्याची बाईल तिचें नांव मेरी, नुवादिन गोलंदाज याची लेकी कुलाबियास आहे तिजला पाठवून देणें ह्मणून, येविशीं पत्र १.

इ. स. १७३१–३२.
इसन्ने सलासीन मया व अलफ.
जिलकाद २८.

[ १९३ ] रो फोंड सांवत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ यास पत्र जे, फिरंगी गोवेकर शामलाचा पक्ष धरून त्याचें साहित्य करितो. तुह्मांसीं हर्षामर्ष वाढविला आहे ह्मणून विदित झालें. तरी शामलास नस्तनाबूद करणें स्वामीस जरूर आहे असें असतां शामलाचें साहित्य करतील त्याचें पारपत्य केलेंच पाहिजे. येविशींचा कित्येक अर्थ सांगोन राजश्री रामकृष्ण चिमणाजी पाठविले आहेत हे तुह्मांस सांगतील तो अर्थ मनास आणून विचार करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३४–३५.
खमस सलासीन मया व अलफ.
जमादिलाखर १७.

[ १९४ ] कित्ता एक पत्र चिटणिशी बनाम जयराम सांवत व रामचंद्र सांवत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ यास आज्ञा कीं, फिरंगियाकडील मातबर मनुष्य हुजूर आणविले आहेत. त्यास आणावयास हुजुरून स्वार व प्यादे पाठविले असत. तरी तुह्मीं फिरंगियाकडील भले माणूस येतील त्यांसमागमें आपणांकडील जमाव देऊन घाटमाथां पोहोंचवून देणें. ते येथें आल्यानंतर अर्थांतर मनास आणून विचारणा कर्तव्य ती केली जाईल ह्मणून पत्र १.

इ. स. १७३८–३९.
तिसा सलासीन मया व अलफ.
जिल्हेज १२.

---

(192) A Portuguese who was serving under Shekhoji Angria came to Huzur and was employed by the Raja. Shekoji was directed to send the man's wife named Mary who was at Kulaba.

A. D. 1731-32.

(193) Government was informed that the Portuguese of Goa was assisting the Sidhi and acting in opposition to Fond Sawant. Ramkrishna Chimnaji was therefore sent to the Sawant with instructions for punishing the Portuguese for assisting the Shamal.

A. D. 1734-35.

(194) An influential Portuguese was coming into the Maratha territory. Jayaram Sawant and Ramchandra Sawant Bhosle Sir Dessai of Kudal were directed to escort him to the top of the Ghauts.

A. D. 1738-39.

गिराव हाक्षिण मेर्डीम ६-२००

# राजकीय (व) इतर माहिती.

## लहान लहान संस्थानें.

[ १९५ ] राजश्री बाजीराव प्रधान यास पत्र जे, तुह्मीं लांबकानीचा कोट घेतला ते समयीं सुजानसिंग राऊळ यास धरून आणिला. त्याची वस्तभाव लुटली ह्मणून विदित झालें. ऐशीयास राऊळमजकूर स्वामीच्या पायाशीं निष्ठेनें वर्तो अशी उमेद धरितात याकरितां सुजानसिंग यास सोडून देणें. वस्तभाव घेतली असेल फिरोन देणें:—

इ. स. १७२३–२४.
अर्बा अशरीन मया व अलफ.
साबान ३.

१ सुजानसिंग राऊळ यास पत्र जे, तुह्मीं लिहिलें राजश्री बाजीराव प्रधान याणीं आपणास धरून आणिलें, वस्तभाव लुटोन नेली ह्मणून लिहिलें त्यावरून प्रधान पंतास आज्ञा केली असे. तुह्मांस सोडून देतील. वस्तभाव नेली असेल ते देतील. तुह्मीं स्वामीकार्यास अंतर केला नाहीं. स्वामीस तुमचें अगत्य आहे तुह्मीं हुजूर भेटीस येणें. स्वामी तुमचें उर्जीत करतील.

[ १९६ ] निराणिशी पत्रें फाल्गुन शुद्ध प्रतिपदा इंदुवासर राजश्री बाजीराव पंडित प्रधान व श्रीनिवास पंडित प्रतिनिधि यास जे, सोंधेकरांनीं राजश्री बसवंतराव याकडे कागदपत्र माणसें पाठविलीं. आपला अर्थ लिहून व सांगोन पाठविला तो त्यांनीं सविस्तर निवेदन केला. ऐशास सोंधेकर पुरातन संस्थानिक होते त्यावरी चोहोंकडून मसाला झाला. यामुळें त्याचा अर्थ कांहीं राहिला नाहीं. श्रमी आहेत आणि स्वामीचे ठायीं अकृत्रिम हेत धरितात, त्यांचें चालवणें स्वामीस आवश्यक. या निमित्य त्याचे बोलीचालीविषयीं हुजुरून राजश्री गोपाळराम तुह्मांकडे पाठविले आहेत. त्यांचे तर्फेनें तुह्मांशीं बोली करील तदनुरूप करून निर्वाह जीवन-

इ. स. १७२५–२६.
सित अशरीन मया व अलफ.
जमादिलाखर २९.
21·2·1726

---

(195) Bajirao, when he took the fort of Lambkani, made Sujansing prisoner and deprived him of his property. Sujansing applied to the Raja expressing his desire to remain loyal to Government. Bajirao was therefore ordered to set him free. Sujansing was called to the Huzur.

A. D. 1723-24

(196) Bajirao Pandit Pradhan and Shrinivas Pandit Pratinidhi were informed that the Raja of Sodhe had sent an ambassador to explain his condition, that he (the Raja) was in embarassed circumstances that he was an old Sansthanik loyal to Government and that therefore his Sansthan should be saved and a moderate tribute levied.

A. D. 1725-26.

माफक खंडणीचा भाग वारून घेऊन संस्थानरक्षण होय ते गोष्ट करणें. वरकड कित्येक आज्ञा स्वमुखें गोपाळराम यास केली आहे सांगतां कळों येईल पत्रें:—१ राजश्री प्रतिनिधि, १ राजश्री प्रधान. एकूण २.

इ. स. १७२७–२८. समान अशरीन मया व अलफ. साबान १४.

[ १९७ ] चिटणिशी कागद चैत्र बहुल प्रतिपदा. कानोजी आंग्रे यास पत्र जे, ताजदीअल्लीखान याची व स्वामीची एखलासी पूर्वीपासून आहे. तुह्मीं हरएकविशीं गौर करणें ह्मणून पत्र.

इ. स. १७२९–३०. सलासीन मया व अलफ. रमजान १०. 11-3-1730

[ १९८ ] कित्ता चिटणिशी पत्रें राजश्री राजाधिराज सवाई जयसिंग उज्जनी प्रांतें आले ह्मणून राजश्री दादोराव भीमसेन यांणीं हुजूर लिहिलें, ऐसीयास स्वामीचा व त्याचा स्नेह घरोबा पूर्वीपासून चालत आला आहे. त्याचें मनोधारण रक्षण स्वामीस अगत्य, याकरितां त्यानें मनोधारणार्थ राव मशारनिल्हे तुह्मांस लिहितील त्याप्रमाणें वर्तणूक करून उभयपक्षीं स्नेहाभिवृद्धि होय तो अर्थ करणें. मांडोगडचा अर्थ लिहितील. तरी अनमान न करितां मांडोगड त्याचे स्वाधीन करणें. ह्मणून पत्रें:—

१ राजश्री चिमणाजी बल्लाळ, १ उदाजी पवार, १ मल्हारजी होळकर, एकूण ३.

इ. स. १७३१-३२. इसने सलासीन मया व अलफ. रजब २५.

[ १९९ ] चिरंजीव राजश्री संभाजी राजे यास पत्र जे, संस्थान सोंधे येथून रामचंद्र नाईक रुसवा करून निघोन सावनूरकराकडे गेले आहेत. तेथून संस्थानास उपद्रव करावा या मतलबावरी आहेत व तुह्मांकडे अनुसंधान लाविलें आहे. ह्मणून कळों आलें. ऐशास संस्थानचें

---

(197) Kanoji Angria was informed that the Raja was on friendly terms with Tajdi Alikhan, and was directed to treat him with respect.

A. D. 1727-28.

(198) Dadorao Bhimsen wrote to the Raja that Rajadhiraj Sawai Jayasing had come to the province of Ujen. The Raja communicated the news to Chimnaji Ballal, Udaji Powar and Malharji Holkar and directed them that in consideration of the old friendship existing with Jayasing every attention should be shown to him, and that in case he demanded the surrender of Mandogad, it should be made over to him without hesitation.

A. D. 1729-30.

(199) The Raja learnt that Ramchandra Naik being dissatisfied with the Sansthan of Sodhe had gone to Sawnur, and that he intended with the assistance of Sambhaji Raje to molest the Sansthan; Sambhaji Raje was requested to give no assistance to Ramchandra Naik.

A. D. 1731-32.

संरक्षण होऊन उपद्रव लागों न यावा हें उभयपक्षीं अगत्य आहे. तरी रामचंद्र यासकडून अनुमोदन सहसा न देणें. संस्थामिकाचें संस्थानिकाकडे नातें तें करणें ह्मणून पत्र १.

[ २०० ] कित्ता चिरंजीवास पत्र जे, राजश्री बाजीराव पंडित प्रधान प्रभव संवत्सरीं दक्षणप्रांतें गेले. तेममयीं संस्थान सोधे यावरी कसाला पडला हें तुह्मीं जाणतच अहां, आह्मांकडे संस्थानिकाकडून आया हुजूर येऊन संस्थानाचा नातवानीचा प्रसंग निवेदन केला. त्यास संस्थानचा उपद्रव करोन संरक्षण व्हावें या अर्थे दरसाल पांच हजार होन संस्थानाकडे करार केले. त्यास तुमची आमची भेटी झालियावरी संस्थान तुह्मांकडे दिलें. त्यास संस्थानाची नातवानी जाणोन आह्मीं आपणाकडील नियत केला होता तो त्यास माफ केला असे. तरी तुह्मीं त्यास कष्ट न लावणें. त्याचें सर्व प्रकारें चालवणें ह्मणून पत्र २.

इ. स. १७३१-३२.
इसने सलासीन मया व अलफ.
रजब २५.

[ २०१ ] राजश्री दुर्जनसिंग यास पत्र जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत झाला. आपली स्थापना आपल्या स्थळासी करावी येविशीं तपशील लिहिले. ऐशीयास राजश्री प्रधानपंत हुजूरदर्शनास येतील त्यासमागमें दर्शनास येणें. तुमच्या चित्तानुरूप होणें तें होईल. राजश्री नारो विठ्ठल व कृष्णाजी पवार व उदाजी पवार त्या प्रांतास रवाना केले आहेत त्यास तुह्मांविशीं सांगणें तें सांगोन साहित्य करविलें जाईल ह्मणून पत्र १.

इ. स. १७३३-३४.
अर्बा सलासीन मया व अलफ.
जमादिलावल ९.

[ २०२ ] राणा अनुपसिंग व कुवर पहाडसिंग यांच्या मुलखांत तुह्मीं धामधूम करितां, बडवणी प्रांत बेचिराख केला ह्मणून विदित झालें. तरी बडवणी प्रांतांत तुह्मांस उपसर्ग करावयास गरज काय? याउपर ऐसें न

इ. स. १७३५-३६.
सित सलासीन मया व अलफ.
राबिलाखर ४.

(200) The Sansthan of Sodhe was attacked by Bajirao Pradhan in his campaign in the South. The Sansthanik having thrown himself on the mercy of the Raja, the Sansthan was continued to him on condition of his paying a tribute of 5,000 Hons every year. At the interview of the Raja with Sambhaji Raje, the Sansthan was made over to the latter. He was now informed that the tribute fixed was remitted and that no demand should be made on that account.

A. D 1731-32.

(201) Durjansing was informed, in reply to his letter asking for re-instatement in his kingdom, that he should come to the Huzur along with Bajirao Peshwa, when the latter returns from his campaign and that his prayer would then be granted.

A. D. 1733-34.

(202) Government was informed that Udaji Powar, Raghoji Kadamrao, Sawai Katsing Kadamrao and Malharji Holkar had attacked the province of Badwani and had com-

A. D. 1735-36.

करणें. मशारनिल्हे स्वामीचे स्थापित आहेत, त्यांचें चालवणें स्वामीस अगत्य आहे. हें जाणोन याच्या मुलखांत एक जरा तोशीस न देणें ह्मणून पत्रें:—

१ उदाजी पवार, १ रघुजी कदमराव व सवाई कटसिंग कदमराव, १ मल्हारजी होळकर, एकूण ३.

[२०३] कित्तापत्र बनाम राजश्री उदाजी पवार यास आज्ञा केली ऐसी जे, राणा मोहनसिंग याचे पुत्र अनुपसिंग व पहाडसिंग यांच्या प्रांतांत तुह्मीं उपसर्ग करितां. मुलुख खराब होतो ह्मणून हुजूर विदित झालें; ऐशास पूर्वीपासून ते स्वामीशीं निष्ठेनें वर्तत आले आहेत. त्यांचें चालवणें स्वामीस आवश्यक, असें असतां त्याच्या प्रांतांत धामधूम करून खराबी करावी हे गोष्टी उत्तम नाहीं. याउपरी त्याच्या मुलखास कोणेविशीं जास्ती उपद्रव न लावणें. सर्वप्रकारें साहित्य करून चालवावयास अंतर न करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३६–३७.
सबा सलासीन मया व अलफ.
साबान ६.

[२०४] कित्तापत्रें चिटणिशी राजश्री जगदेराय राजे श्रीरंगपट्टण यांचे मामा राजश्री वीरराज हे श्री काशीयात्रेस जात आहेत. स्वार प्यादे समेत भार बारदारी जातील. तरी तुह्मीं आपलाले हद्दींतून बेदरका देऊन निरुपद्रव पोहोंचवून देणें. हे स्वामीशीं बहुत स्नेह वरितात. स्वामीसही त्यांसी स्नेह चालवणें आवश्यक आहे. याकरितां राजश्री वीरराज येतील त्यांची गौरशीव पोहोंचवून द्यावयास अंतर न करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३७–३८.
समान सलासीन मया व अलफ.
रजब ८.

१ राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार, १ राजश्री राणोजी शिंदे, १ राजश्री मल्हारजी होळकर. एकूण ३.

---

pletely devastated it. They were told that Rana Anupsing and Kuwar Pahadsing were the nominees of Government, and that they had therefore no reason to disturb their territory.

(203) Udaji Powar was directed to desist from molesting the country of Anupsing and Pahadsing, sons of Rana Mohansing as they were behaving loyally towards Government.

A. D. 1736-37.

(204) Virraj, maternal uncle of Jagaderaya, Raja of Shrirangpattam being about to proceed to Benares, Hindurao Ghorpade Mamalkat-Madar, Ranoji Shinde, and Malharji Holkar were directed to safely escort him through their provinces, as Jogaderaya was on friendly terms with Government.

A. D. 1737-38.

[ २०५ ] किता एक पत्र बनाम राजश्री खानगौडा बहादर देसाई परगणे लक्ष्मेश्वर

इ. स. १७३८–३९.
तिसा सलासीन मया व अलफ.
जिल्काद २४.

यास आज्ञा कीं, तुह्मीं पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय अक्षरशः अवगत झाला. सावनूरकर नबाब यास सख्यप्रसंगनिमित्य प्रयत्न कर्तव्य तो केला, तथापि विवेकावरी न येतां सावनुरीहून कूच करून लक्ष्मेश्वरास आले. कोटास वेढा घालून हस्तगत केलें. पुढें स्थळ घ्यावी, संस्थान उच्छेद करावा, हे वासना धरून निकर्श मांडिला आहे. त्यास आपण पूर्वीपासून महाराजाचे स्थापित असों असा अभिमान धरून संस्थानाचें संरक्षण होऊन संकट निवारण करावें ह्मणून लिहिलें व रायाजी दिवाकर हे व निंब पाटील याणीं मुखता सविस्तर अर्थ विदित केला, व राजश्री नारोराम मंत्री याणींही विनंति केली. ऐसीयास तुह्मीं पुरातन निश्चययुक्त वर्तत आलां आहां. तें स्थळ स्वामींचें असें पूर्ण चितांत कल्पून पहिलेंही स्थापनायुक्त साहित्यास अंतर झालें नाहीं. पुढें ही अभिमानपूर्वक तुमचें संकट निवारण करून देश स्वस्थ राहवा व तुमच्या हातें कित्येक कार्यप्रयोजनें संपादून घ्यावीं हेंच आवश्यक आहे. सांप्रत राजश्री एसाजी भोसले व घनःशाम नरहर यास फौजेनिशीं रवाना केलें आहे. जे आज्ञा कर्तव्य ते त्यास केली आहे. जेणेंकरून तुमचे स्थळाचें संरक्षण होऊन संकट निवारण होय तोच अर्थ करतील. वरकड राजश्री नारोराम मंत्री लिहितील व रायाजी दिवाकर मुखवाचेनें सांगतील, त्यावरून कळेल ह्मणून पत्र. तुह्मीं वस्त्रें पाठविलीं ते पावलीं. येथून तुह्मांस वस्त्रें पाठविलीं असत ते घेणें ह्मणून जाब.

[ २०६ ] राजश्री बिजेसिंग राजे मारवाड यासी राजश्री रामसिंग राजे याणीं द्वेष भाऊ-

इ. स. १७५२–५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर १.

बंदगीच्या येणेंकरून राज्यास अपाय आरंभिला आहे. याजकरितां साहित्यपत्रें जेः—बिजेसिंग याचा पुरातन या राज्याशीं स्नेहभाव चालत आला आहे त्यास रामसिंग मांडलिक संस्थानिक याणीं साहित्य करून मशारनिल्हेस अपाय योजिला. यासी तुह्मीं मांडलिकास सांगोन रामसिंगाचें साहित्य न होय तें करणें ह्मणून पत्रें दिलीं:—

१ राजश्री मल्हारजी होळकर, १ जयाजी शिंदे, एकूण २.

---

(205) Khan Ganda Bahadur Desai informed the Raja that notwithstanding his efforts to make peace with the Nabob of Sawnur, the latter attacked Laxmeshwar, took the fort, and was now endeavouring to reduce the town. The Desa prayed that in consideration of his loyalty assistance might be sent to him. Esaji Bhosle and Ghansham Narhar were therefore sent with armies to assist him.

A. D. 1738-39.

(206) Bijesing, Raja of Marwar was an old ally of Government. His feudatary Rāmsing Raja was plotting against him through enmity. Malharji Holkar and Jayaji

A. D. 1752-53.

# राजकीय (क) देशांतील बंडें.

[ २०७ ] कित्ता सनदा सरदारानी वगैरे यासी जे, शहाजी व व्यंकोजी निंबाळकर व सोमाजी जगताप व माने एकत्र होऊन जमाव केला आहे. वाई-देशीं येऊन धामधूम करणार त्यास नतीजा राखावा लागतो. तरी तुम्हीं जमावानिशीं येणें. या कामास जासूद यासी मसाले देविले:—

इ. स. १७१३–१४.
अर्बा अशर मया व अलफ.
जिल्हेज २८.

मोरो शामराज यांजकडे जासूद जथे शहाजी जगताप यासी मसाला रुपये ( राणोजी साळोखी शंकराजी राजे महाडीक याकडे सुभानजी पवार जथे संभाजी काळे यासी मसाला रुपये २, ) भिकाजी कोकरे जासूद जथे सभाजी काळे ( २॥ गोंदजी काळा, २॥ नरसोजी चव्हाण, ) एकूण ९.

महादजी बाबर देशमुख तर्फ नाणेंघोल यांकडे जासूद जथे संभाजी काळे:—१ बहिरजी जमदळा, १ निंबाजी काळा, एकूण २. माणको त्रिमल व चिमणाजी माणकेश्वर व त्रिंबकराव धायगुडे यांकडे जासूद जथे शहाजी जगताप. रुपये २॥ मकाजी कदम व २॥ शिवोजी पवार, एकूण ९.

[ २०८ ] राजश्री जानोजी नाईक निंबाळकर यास पत्र जे, तुम्हीं रंभाजी निंबाळकराचा पुत्र सुलतानजी निंबाळकर यास सामील करून घेऊन कर्यात अकलुज, दहिगांव या प्रांतांत स्वारी करून मुलूख मारून सत्यनाश केला. किल्ले महिमानगडचे तनखाचे गांव माळशिरस व

इ. स. १७१५–१६.
सित अशरीन मया व अलफ.
रजब १२.

---

Scindia were directed to remonstrate with Ramsing, and to assist Bijesing as far as possible.

(207) Shahaji Nimbalkar, Somaji Jagtap and Mane had joined together and were about to attack the province of Wai. Moro Shamraj, Mahadaji Babar Deshmukh Shankraji Raje Mahadik, Manko Trimal, Chimnaji Mankeshwar and Trimbakrao Dhayagude were therefore called to the Huzur with their armies.

A. D. 1713-14.

(208) Janoji Naik Nimbalkar, with the assistance of Sultanji, son of Rambhaji Nimbalkar, attacked the Karyat of Akluj and laid the country waste He burnt the villages of Malshirus and Medhad, and carried off cattle and women. He was reprimanded for his conduct and was directed to restore the cattle to their respective villages.

A. D. 1715-16.

मेढद दोन्ही गांव जाळून गुरें ढोरें नेलीं. बायका आणखी बंद—धरून नेला ह्मणून विदित झालें. ऐशास गांवाचा सत्यनाश करावा, बंद धरून नेऊन नानाप्रकारचा उत्पात करावा हे गोष्ट कांहीं बरी नव्हे. भावाबंदाचा कजिया असला तर त्यासीच समजोन द्यावा. मुलखाशीं तालुका काय आहे? हल्लीं हें पत्र सादर केलें असे. मुलखांत धामधूम न करणें. माळशिरस व मेढद येथील मालमत्तेसी गुरें ढोरें नेला असेल तो फिरोन देणें. जरी देहाय मजकूरचे नागावा देत नाहीं तरी किल्ले मजकूरचे लोक मुबदला करतील ऐसें जाणून वर्तणूक करणें. पत्र १.

[ २०९ ] कित्ता पत्रें चिटणिशी—राजश्री मोरो जिवाजी यांस जे, चव्हाण दोन्ही हजार स्वारानिशीं तासगांवावरी आला आहे ह्मणून हुजूर वर्तमान आलें. त्यावरून रायाजी जाधव वगैरे जमाव तुह्मांकडे पाठविला असे. तुह्मीं बहुत खबरदार राहणें. गनिमाची बातमी राखोन रोज बरचेवरी वर्तमान हुजूर लिहून पाठवावें.

इ. स. १७२६--२७.
सबा अशरीन मया व अलफ.
जिल्हेज १७.

रायाजी जाधवराव यास पत्र—चव्हाण दोन्ही हजार स्वारांनिशीं तासगांवावरी आला ह्मणून वर्तमान हुजूर आलें तरी तुह्मीं आपला कुलिजमाव मानाजी जाधव याजबरोबर देऊन राजश्री मोरो जिवाजी यांकडे पाठविणें.

इ. स. १७२७--२८.
समान अशरीन मया व अलफ.
रजब २.

[ २१० ] चिटणिशी—नागोजी झुंझारराव घाटगे यासी पत्र, शिरवळांत तमाम गांवगन्ना उपद्रव केला. पैसे काढितां ह्मणून विदित झालें तरी स्वदेशांत ऐशी धामधूम करावी हें उचित नाहीं. याउपरी गांवगन्ना उपद्रव न करणें. पैसे न काढणें. पत्र १.

इ स. १७२७–२८.
समान अशरीन मया व अलफ.
रजब ५.

[ २११ ] शिधोजी थोरात यास पत्र, वडोली भिकेश्वर येथील गुरें तुह्मीं वळून नेलीं आहेत ते सोडून देणें. पत्र १.

---

(209) News reached the Raja that Chavan had proceeded against Tasgaon with 2,000 men. Moro Jiwaji was directed to be on his guard and to send frequent intelligence regarding the enemy to the Raja. Rayaji Jadhavrao's army was sent to his assistance.

A. D. 1726-27.

(210) Nagoji Zunjarrao Ghatge, pillaged the country about Sirval and removed grain from grain pits. He was rebuked for his conduct and was directed not to molest the country in future.

A. D. 1727-28.

(211) Sidhoji Thorat forcibly removed the cattle of the village of Vadoli Bhikeshwar. He was directed to restore them.

A. D. 1727-28.

इ. स. १७२७–२८.
सबान अशरीन मया व अलफ.
साबान ७.
Jan. 1728

[२१२] शिदोजी थोरात याचा जाब, उदाजी चव्हाणाची बातमी राखोन वळवळ करील तर नतीजा देणें. चंद्रसेन शिदोजी घोरपडे यांचें वर्तमान लिहिलें विदित झालें.

[२१३] चिटणिशी पत्रें—उदाजी चव्हाण हिंमत बहादर यासी पत्र जे, तुह्मीं विनंतीपत्रें दोन पाठविलीं तीं प्रविष्ट झालीं. लिंगोजी जाधव यानीं स्वामी संनिध विनंति केली ते सेवकानींच केली. त्या बोलीप्रमाणें वर्तावयास अंतर न पडे ह्मणून लिहिलें. त्यावरून स्वामी संतोष पावले. तुह्मीं एकवचनी आहां. तुह्मांपासोन बोलिले वचनास वर्तावयास अंतर न पडे हा निशा आहे. इकडील श्रीचा बेलभंडार पाठविला तो पावला. प्रस्तुत सेनेसह वर्तमान (जागा कोरी आहे.) पाठविले आहेत तुह्मीं यांची भेटी घेणें. तुह्मांपाशीं बोलतील ते स्वामींचीं वचनें आहेत. तुह्मांस वस्त्रें (जागा कोरी आहे.) पाठविलीं आहेत, तीं घेणें ह्मणून पत्र १, लिंगोजी जाधव यास जाब १, एकूण २.

इ. स. १७२८–२९.
तिसा अशरीन मया व अलफ.
जमादिलाखर १६.

[२१४] माळवे प्रांतीं धामधूम करून खंडण्या करून पैका घेतला. ११२००० डोंगरपूर, ५०००० बासवाडा, ८०००० झांबवा, खंडणी केली. कांहीं पैका घेतला आणि दोनशें अडीचशें घोडे नेले. एकूण २४२०००. याखेरीज दाहोद, औकदसूत, खंडाळे, बोरी या महालांत जेथें पैका निघाला तेथें घेतला. लोक धास्तीनें पळाले. तेथील घरें जाळून भिंताडेंदेखील पाडून टाकिलीं. व मांडवगड तलाटी वाटेनें जातां अगदीं लुटिलीं यामुळें तलाटी ओस जहाली ह्मणोन विदित झालें. तर तुह्मांस माळवे प्रांतीं धामधूम करून पैका घ्यावयास मुलुख खराब करावयास गरज काय? याउपर सदरहु पैका तुह्मीं घेतला आहे तो व आणखी जेथें

इ. स. १७२८–२९.
तिसा अशरीन मया व अलफ.
जिल्काद २.
31-5-1728

---

(212) Sidhoji Thorat was directed to watch the movements of Udaji Chavan and to attack him if he showed any sign of restlessness. Sidhoji was told that the information sent by him about Chandrasen, Sidhoji Ghorpade was received.

A. D. 1727-28.

(213) Udaji Chavan wrote that he would abide by the promises made on his behalf by Lingoji Jadhav. He was informed that the Raja had confidence in his word, and that he should see a person (not named) who would communicate the Raja's wishes to him. A dress of honour was sent to Udaji.

A. D. 1728-29.

(214) Raghoji Kadamrao and Sawai Katsing Kadamrao were informed that news had reached Government that they had attacked the province of Malwa and levied the following contributions.—

A. D. 1728-29.

जो पैका घेतला असेल तो राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांकडे फिरावून देणें. नाहींतर तुमच्या महालीं मुबदला करतील. याउपर माळवे प्रांतीं उपसर्ग न देणें. फिरोन बोभाट येऊं न देणें, म्हणून रघुजी कदमराव व सवाई कटासिंग कदमराव यासी पत्र १, सदरहूविशीं खंडेराव दाभाडे सेनापति यास १, एकूण २.

[२१५] राजश्री दावलजीराव सोमवंशी सरलष्कर व शिधोजी थोरात व राणोजी घोरपडे यांच्या परस्पर भेटी जाहल्या. तर तुम्हीं व ते एका विचारें राहोन उदाजी चव्हाणास नतीजा देणें. त्या प्रांतींची ठाणीं-ठुणीं हस्तगत करून संतोषाचें वर्तमान लिहिणें म्हणून पत्रें :—

इ. स. १७२९–३०.
सलासीन मया व अलफ.
जमादिलाखर ४.

१ दावलजीराव सोमवंशी सरलष्कर, १ जाब दावलजीराव सोमवंशी सरलष्कर, १ जाब शिंदोजी थोरात, १ भिवराव गोविंद, १ राणोजी घोरपडे यास, एकूण ५.

[२१६] कित्तापत्रें तुम्हीं स्वामीच्या पायाशीं निष्ठा धरून सेवा करून दाखवावी याची उमेद धरिली आहे. ऐशास हुजुरून राजश्री दावलजीराव सोमवंशी सरलष्कर फौजेनिशीं पाठविले असत. त्यांच्या व राजश्री राणोजी घोरपडे शिधोजी थोरात यांच्या तुमच्या भेटी झाल्या असतील. याउपर उदाजी चव्हाणास नतीजा देऊन त्यांनीं ठाणीं हस्तगत करून फत्तेचें वर्तमान लेहून पाठविणें. तुमचें ऊर्जित होईल जाणिजे :—

इ. स. १७२९–३०.
सलासीन मया व अलफ.
जमादिलाखर ४.

१ रघुनाथ देसाई परगणे हुकेरी, १ लखम गौडा देसाई परगणे हुकेरी, १ शिवलिंगापा देसाई परगणे गोकाक, १ मुरार रघुनाथ देसाई परगणे अडगल, १ आपाजी शितोळे,

---

Dongarpur Rs. 1,13,000. Baswada Rs. 50,000. Zambva Rs. 80,000. Total Rs. 2,43,000 ; that they had extorted money from other places in the province, that they had burnt and demolished houses, and that the inhabitants had consequently left the country. They were rebuked for thus trespassing on the province of Bajirao Pandit and were directed to restore to him all the money they had collected. They were further directed to abstain from plundering the country in future and were told that Bajirao would otherwise retaliate by plundering their territory.

A letter on the same subject was addressed to the Senapati.

(215) Dawalji Somawanshi Sir Laskar, Sidhoji Thorat, and Ranoji Ghorpade, met each other. They were directed to act in concert and put down Udaji Chavan.

A. D. 1729-30.

(216) Raghunath Desai of Hukeri, Lakhamgowda Desai of Hukeri, Sivalingappa Desai of Gokak &c. were directed to assist the above Sirdars.

A. D. 1729-30.

१ मुरारजी शिंदे याजकडील संताजी जाधव, १ त्रिंबकजी घोरपडे, १ शिवाजी घोरपडे, १ मागोजी सावत, १ हुसेनखान यास पत्र, एकूण १०.

[ २१७ ] शिधोजी थोरात यासी पत्र जे, मुलुखामध्यें चौथाईचे रोखे केले. तर सनद नसतां करावयास गरज काय? पंचगंगेपलीकडे रोखे करणें. अलीकडे एकंदर रोखा न करणें. मसाला रवाना जासूद जथे गोदजी नाईक रुपये २०.

इ. स. १७२९--३०.
सलासीन मया व अलफ.
जमादिलाखर १७.

[ २१८ ] राजश्री बाजीराव पंडित प्रधान यास आज्ञा जे, राजश्री सवाई कटसिंग याणीं फौज जमा करून खानदेशांत रोखेपत्र करून धामधूम मांडिली आहे. तुमची फौज पुढें गेली तरी खटपट करावी या विचारांत आहेत. हें वर्तमान राजश्री अमृतराव त्रिंबक याणीं विदित केलें, त्यावरून राजश्री त्रिंबकराव दाभाडे सेनापति यास व कदमरायास लिहिलें आहे. ऐशास तुह्मीं करणें तें विचारानुरूप करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३०--३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
जमादिलावल १४.

[ २१९ ] राजश्री फोंड सांवत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ वगैरे यांस पत्र जे, राजश्री सेखोजी आंग्रे सरखेल यासी तुह्मीं हर्षामर्ष वाढविला आहे; मुलखास उपसर्ग देतां ह्मणून हुजूर विदित झालें. ऐशास मशार-निल्हेशीं हर्षामर्ष न वाढवणें ह्मणून पूर्वी वरचेवरी तुह्मांस आज्ञापत्रें सादर झालींच आहेत परंतु तो अर्थ तुह्मीं करीन नाहीं, हे गोष्टी उत्तम नाहीं. याउपर हर्षामर्ष न वाढवणें व मुलखास उपद्रव न देणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३१--३२.
इसने सलासीन मया व अलफ.
जमादिलावल १३.

(217) Sidhoji Thorat was directed to abstain from levying Chowthai from Government territory. He was told to make demands on the province beyond the Punch Gunga.

A. D. 1729-30.

(218) Sawai Katsing had collected an army and was creating a disturbance in Khandesh. Amrutrao Trimbak wrote to say that Sawai intended to resist the Peshwa's army if it was sent against him. Bajirao was directed to take action after full consideration and was informed that the Senapati and Kadamrao were addressed on the subject.

A. D. 1730-31

(219) An ill-feeling had arisen between Fod Sawant Bhosle Sir Desai of Prant Kudal, and Sekhoji Angria. The former attacked the territory of the latter. He was rebuked for his conduct and was directed to desist from molesting Angria's territory.

A. D. 1731-32.

[ २२० ] दक्षण प्रांतींच्या बंदोबस्तानिमित्य राजश्री उदाजी चव्हाण हिंमत बहादर ममलकतमदार यास तुंगभद्रेपलीकडे रवाना केले असेत. हे सनदेप्रमाणें अंमल करतील. तुह्मीं आपणाकडील कमावीसदारास ताकीद करून याचा अंमल सुरळीत चालेल ते गोष्टी करणें. कोणेविशीं खलेल होऊं न देणें ह्मणून चिटणीशी पत्रें:—

इ. स. १७३२-३३.
सलास सलासीन मया व अलफ
रबिलावल ३.

१ हिंदुराव घोरपडे, १ सगुणाबाई निंबाळकर, एकूण २.

[ २२१ ] राजश्री फोंड सांवत भोसले सरदेसाई परगणे कुडाळ यांस पत्र जे, त्रिंबक भास्कर कारकून दिंमत राजश्री पंत प्रतिनिधि याची भावजई मौजे मुणगे तर्फ साळशी येथें आपले माहेरीं अंताजीराम याचे घरीं होती. त्यास तुह्मांकडील रायाजी साटक याणें गांवावरी स्वारी करून अंताजीराम यास कुटुंबासहित धरून नेला. त्यास वरकड अगदीं माणसें सोडून दिलीं, आणि त्रिंबक भास्कर हुजूर राहतो ह्मणून याची भावजई अटकावून ठेविली आहे, ह्मणून विदित झालें. तरी प्रतिनिधीकडील कारकून, त्याहीमध्यें नव दहा वर्षांची ब्राह्मणाची मूल एकटीच अटकेंत ठेवावी हा कोण विचार आहे? यवनादिकही ऐसें कर्म करणार नाहींत. याउपर साटकास हरवजेनें नसीयत करून ब्राह्मणाची मुली सोडून देवणें. येविशीं अंतर सहसा न करणें ह्मणून चिटणिशी पत्र १.

इ. स. १७३४--३५.
खमस सलासीन मया व अलफ.
मोहोरम १.

[ २२२ ] राजश्री रघुजी भोसले यांस खास दस्तकाचें पत्र जे, कसबे कुपटे परगणे गिरवली येथें राजश्री कानोजी भोसले याचा खासा कबिला व त्यांजकडील लोकांचे कबिले आहेत. त्या गांवास तुह्मीं मोर्चे लाविले आहेत, ह्मणून हुजूर विदित झालें. तर त्या गांवचे व याचे

इ. स. १७३४-३५.
खमस सलास मया व अलफ.
रजब ४.

---

(220) Udaji Chavan Himmat Bahadar Mamalkat Madar was sent to keep order in the South beyond the Tungabhadra.

A. D. 1732-33.

(221) Rayaji Satak in the service of Fod Sawant Bhosle Sir Desai of Prant Kudal attacked the village of Munge in Tarf Salasi and carried away as prisoners Antaji Ram and his family including Antaji's girl aged about 9 or 10 who was married to a brother of Trimbak Bhaskar, a karkun under the Pratinidhi. All the persons with the exception of the girl were subsequently set at liberty. Fod Sawant was reprimanded for allowing the Brahmin girl to remain in confinement; an act which was characterized as unworthy even of a Mahomedan and was directed to release her.

A. D. 1734-35

(222) Raghoji Bhosle laid a siege to Kasbe Kupte in Pargane Girvali where Kanoji Bhosle's family was living. Raghoji was directed to raise the siege.

A. D. 1734-35.

कबिल्याचे वाटे न जाणें ह्मणोन लिहोन लोक दिंमत हुद्दे पाठविले यांस रुपयेः—
१५० भिकनखान, १५० तुकोजी खळदकर, एकूण ३००.

[ २२३ ] सरदारांस पत्रें कीं, राजश्री कटसिंग कदमराव व दमाजी गायकवाड यांमध्यें कलह झाला. याकरितां तुमचे मनांत कांहीं विपर्यास आला असेल तरी हे गोष्टी उचित नाहीं. गायकवाडांनीं कथला केला, अनुचित केलें, येविशींची कितेक आज्ञा उमाबाई दाभाडे यास केली आहे. ती गायकवाडास ताकीद करतील. तुमचें समाधान करावयाचें तैसें करतील. याउपर दुसरा अर्थ मनांत न आणणें. गायकवाडाशीं एकंदर कथला न करणें ह्मणून पत्रें सादर केलीं खासदस्तखतांचीं:—

इ. स. १७३४-३५.
खमस सलासीन मया व अलफ.
साबान ४.

१ राजश्री रघुजी भोसले, १ कृष्णाजी पवार व विश्वासराव, १ उदाजी पवार, एकूण ३.
येणेंप्रमाणें पत्रें देऊन जासूद चाकर रवाना पाठविले. यास दर सरदाराकडून रुपये ५० पन्नास प्रमाणें देविले. जासूद असामी २ दर ५०=१०० जथे लतीफ नाईक (५० त्रिंबकजी मैराळ, ५० नारोजी कदम, ) ५० केशवजी वाळका निसबत सबनीस. एकूण १५०.

[ २२४ ] राजश्री संभाजी आंग्रे याचा जाब कीं, विनंतीपत्रें पाठविलीं प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाहला. कितेक आपले उभयतांचे निष्ठेचें लिहिलें तरी राजश्री कान्होजी आंग्रे यानीं स्वामीच्या पायाशीं निष्ठेनें सेवा करून दया संपादिली. तुह्मीही तैशीच दया संपादून घेऊन स्वामी तुमचें मनोदयानुरूप चालवतील. तुमचें सर्व प्रकारें स्वामीस अगत्य आहे. रत्नागिरीचा मजकूर लिहिला तरी राजश्री भगवंतराव पंडित अमात्य स्वामीचे पदरचे आहेत.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
सफर १६.

---

(223) A quarrel took place between Katsing Kadamrao and Damaji Gaikwad. It was anticipated that this would lead to an estrangement of feelings between the Gaikwad on one side and Raghoji Bhosle, Krishnaji Powar, Vishwasrao and Udaji Powar on the other. The latter were informed that the Gaikwad's conduct was improper and that orders had been issued to Umabai Dabhade to reprimand him. Raghoji Bhosle and others were requested to forget the matter and to continue to be on good terms with the Gaikwad.

A. D. 1734-35.

(224) Sambhaji Angria was requested not to quarrel about Ratnagiri with Bhagwantrao Pandit Amatya as he was also a servant of Government. Sambhaji was further informed that Fod Sawant had been instructed not to molest his ( Angria's ) territory.

A. D. 1740-41.

तुह्मीं त्या स्थळाशीं कलह करावा ऐसें नाहीं. त्याचा तुमचा तह पेशजीं आहे तेणेंप्रमाणें चालवणें. सावताचा मजकूर लिहिला तरी त्यास पत्र सादर केलें असे, व परभारेही आज्ञापत्र सादर केलें असे, ह्मणूनः—

१ जाव, १ सांवत यासी पत्रें त्याच्या मुलखांत धामधूम न करणें, एकूण २.

[ २२५ ] राजश्री तुळाजी आंग्रे सरखेल यास आज्ञा जे, तुह्मीं आपला कौल सावकारास समुद्रांत देतां आणि चालवीत नाहीं ऐसें जाणोन जंजिरे शिधेदुर्गकरी व तेथील आरमाराशीं कजिया लावितां ह्मणून हुजूर विदित झालें. अशास त्याचे सरदेंत त्याचा कौल व तुमचे सरदेंत तुमचा कौल व तुमचे कौलाचे तरांडे त्याचे सरदेंत आले, तरी याचा कौल घेऊन यासी रुजवातीनें वर्तावें. केवळ तुमच्याच कौलावरी याचे सरदेंतून तरांडीं जाऊं येऊं लागलीं ह्मणजे जंजिरियाचा अंमल कैसा चालेल हा विचार कांहींच ध्यानांत न आणितां कजिया करितां हे गोष्ट अपूर्व आहे. उचितार्थ वर्तत जाणें. याच्या कौलाखेरीज त्याच्या सरदेंतून जें तरांडें जाईल त्याचें पारपत्य हे करतील. तुह्मीं जंजिरेकराशीं व आरमाराशीं घसघस कराल तर न करणें. फिरोन बोभाट आलिया स्वामीस मान्य तर नाहीं ऐसें जाणून जंजिरे मजकुरास काडिमात्र उपसर्ग न लावणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७४४-४५.
खमस अर्बैन मया व अलफ.
सफर १२.

[ २२६ ] राजश्री उदाजी चव्हाण यास आज्ञा जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें राजश्री धर्मराव रामाजी याणीं कितेक अर्थ विदित केले. मिरजकर याणीं तुमच्या मुलखांत उपद्रव आरंभिला आहे तर त्यास आज्ञापत्र सादर केलें आहे. अतःपर तुमचे मुलखांत उपद्रव देणार नाहीं ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सफर २६.

---

(225) Government was informed that Tulaji Angria Sarkhel gave trouble to the fort of Sidhedurg and the fleet at that place. Tulaji was told that Kowls to ships should be issued by him when they come within his limit; but that when they entered the territory assigned to the fort, fresh Kowls issued by the fort officers were necessary. Tulaji was warned against giving any further trouble in the matter.

A. D. 1744-45.

(226) Udaji Chavan represented that Mirajkar was causing disturbance in his territory. Orders were accordingly issued to Mirajkar.

A. D. 1752-53.

[ २२७ ] राजश्री शिवाजी साळोखी यास पत्र जे, तुह्मांकडून राजश्री गोविंद नरसिंह आले त्याणीं सविस्तर विनंति केली त्याजवरून अवगत झालें. हल्लीं करवीरवासीयाची फौज व उदाजी चव्हाण फौजेनसीह भिलवडीवर आले. तर तुह्मीं एकनिष्ठ सेवक आहां, हल्लीं पंडित प्रतिनिधीसही रवाना केले आहेत. राजश्री खंडो जगताप व वरकड पथकें यांस पत्रें रवाना केलीं आहेत. तर तुह्मीं आपले फौजेचा गाहा करून त्यास तंबी पोहोंचवणें. साहित्य पत्रें:—

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलावल १.

१ मशारनिल्हेस, १ राजश्री अंब्रोजी साळोखी यास, १ राजश्री महादाजी शिंदे यास पत्र, १ राजश्री यशवंतराव वोळेकर यास, १ राजश्री खंडोजी जगताप यास, १ राजश्री थबाजी भोसले यास, १ राजश्री खत्रोजी शिंदे यास, १ राजश्री संभाजी घोरपडे, १ संताजी शिंदे यास, १ शिवाजी भोसले, १ राजश्री महादजी शिंदे यास, १ राजश्री पोसजी गायकवाड, एकूण ११.

तुह्मीं हुजूरचीं पथकें असतां उदाजी चव्हाण यास सामील होऊन मिरज प्रांतीं धामधूम करितां तर सरंजाम दूर केला जाईल. तर देखत आज्ञापत्र राजश्री शिवाजी साळोखी यास सामील होऊन करवीरवासीयास तंबी पोहोंचवणें याविशीं पत्रें:—

१ राजश्री शिवाजी भोसले, १ राजश्री यशवंतराव वोळेकर यास, १ राजश्री थबाजी भोसले, १ महादाजी शिंदे यास, एकूण ४.

[ २२८ ] राजश्री शिदोजी शिंदे मालणगांवकर यासी आज्ञा जे, तुह्मीं लिहिलें जे मौजे मजकुरावरी डफळेची फौज येऊन वळती केली तेसमयीं युद्ध जाहलें ह्मणून तपशील लिहिलें. तर तुह्मीं एकनिष्ठ सेवक समयास न चुकाल हें साहेब जाणतच आहेत. तुह्मीं ठाणें मिरज येथें

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलावल १०.

---

(227) The following sirdars were, in concert with Udaji Chavan, causing disturbance in the Prant of Miraj. They were told that they were servants of Government, and that if they continued to disturb Miraj their Saramjams would be taken awey. They were further directed to join Shiwaji Salokhe at once, and attack the Raja of Karvir who had come with his army to Bhilawadi:—1 Shiwaji Bhosle, 1 Yeshwantrao Wolekar, 1 Thabaji Bhosle, 1 Mahadaji Shinde.

A. D. 1752-53.

(228) Sidhoji Shinde Malangaokar informed that the army of the Dafles had attacked the village and that a fight had taken place. He was directed to join the force at Miraj and to repulse the enemy..

A. D. 1752-53.

सामील होऊन शत्रूस पराभवास पावणें. ठाणें खबरदारीनें राखणें. संक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत, घेणें ह्मणून पत्र १.

[ २२९ ] किल्ले विशाळगडास सरखेल याणीं वेढा घातला तो उठोन जाये तें करणें ह्मणून पत्रें:—१ राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि, १ राजश्री यमाजीपंत यास, १ राजश्री उदाजी चव्हाण, एकूण ३.

इ. स. १७५२-५३. सुलास खमसैन मया व अलफ. रबिलावल १९.

[ २३० ] राजश्री उदाजी चव्हाण यासी आज्ञा जे, तुह्मांस आज्ञा नसतां तुह्मीं खाजगीच्या मुलखांत येऊन मन मानेसारखे रोखे करून रुपये घेतलेत आणि मिरजेशीं घसघत लावलीत हे अमर्याद गोष्ट केलीत. सेवक कोणाचे ह्मणवितां, मुलुख कोणाचा मारितां, ऐसे अमर्यादेनें तुमचा सरंजाम कैसा राहील. याउपर उत्तम दिसेल तें कर्म करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३. सलास खमसैन मया व अलफ. रबिलावल १२.

[ २३१ ] शिवाजी खांडेकर यासी पत्र जे, राजश्री हिंमतबहाद्दर मौजे सोनीस येऊन वेढा घातला, हा कोण विचार? तुजला तेथें पाठविलें असतां अद्यापि शुद्ध सोडून मन मानेसारिखें वर्तणूक करितो. आपले हद्दींत जात नाहीं तरी बुद्धिवाद करून आपले सरदेंत जात तो अर्थ करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३. सलास खमसैन मया व अलफ. रबिलावल १९.

[ २३२ ] राजश्री उदाजी चव्हाण यानें सोनई घेतली, पुढें मिरजेवर येणार तर तुह्मीं सर्व एकदिल होऊन मिरजेचें ठाणें जतन करून चव्हाण यास त्या प्रांतांतून काढून देणें. पत्रें:—१ दुलबाजी पिसाळ यास, १ खंडोजी शिंदे यास, १ संताजी शिंदे, १ महादजी शिंदे, १ पोसजी गायकवाड,

इ. स. १७५२-५३. सलास खमसैन मया व अलफ. रबिलावल २६.

---

(229) Letters to Udaji Chavan, Pant Pratinidhi and Yemaji Pant directing them to raise the siege which Tulaji Angria had laid to the fort of Vishalgarh.

A. D. 1752-53.

A. D. 1752-53.

(230) Udaji Chavan was addressed as follows:—'You had the audacity to levy contributions at your pleasure from the Khasgi villages and to engage in a quarrel against Miraj. Whose servant do you call yourself and whose territory do you pillage? How, in the face of these acts can you expect a continuance of the Saramjam? Do whatever you think best.'

A. D. 1752-53.

(231) Himmat Bahadar laid siege to Mouza Soni. Siwaji Khandekar was directed to induce him to go back.

(232) Udaji Chavan having taken Sonai and being about to attack Miraj, the following persons were directed to protect Miraj, and to repulse Udaji:—Dulbaji Pisal,

A. D. 1752-53.

१ गिरापा देसाई परगणे रायबाग, १ कालनाक व शिदनाक महार यास, एकूण ७.

[ २३३ ] तुम्हांस एकदोन आज्ञापत्रें सादर केलीं कीं,फौजेसुद्धां उठोन जाणें अद्याप गेलात नाहीं. तर हल्लीं पत्रदर्शनीं आपली फौजा आणखी फौज फोडून आपले ठिकाणेंयास जाणें. चव्हाणापाशीं न राहणें. पत्रें:— १ यमाजी रुद्र यास, १ आबाजी घाटगे, १ मालोजी घोरपडे, १ रताजी चव्हाण, १ मालजी चव्हाण, एकूण ५.

इ. स. १७५२-५३.
सल्लास खमसैन मया व अलफ.
रबिलावल २६.
1-2-1753

[ २३४ ] राजश्री पंडित प्रतिनिधि यासी पत्रें दोन पाठविलीं जे:—१ राजश्री यमाजीपंत यासी फौजसुद्धां पाठविलेत ते येऊन राजश्री बाबुराव सदाशीव यासी हर्षामर्ष बसविला हें कांहीं उत्तमात नाहीं. तरी फौजसुद्धां राजश्री यमाजीपंतास घेउन जाणें ह्मणून. किल्ले महिपतगड घेतला उत्तम जाहलें ह्मणून पत्र, १ कडेगांवची पेठ उध्वस्त केली, रुपये घेतले, पुढेंही उत्पात मांडिलात. तरी रुपये फिरोन देणें. पेठ आबाद राहे तें करणें ह्मणून, एकूण २.

इ. स. १७५२-५३.
सल्लास खमसैन मया व अलफ.
रबिलाखर ५.
e-2-1753

[ २३५ ] शिवाजी साळोखे यास पत्र जे, उदाजी चव्हाण तेथून गेले असले तरी तुह्मीं आपली फौज ठाण्यापुरती ठेवून ठाणें खबरदार राखणें. उरली फौज हुजूर पाठविणें. प्रतिनिधि या प्रांतीं येणार, तरी फौज पाठवावी. या कामास जासूद नाइकजी मल्हारजी जांबळा यास रुपये १० दहा खर्चास देणें पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सल्लास खमसैन मया व अलफ.
रबिलाखर ५.

---

Khatroji Shinde, Santaji Shinde, Mahadaji Shinde, Posji Gaikwad, Girrappa Desai of Pargana Raybag and Kalnak and Sidnak Mhars.

(233) The following persons were directed to leave Udaji Chavan, and to go to their own places with their respective armies:—Yemaji Rudra, Abaji Ghatge, Maloji Ghorpade, Rataji Chavan, Malji Chavan.

A. D. 1752-53.

(234) The Pratinidhi was addressed as follows :—

You sent Yemaji Pant with an army. He came and quarrelled with Baburao Sadashiva. This was improper. He should be recalled with his army. You have taken the fort of Mahipatgarh. This is good indeed. You made desolate the suburl of Kadegaon, levied contribution and are now molesting the country. You are now directed to restore the amount levied, and to make the suburl prosperous.

A. D. 1752-53.

(235) The Pratinidhi being about to proceed to Satara, Siwaji Salokhe was directed, in case Udaji Chavan had left the country, to send the army to the Huzur,

A. D. 1752-53.

[२३६] राजश्री तुळाजी आंग्रे याणीं किल्ले विशाळगडचा घेरा उध्वंस केला आणि किल्याखालीं राहिला आहे. तरी तुह्मीं सामील होऊन किल्ले मजकूरच्या घेरियांतून वेढा काढून लावून देणें पत्रें:—

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलाखर ६.

१ राजश्री कृष्णाजी पंडित अमात्य यासी पत्र, १ राजश्री अमृतराव पंडित यासी पत्र, १ राजश्री रामचंद्र सांवत भोसले यास पत्र, १ राजश्री जयराम सांवत भोसले यास पत्र, १ राजश्री कान्होजी शिरके यासी पत्र, १ सदरील, १ राजश्री तुळोजी आंग्रे यासी पत्रें जे, तुह्मीं पत्रदर्शनीं किल्ले मजकूरच्या घेरियांतून उठोन जाणें ह्मणून पत्र, एकूण ७.

[२३७] राजश्री अमृतराऊ पंडित प्रतिनिधि यासी पत्र जे, तुह्मीं पेशजीं सरकारचीं गुरें वळून नेलीं, त्यावरून एक दोन आज्ञापत्रें सादर झालीं परंतु अमान्य करून नाहीं आले. त्यावरून प्रत्युत्तर काय ह्मणावें ? हल्लीं पत्रदर्शनीं गुरें सोडून देणें. सविस्तर वर्तमान राजश्री जगन्नाथ महादेव सांगतां कळेल. पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलाखर ६.

[२३८] राजश्री पंडित प्रधान याची फौज घाटावर आली त्यास चौकीस राऊत निसबत राजश्री भवानी पंडित राजाज्ञाचे होते. त्याची व याची लढाई झाली. घोडीं तीन नेलीं, ते देणें ह्मणूत ताकिदी येणेंप्रमाणें:—

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलाखर २३.

१ दादो वाघ, १ गणेश बल्लाळ दामले, एकूण २.

---

keeping a portion for the protection of the station.

(236) Tulaji Angria laid waste the environs of the fort. The following officers were directed to jointly raise the siege:—

A. D. 1752-53.

Krishnarao Pandit Amatya, Amrutrao Pandit, Ramchandra Sawant Bhosle, Jayram Sawant Bhosle and Kanoji Sirke.

(237) The Pratinidhi on a former occasion carried away Government cattle. He was directed to restore them: but the orders were not obeyed. A fresh order on the subject was issued to him.

A. D. 1752-53.

(238) A battle took place between the army of the Peshwa when it came over the Ghauts, and the troopers at a Chowki belonging to Bhawani Shankar Pandit Rajadnya. Three horses, taken away, were ordered to be restored.

A. D. 1752-53.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलाखर २४.

(२३९) श्री नागदेव कसबे मानूर येथील श्रीचा मठ चिरंजीव दर्याबाई निंबाळकर यानीं वेढा घालून मठ लुटिला त्याबद्दल ताकिदी वस्तभाव देणें ह्मणून:—

१ दर्याबाई, १ मुलतानजी, १ गिरजाबाई घाटगे, १ मुलतानजी घाटगे.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलावल २९.

[२४०] राजमान्य राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यासी पत्रें जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें प्रविष्ट होऊन अभिप्राय श्रवण होऊन साहेबांस संतोष झाला. किल्ले विशाळगडचा उपराली यासी आज्ञेप्रमाणें येऊन राजश्री तुळाजी आंग्रे याचें पारिपत्य यथास्थित केलें. प्रस्तुत मशारनिल्हेकडून बावाजी विश्वासराव मध्यस्तींत आले आहेत; तह रह्र झालियानंतर हुजूर दर्शनास अविलंबें येतों ह्मणून कित्येक विस्तारें लिहिलें. अशास तुह्मीं कार्यकर्ते, धुरंधर, साहेबांच्या हितावह कराल. फौजेची बेगमी होऊन धणियाचे आज्ञेंत सेवक यथास्थित वर्तत आणि साहेबांचा दरमाहा हुजूर मोईनप्रमाणें पोहोंचे ते गोष्टी कराल, हा साहेबांस भरंवसा आहे. अंगारकाकडे दरमाह आजतागाईत तटला आहे तो झाडियानिशीं हुजूर प्रविष्ट होय तें करणें. अण्णाजी मुळीक हे हुजूर सेवा करीत आहेत. याचा पुत्र सेवकसुद्धां सावताचे आंग्र्यांचे युद्धप्रसंगांत आंग्रे याकडे हस्तगत झाला आहे, तो सुटे ऐसे उपाय करून चाकरसमेवत हाताखाले घेणें आणि हुजूर पाठवणें. कोंकणांत ब्राह्मणरयतेस उपद्रव होत आहे, वतनदार परागंदा झाले आहेत, या गोष्टी नहांत आणून यथास्थित नांदणूक होऊन कोंकण सुख पावे तो अर्थ करणें. राजश्री भगवंतराव पंडित अमात्य याचा व आंग्रे याचा हर्षामर्ष वाढला आहे व चिरंजीव करवीरवासीयेही किल्ले गगनगड याच्या घेरावर घांट येथें उपद्रव होऊन किल्ले मजकूरची खराबी केली आहे. तोही तह करून पंडित अमात्य व चिरंजीव व आंग्रे यासी गोडी करून त्रिवर्ग यथास्थित यथाविभागें सुखरूप सुख पावत तें करणें, येविशीं आज्ञापत्र अलाहिदा सादर केलें असे. पत्र १.

---

A. D. 1752-53.

(239) The religious monastery of Shri Nagnath Deo at Manur was attacked, and plundered by Daryabai Nimbalkar.

A. D. 1752-53.

(240) A letter to Jagjivan Pandit Pratinidhi to the following effect:—

You write that having come to the assistance of Vishalgarh in obedience to the instructions of Government, you have subdued Tulaji and others, that he is making negotiations for peace, and that you expect soon to return to Satara. You are a man of action, and will certainly do what is advantageous to the state. Take such steps as will ensure the

[ २४१ ] परगणे वाशीम हुजूर खासगीकडे साल दरसाल चालत असतां हल्लीं राजश्री रघुजी भोंसला सेनासाहेब सुभा यानीं आपले तर्फेनें कमावीसदार पाठवून हुजूरचे कमावीसदारास उठवून आपला अंमल बसविला याजकरितां ताकिदी. मसाला रुपये:—

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर १५.

१०० राजश्री रघुजी भोसले यासी पत्रें जे, परगणे वाशीम येथील अंमलदार व अंमल उठवून तुह्मीं आपला अंमल बसविला हें कार्यास येणार नाहीं. देखत आज्ञापत्र हुजूरचा कमावीसदार बसवून घेतला रुपया अंमलदाराचे जिंमे करणें ह्मणून पत्र. या कामास संताजी डोंब व हणगोजी कदम व राणोजी साळोखे व मुधोजी निकम, असामी ४.

१०० देशमुख व देशपांडिये यासी पत्र जे, तुह्मीं राजश्री सेनासाहेब सुभा याचा कमावीस बसविला. आज्ञा नसतां हुजूरचा कमावीसदार उठवून दिला हें उत्तम नाहीं. हुजुरून कमावीस पाठविला आहे याचे हवाले सालाबाद ऐवज करून पावती घेणें. या कामास संताजी डोंब व हणगोजी कदम व राणोजी साळोखे व मुधोजी निकम. एकूण रुपये १०० व पत्रें २.

[ २४२ ] राजश्री शिवाजी साळोखे यासी आज्ञापत्र जे, तुह्मीं आपला जमाव एकदील करून साहेबांचा किल्ला जतन करणें. राजश्री प्रधान पंडित ते प्रांतें येत आहेत, खबरदार राहणें. तुह्मांस वस्त्रें व चौकडा पाठविला घेणें ह्मणून १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर २०.

---

obedience of the Angria, and the payment by him to the Huzur of the monthly expenses, and arrange to obtain from him the expenses of maintaining the army and the arrears that are due. The Brahmin population of the Konkan is oppressed by the Angria, and the Watandars have left the province. You will see that tranquility is restored in the country. A dispute has arisen between Bhagwantrao Pandit Amatya and the Angria. The Raja of Karvir is giving trouble at the fort of Gagangarh. You will see that good feelings are established among these three persons and that their claims are amicably settled.

(241) The Pargana of Wasim was under the management of the Khasgi Department. Raghoji Bhosle turned out the Government officers of the Pargana, and brought it under his jurisdiction. Orders were issued to the Hereditary district officers, and to Raghoji Bhosle, in the matter.

A D. 1752-53.

(242) Siwaji Salokhe was informed that Pradhan Pandit (Peshwa) was going to his territory, and was directed to be on his guard, and to protect the Government forts.

A. D. 1752-53.

[ २४३ ] राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यासी पत्रें जे,—१ (सदरहु पत्र पृष्ठ ९८, कलम १२८, या ठिकाणीं देणेंत आलें आहे), १ बारामतीस राजश्री यमाजीपंत याचे पुत्र फौजसुद्धां जाऊन तर्फ बारामतीचे गांव दोन चार मारले. पुढें कसबे मजकुरासी घसत्रस लाविली आहे. त्यास या गोष्टी उत्तमांत दिसोन आल्या कीं काय? यमाजीपंतास सांगोन फौज मना करणें. एकूण २.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर २१.

[ २४४ ] राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यासी आज्ञा केली ऐसी जे, राजश्री यमाजीपंत याणीं खासगीच्या गांवांस उपद्रव करून सर्व वसूल नेला. हल्लीं मशारनिल्हेही गांवगन्ना राउत पाठवून रयतेस तसदी आरंभिली, हा कोण विचार? तुमचे चित्तीं खाजगीचे गांवची वसाहत व्हावी असें असेल तर मशारनिल्हेस पत्र पाठवून रयतेस उपद्रव न होय तें करणें. बरकड मुलखास उपद्रव देऊन तमाम वसूल नेला. याउपरी रयतेस ताकद नाहीं. तुमच्या चित्तीं मुलुख नांदूं नये असेंच असेल तर विनंतीपत्रीं लिहिणें. हल्लीं मौजे रुई संमत कोरेगांव येथें रयतेस राउत पाठवून तसदी केली आहे. मौजे न्हावी संमत कोरेगांव येथील गुरें नेलीं आहेत तीं अद्यापि सोडलीं नाहींत. पत्रीं एकनिष्ठता दर्शवून नानाप्रकारें उपसर्ग करितां हा विचार उत्तम नाहीं. याउपरी मुलखास उपद्रव एकंदर न होय तें करणें म्हणोन पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर २४.

[ २४५ ] राजश्री मल्हारजी होळकर यांसी आज्ञा केली ऐसी जे, मौजे म्हेसावड, परगणे सुलतानपूर हा गांव हुजूर खाजगीकडे आहे. त्यास हरएकविशीं बांडे उपद्रव देतात, येविशीं पेशजीं तुम्हांस आज्ञापत्रें सादर केलीं त्यावरून बांड्यांस ताकीदपत्र पाठविलें त्याचा त्यांणीं जाब दिला

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब १.

(243) Yemaji Pandit's son at the head of an army plundered some villages in Baramati. The Pant Pratinidhi was requested to direct Yemaji Pant to recall his army.

A. D. 1752-53.

(244) A letter to Pant Pratinidhi:—Yemaji Pant molests villages in charge of the Khasgi department, levies contributions, and carries off cattle.

A. D. 1752-53.

The ryots are impoverished. If it be your wish that Khasgi villages should not prosper, say so in plain terms. Otherwise write to Yemaji Pant to desist from further molestation. It is improper that while making professions of loyalty in your letters, you should continue to trouble the villages in various ways.

(245) The Bandes used to molest the village of Mheswad in Prant Sultanpur which was in charge of the Khasgi, and paid no attention to the remonstrances of Govern-

A. D. 1752-53.

नाहीं, या रीतीचा त्यांचा विचार. तरी याउपरी राउत पाठवून ऐवज मुववला करून हजार रुपये कमावीसदाराचे पदरीं पडत ऐसें करणें. राजश्री उदाजी पवार याच्या पुत्रानें मौजे मजकूरचें ठाणें घेतलें, पाटील मारला, घर लुटलें. तें तुह्मीं माघारें आमचे कमावीसदाराचे स्वाधीन केलें असतां मागती किरकोळी उपद्रव होतो. तरी मशारनिल्हेस ताकीद करून उपद्रव न होय तें करणें ह्मणून पत्र १.

येविशीं राजश्री रघुजी कदमराव बांडे यांसी पत्र १, एकूण २.

[ २४६ ] राजश्री पंत प्रतिनिधि यांस पत्र जे, मिरज प्रांतीं तुमचे घास दाणियाचे रोखे

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब १२.

झाले व राजश्री उदाजी चव्हाण यांणेंही त्या प्रांतीं मुलखाची खराबी केली त्यांस ताकीद करावी, ते तुह्मांकडून उपसर्ग होतो. मुलूख ओस करावासा असेल तर चित्तास येईल तें करणें. कसबे कवठे कर्यात नांदेड येथें स्वार पाठवून पाटील धरून नेले आहेत ते सोडून देणें व राउत उठवणें पत्र १.

[ २४७ ] राजश्री कान्होजी मोहिते यासी पत्र, मौजे सिरवडे येथील ठाणें तुह्मीं आज्ञेविरहित घेतलें व सरकाराचा दाणा गल्ला व घोडीं वस्तभाव

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रमजान ७.

लुटून नेलीं. त्यावरून ठाणें फिरोन घ्यावयाबद्दल रत्नाकर विठ्ठल यासी आज्ञा केली आहे व दाणा व हिसाद व घोडीं वस्तभाव तुह्मीं नेलीं आहे ते घ्यावयासी मशारनिल्हे यासी आज्ञा करून त्याच्या साहित्यास किल्याचे लोक व सरदार पथकें यासी आज्ञा केली आहे. हे ठाणें घेतील. तेथें युद्धप्रसंग होऊन तुमची जानगिरी होईल असें जाणोन मौजे मजकूरचें ठाणें व हिसाद, गुरें व दाणा गल्ला मशारनिल्हेच्या स्वाधीन करून पावल्याचें कबज घेणें ह्मणून पत्र.

---

ment. Udaji Powar's son captured the Thanna at the village, murdered the Patil, and plundered his house. Malharji Holkar recovered the Thanna and made it over to the Kamavisdar of Government. Udaji's son however continued to annoy the village. Orders were issued to Malharji Holkar in the matter.

(246) The Pant Pratinidhi levied Ghasdana from Miraj. The territory was also damaged by Udaji Chavan. He was told that if he chose to render the territory desolate, he was at liberty to do so.

A. D. 1752-53.

(247) Kanoji Mohite unauthorizedly captured the Thana of Sirwadi, and plundered corn and other articles belonging to Government. He was ordered to restore the property.

A. D. 1752-53.

[ २४८ ] राजश्री घनःशाम नारायण मंत्री यासी पत्र जे, राजश्री शिदोजी थोरात जमाव करून ठाणें अष्टेस जाणार, घोरपडे व मिरजकर वगैरे सामील करून घेणार ह्मणून हुजूर विदित झालें. तरी ठाणें अष्टें खासगीस असतां थोरातास कलह करावयासी प्रयोजन नाहीं. तरी तुह्मीं ते प्रांतीं आहां तरी थोरातास रविसीनें ताकीद करून, ठाणें अष्टेचें साहित्य करून ठाणें जतन होय तें करणें ह्मणून ताकीद पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रमजान १६.

[ २४९ ] राजश्री शिवाजी साळोखी यासी आज्ञा जे, कर्यात आटपाडी वगैरे महालांत धामधूम करितां तरी तुह्मांस धामधूम करावयासी प्रयोजन काय? तरी तुह्मीं आपला हिशेब कारकुनाबरोबर हुजूर पाठवून देणें. मनास आणून आज्ञा करणें ते केली जाईल ह्मणून ताकीदपत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रमजान १६.

[ २५० ] राजश्री बाळाजी पंडित प्रधान यासी आज्ञा जे, राजश्री रघुजी भोसले यांजकडे मौजे कवठेपिरान परगणे पन्हाळा हा गांव पेशजीं-पासून आहे. त्यास राजश्री शिदोजी थोरात यांणीं जबरदस्तीनें घेऊन राजश्री नारायणराव घोरपडे याचें ठाणें घातलें ह्मणून विदित झालें. तरी सरकारचें ठाणें घोरपडे यासी ध्यावयासी प्रयोजन काय? मौजे मजकूरचें ठाणें पूर्ववतप्रमाणें राजश्री रघुजी भोसले याचे स्वाधीन करणें ह्मणून पत्र.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रमजान २९.

---

(248) Sidhoji Thorat, with the assistance of Ghorpade and Mirajkar contemplated an attack against Thana Aste in charge of the Khasgi Department. Ghanasham Narayan Mantri was directed to protect the fort.

A. D. 1752-53.

(249) Siwaji Salokhe was plundering the Mahal of Atpadi and others. He was directed to send his accounts with his karkun to the Huzur, and was told that the necessary orders would then be issued.

A. D. 1752-53.

(250) Sidhoji Thorat forcibly captured the village of Kawate Piran in Pargana Panala belonging to Raghuji Bhosle, and placed Narayanrao Ghorpade in charge of it. Balaji Pandit was directed to restore it to Raghuji.

A. D. 1752-53.

[ २९१ ] राजश्री आपाजी नाईक व राजश्री बाळकोजी नाईक पारटे सरदार व समस्त हशम लोक ठाणें परगणे जावली यांसी आज्ञा जे, तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री पंत प्रधान यांणीं किल्ले महिपतगड घेतला हें सविस्तर विदित झालें. त्यावरून पत्र सादर केलें असे. तरी तुह्मीं कुल सरदार व मावळे लोक तमाम याची दिलभरी करून आपली बंदोबस्ती करून आपलेसहित त्यांजकडील लोक असतील ते तमाम जलद पोहोंचवून लोकांस उठवून काढणें ह्मणून पत्र, १ राजश्री अमृतराव येरुणकर, एकूण २.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल ८.

[ २९२ ] राजश्री तुळाजी आंग्रे यांसी पत्र जे, किल्ले महिमंडणगडच्या गेऱ्यास तुह्मां-कडून उपसर्ग लागतो तर एकंदर उपसर्ग न करणें. राजश्री पंत प्रधान यांणीं किल्ले महिपतगड घेतला. पुढें किल्ले महिमंडण व किल्ले रसाळगड यासी पेगम करून घेणार. तरी तुह्मीं आपला जमाव रसाळगडास पाठवून मशारनिल्हेच्या लोकांस तंबी पोहोंचवून धुडावून लावणें, व किल्ले महिमंडणगडनें हरएकविशीं साहित्य करून पेशव्याच्या लोकांस तंबी पोहोंचवून आपले सेवेचा उजरा करून घेणें ह्मणून पत्र.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल ८.

[ २९३ ] राजश्री तुळाजी आंग्रे सरखेल यासी आज्ञा जे, राजापूर सुम्याचा अंमल राजश्री पंत प्रतिनिधि याजकडे आहे, त्याचे तर्फेनें राजश्री नापोजी कान्होजी किल्ले महिमतगड येथें मामलेदार आहेत, त्यास तुह्मीं प्रांत मजकुराचा नानाप्रकारचे कजिये अमलाशीं लावीत होते. ब्राह्मणप्रजेस नानाप्रकारें उपसर्ग लागोन ब्राह्मण स्थळें सोडून देशावरी गेले ह्मणोन

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल १२.

---

( 251 ) Apaji Naik and Balkoji Naik Parte and the officers of Thana Javali informed Government that the fort of Mahipatgarh had been taken by the Peshwa. They were directed to collect all the Sirdars and all the Mawlis and to route the Peshwa.

A. D. 1752-53.

( 252 ) Tulaji Angria was directed not to molest the fort of Mahimandangarh. He was informed that the Pant Pradhan had captured the fort of Mahipatgarh and was about to attack the forts of Mahimandangarh and Rasalgarh. The Angria was ordered to send his forces to Rasalgarh, to route the Pradhan and to assist the fort of Mahimandangarh.

A D 1752-53.

( 253 ) The Subha of Rajapur which was under the jurisdiction of the Pant Pratinidhi was frequently troubled by Tulaji Angria. The Brahmins were molested in

A. D. 1752-53.

हुजूर विदित झालें. पेशजीं तुह्मांस एक दोन पत्रें येविशीं सादर झालीं असतां महिमानगडच्या मामलियांत कजिया मना होत नाहीं. हल्लीं कसबे देवरूख येथें स्वारी पाठवून किल्यानजीक वेढा घालितां हा कोण विचार? हे गोष्टीनें पंडित मशारनिल्हे यांच्या वडिलांच्या स्नेहास अंतर पडेल. साहेबांचाही शब्द तुह्मांस लागेल. ऐसें बरें समजोन वेढा घालितां तो मना करणें आणि सेवेसी लिहून पाठवणें. व मशारनिल्हेच्या अमलास अतःपर तिळतुल्य कजिया न करणें. या कामास हुजरे पाठविले यासी मसाला रुपये देणें.

[२५४] बावाजी जाधव वस्ती मौजे कुरले कर्यात आउंध यासी आज्ञा जे, राजश्री संताजी घाटगे याजकडे हुजुरून मौजे गुरसाळे कर्यात माइणी हा गांव मुकासा दिला आहे; तेथें तुह्मीं उपद्रव करितां आणि मौजे मजकूरचे कुळवाडी व गुरें वगैरे तुह्मीं नेले आहेत ह्मणून विदित झालें. त्यावरून आज्ञापत्र सादर केलें असे. तरी मौजे मजकूरच्या रयता व गुरें वगैरे जें धरून आलि आहेत ते देखत पत्र सोडून देणें. मौजे मजकुरास उपसर्ग लावावयासी प्रयोजन नाहीं. या कामास मानाजी भिलोर व येसाजी डोबरे पाठविले यासी मसाला रुपये १० देणें.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल १३.

[२५५] राजश्री बावाजी जाधव यासी पत्र जे, राजश्री यशवंतराव मोहिते याजकडे कसबे माइणीचें ठाणें आहे, त्यास तुह्मांकडील सुलतानजी कदम याणें स्वारी करून कसबे मजकूरचे बैल १५० नेऊन खंडणी घेऊन बैल सोडिले. त्यास ताकीद करून खंडणीचे रुपये देववणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल १६.

---

various way, and had to leave the province. Tulaji was written to on various occasions, but without any effect. He made an invasion about this time against Deorukh, and besieged the fort. He was reprimanded and informed that the course he was pursuing would alienate the friendly feelings of the Pratinidhi, and would also bring on the displeasure of Government. He was directed to raise the siege.

(254) Bawaji Jadhava of Kurle in Karyat Oundh attacked the village of Gursale belonging to Santaji Ghatge, and carried off some cultivators and cattle. He was directed to restore them.

A. D. 1752-53.

(255) The Thana of Mayni was in charge of Yeshwantrao Mohite. Bawaji Jadhava attacked the village, and carried off 150 bullocks, and restored them on receiving a tribute. He was directed to restore the money received.

A. D. 1752-53.

[ २५६ ] आनंदराव कृष्ण यासी आज्ञा जे, तुह्मांस हुजुरून आज्ञा नसतां कऱ्हाड प्रांतें धामधूम मांडली आहे, ह्मणून विदित झालें, त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी देखत पत्र हुजूर येणें. या कामास संताजी चव्हाण व जोत्याजी जाधव हुजरे पाठविले यासी मसाला रुपये १० देणें.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिलकाद ५.

[ २५७ ] येसूबाई डफळी यासी आज्ञा जे, कसबा सांवर्डें हा गांव खासगीकडे असतां तुह्मीं त्या गांवास स्वारी करून गांव लुटून नेला आणि पाटलास धरून नेला, त्यास चाळीस रुपये खंड बांधलास ह्मणून विदित झालें. तुह्मांस त्या गांवाशीं तालुखा काय ? याउपरी गांवची माल माळियेत, मुतळीचा तोडा जो नेला असेल तो देखत पत्र गांवीच्या गांवास देऊन कबज घेऊन हुजूर पाठवणें. पाटील मजकुरास सोडून देणें. या कामास मल्हारजी गायकवाड हुजरे यासी देणें रुपयें १०.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिलकाद ८.

[ २५८ ] सौभाग्यवति बचाबाई घाटगी यासी आज्ञा जे, दमाजी मान्या खिलारी याचीं मेंढरें व घोडीं व गुरें व नक्त व वस्तभाव वगैरे नागावा करून खराबा केला व सरकारचे खिलारी यासी कजिया करून नागावा करावयास प्रयोजन काय ? ऐशी गोष्टी केलिया साहेबास मान्य नाहीं. तरी देखत आज्ञापत्र यादीप्रमाणें दमाजी मजकूर याचे पदरीं घालून पावलियाचें कबज हुजूर पाठवून देणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिलकाद १०.

---

(256) Anandrao Krishna was creating disturbance in the Prant of Karad. He was directed to repair instantly to the Huzur.

A. D. 1752-53.

(257) The village of Sawarde which was under the management of the Khasgi department was attacked, and plundered by Yesubai Dafle. The Patil was arrested, and Rs. 40 were fined as the price of his release. She was directed to release him and to restore all property taken away.

A. D. 1752-53.

(258) Bachabai Ghatgi carried off Government cattle. She was directed to restore them.

A. D. 1752-53.

[ २५९ ] राजश्री शिवाजी साळोखे यासी पत्र जे, युद्धामध्यें राजश्री सुलतानजी घाटगे यासी पाडाव करून तुह्मीं ठाणियास नेले आहेत ह्मणून विदित झालें, त्यास पालखींत घालून त्याच्या गांवास पाठवून देणें. या कामास चिलोजी भंडारे व येसाजी ढोर हुजरे पाठविले त्याचे वियमानें रवानगी करून हुजूर विनंतीपत्र लिहिणें. पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिल्हेज २१.

[ २६० ] किल्ले गुणवंतगड येथें खालें करून द्या ह्मणून उभयतांही राजश्री कान्होजी शिरके याशी त्वष्ट लाविलें याजकरितां पत्रें जे, हुजूरचा किल्ला त्वप्ट लावण्यास प्रयोजन नाहीं ह्मणून पत्रः—

इ. स. १७५३-५४.
अर्बा खमसैन मया व अलफ.
साबान १२.

१ राजश्री पंडित प्रधान, १ राजश्री पंडित प्रतिनिधि, एकूण २.

[ २६१ ] राजश्री महादाजी नाईक निंबाळकर यांसी पत्र जे, फौज व गाडदी ऐसे घांट चढून येतात हा कोण विचार? जर करून माघारे जात ते करणें. इत्य जो असेल तो लिहोन पाठविणें. तुह्मीं सत्वर येणें ह्मणून पत्र जासुदाबरोबर पाठविलें.

इ. स. १७५३-५४.
अर्बा खमसैन मया व अलफ.
साबान १५.

१ सदरहू, १ जेजुरीविशीं बाजी माणकेश्वर, एकूण २.

[ २६२ ] किल्ले चंदनगड व किल्ले वंदनगड यांसी पत्र जे, श्रीकृष्णेपलीकडे फौज आली आहे. तरी किल्ले मजकुराहून पन्नास माणूस मौजे बडूथ येथें पाठवून अलीकडे कोणी उतरतील त्यासी उतरूं न देणें. माणूस निवडक गुप्तरूपें ठेवून बातमी बरचेवरी पोंहचवणें येविशीं

इ. स. १७५३-५४.
अर्बा खमसैन मया व अलफ.
साबान २६.

---

(259) Siwaji Salokhe defeated Sultanji Ghatge in battle and carried him prisoner. Siwaji was directed to send Sultanji in a palanquin to his village.

A. D. 1752-53.

(260) Pandit Pradhan and Pandit Pratinidhi were pressing Kanoji Shirke to surrender Gunavantgarh. They were informed that the fort belonged to Government, and that they had no reason to ask for its surrender.

A. D. 1753-54.

(261) Mahadaji Naik Nimbalkar was reprimanded for allowing forces to come up the Ghat and was directed to repulse them.

A. D. 1753-54.

पत्र २. या कामास सुमानजी गायकवाड पाठविला यास रुपये २ देणें.

इ. स. १७५३-५४.
अर्बा खमसैन मया व अलफ.
साबान २८.

[ २६३ ] राजश्री खंडोजी जगताप यांस पत्र जे, श्री रेवणशिध्याच्या गांवांस उपद्रव न देणें. देवा ब्राह्मणाचें साहित्य केल्यानें श्रेयस्कर आहे व खानापुराहून घोडी चोरून मांगानें आणिली ते तुह्मांपाशीं आहे, त्याविशीं पेशजीं तुह्मांस आज्ञापत्र सादर जहालें. त्यास तुह्मीं जबानी छटुंखान यांसी सांगितलें जे, घोडी आपण विकत घेतली. ऐसीयासी तुह्मीं चोरीची घोडी विकत घेतली हे उत्तम नव्हे. तरी घोडी व ज्याजपाशीं विकत घेतली तो ऐसे हुजूर पाठवून देणें. हुजूर आल्यावरी घोडी ज्याजपासून घेतली त्याजकरवीं घोडीची किंमत देविली जाईल ह्मणून पत्र १.

इ. स. १७५३-५४.
अर्बा खमसैन मया व अलफ.
रमजान २.

[ २६४ ] राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यांसी आज्ञापत्र जे, तुह्मीं कोरेगांव येथें आलां आणि दादू वाघ व गारदी त्रिपुटीवर आले हें वर्तमान काय? व आरळें येथील वाडी हुजूर आहे तेथील नांगर तुमच्या लोकांनीं मोडिला आणि बोलिले जे, प्रतिनिधीचा कौल आण. मग नांगर धरा, नाहींतर मारले जाल ऐसें बोलिले. हा विचार काय तो लिहिणें ह्मणून पत्र १.

---

A. D. 1753-54.

(262) The officers of forts Chandangarh and Wandangarh were informed that an army had come on the other side of the Krishna, and were directed to depute fifty men to Waduth to prevent it crossing the river.

A. D. 1753-54.

(263) Khandoji Jagtap was directed not to molest the village of Revansiddha, and was informed that much good would result from the protection of Gods and Brahmins.

A. D. 1753-54.

(264) Jagjivan Pratinidhi came to Koregaon and Dadu Wagh and his soldiers to Triputy. The Pratinidhi's men moreover prevented the ryots of the hamlet of Arle in charge of the khasgi department from cultivating their fields without Kowls from the Pratinidhi. The Pratinidhi was asked to explain the meaning of his movement and actions.

# लष्करी खातें.

## (अ) फौज.

[ २६५ ] कित्ता सनद राजश्री सुलतानजी निंबाळकर सरलष्कर यांस जे, तुह्मांकडे पेशजीं शिधोजी चव्हाण कारभारी होते ते मृत्यु पावले. याकरितां हल्लीं त्यांचे पुत्र अप्पाजी चव्हाण हुजूर उमेदवार शिलेदार होते. स्वामीकार्याचे मर्दाने जाणोन याजवर स्वामी कृपाळू होऊन तुह्मांकडील कारभारीपणाचें प्रयोजन सांगोन पाठविले आहेत. हे व तुह्मीं एका मतें असोन स्वामीकार्य करीत जाणें. त्यांस वेतन हक्क लाजिमाप्रमाणें केलें असे. इसम पैवस्तीपासोन वजा वटाव वंडकप्रमाणें वजा करून उरलें वेतन शिरस्त्याप्रमाणें पावीत जाणें. चाकर ठेवून त्या हातीं हजिरी लिहवितील त्या दिवसापासोन चाकराचा हक्क देत जाणें. यांस बसायास बारगीर घोडे देणें यास जमान.

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
रबिलावल २०.

[ २६६ ] कित्ता चिटणिशी पत्रें जे, तुह्मीं विनंतीपत्रें पाठविलीं ते प्रविष्ट झालीं, लिहिलें वर्तमान कळों आलें. स्वामींची आज्ञा घेऊन राजश्रीसमागमें मेणोलीस येऊन तेथून निरोप घेऊन राजश्री हिंदुराव घोरपडे यांजकडे जाऊन स्वामींचे आज्ञेप्रमाणें त्यांस सांगितलें. राजश्रीकडून राजश्री निळकंठराव आले. त्यांची व हिंदुरावाची भेटी होऊन निश्चय झाला. हिंदुरावानीं आपला पुत्र राजश्री दौलतराव घोरपडे फौजेच्या धंद्यास राजश्रींचे स्वाधीन केला. आपण पूर्वी मनसबियाचा अर्थ सेवेस निवेदन केलाच आहे, प्रस्तुत साह्यता करून सेवा होऊनये तो अर्थ केला पाहिजे ह्मणून लिहिलें, व राजश्री नारोराम मंत्री यांणीं स्वामीस विदित केलें त्यावरून स्वामी बहुत संतोष पावले. तुह्मीं बुद्धिमंत, तुह्मांपासोन अंतराय न होये ऐसा

इ. स. १७३१-३२.
इसने सलासीन मया व अलफ.
जमादिलवल ३.

---

( 265 ) Sidoji Chavan was thei Karbhari of Sultanji Nimbalkar Sir-Laskar. Sidoji, having died, his son who was a candidate for Silledarship at the Huzur was appointed to succeed him.

A. D. 1726-27.

( 266 ) Hindurao Ghorpade gave his son Daulatrao to the Kolhapur Raja for employment under him. His action was approved and he and Sagunabai Nimbalkar and others were directed to assist the Raja (of Kolhapur) in restoring order in his province.

A. D. 1731-32.

निश्चय मानिला होता तदनुरूपच कर्तव्यार्थ तुह्मीं संपादिला, उत्तम केलें. पुढील मनसब्याचा अर्थ तर चिरंजीव राजश्रीची साध्यता करून ते प्रांतींचा बंदोबस्त करावा हें स्वामीस अवश्यच आहे. राजश्री निळकंठराव आले आहेत, विचार अवलंबें कर्तव्य तें केलें जाईल ह्मणून पत्रें:—

१ सगुणाबाई निंबाळकर, १ हिंदुराव घोरपडे, १ मुरारजी घोरपडे, १ नारो साबाजी, १ केशवराव रघुनाथ, एकूण ५.

[ २६७ ] प्रांत सुरत व गुजराथ व परमुलखीं प्रांत सोरट व काठेवाडी मारवाड व द्वारका वगैरे महाल हुजूर खाजगीकडे ठेवून राजश्री नारो विठ्ठल यांस कमावीस सांगितली, तेथील बंदोबस्तास फौज असली पाहिजे, याकरितां मानाजी पवार यांस त्या प्रांतींची सरदारी सांगोन पाठविले आहेत. उभयतांनीं एकमतें वर्तोन स्वामीकार्य करणें, व फौजेच्या व ठाणियाचे बेगमीस येणेंप्रमाणें नेमणूक.

इ. स. १७३१-३२. इसने सलासीन मया व अलफ. रजब ३.

सुरत व गुजराथ प्रांतींचे महाल ६ येथील आकार होईल त्यापैकीं फौजेचा व ठाणियाचे बेगमीस तिसरी तक्षीम ऐवज देविला असे. बाकी दोन्ही तक्षिमा हुजूर रसद पावायाचा तह १.

परमुलखीं सोरट व काठेवाड व मारवाड व द्वारका वगैरे एकूण महाल ११ येथील आकार होईल त्यापैकीं फौजेचे व ठाणियाचे बेगमीस तीन तक्षिमा ऐवज बाकी, चौथी तक्षीम हुजूर रसद पाठवावी कलम १.

[ २६८ ] राजश्री शंभुसिंग जाधव यांस खासदस्तकाचें पत्र जे, मसलतीस राउत पाठविणें ते गांवास जातांच रवाना करितों ह्मणून स्वामी यांसी बोलून गेलां. त्यास जाऊन दिवसगत लागली अद्यापि एकही राउत आला नाहीं, यावरून स्वामींनीं अपूर्व मानिलें आहे. मस-

इ. स. १७३४-३५. खमस सलासीन मया व अलफ. रजब २१.

(267) The Mahals of Surat, Guzerath and the foreign territory of Sorat, Kathiawar, Marwar &c. were under the management of the Huzur Khasgi, and Naro Vital was appointed Kamavisdar. As it was necessary to keep an army there for the protection of the province, Manaji Pawar was appointed a Sirdar and both he and the Kamavisdar were directed to act in concert. One-third of the revenues of Surat and Guzerath and three-fourth of the revenues of the foreign territory were assigned for the maintenance of the army, and the remaining amount was ordered to be sent to the Huzur.

A. D. 1731-32.

(268) Sambhusing Jadhavrao agreed at a personel interview with the Raja to send horse-men as they were requied for service. He however failed to do so. He was repremanded and directed to send the horse-men immediately.

A. D. 1734-35.

लतीचे कामास तुह्मीं लोकांनीं दिरंगावर घालावें ऐसें नाहीं. स्वामीचीं आज्ञापत्रें पाठवावयाची सीमा झाली; याउपर देखत आज्ञापत्र बोलीप्रमाणें आपणाकडील राउत व एक सरदार शिताबीनें पाठविणें, एक घडीचा उज्रूर न करणें, येविशींची कित्येक आज्ञा राजश्री नारो-राम मंत्री यांस केली आहे; ते लिहितील त्यावरून कळों येईल. या कामास खंडोजी निंबाळकर दिंमत हुद्दे पाठविला असे; त्यास रुपये वीस देविले असेत, तें देणें ह्मणून पत्र १.

[ २६९ ] राजश्री कृष्णाजी पवार विश्वासराव यांस खासदस्तकाचें पत्र जे, तुह्मीं आपणांकडील पांचशें राउत मसलतीस पाठवावे अशी आज्ञा स्वामीनीं स्वमुखें तुह्मांस केली, तुह्मींही मान्य करून गेलां, परंतु एकही राउत न पाठविला. मसलतीचे दिवस गेल्यावर फौज येऊन काय कामाची ? याजकरितां हें आज्ञापत्र सादर करून हुजरे, फौज आणावयास पाठविलें आहे, व राजश्री अपाजीपंत व नरसिंहपंत यांसही आज्ञा केली आहे, हे सांगतील. तरी पत्रदर्शनीं पांचशें स्वार राजश्री मानाजी पवार याजकडे गोंवळकोटास रवाना करणें. एक घडीचा उज्रूर न करणें. या कामास खानमहंमद हुजरे दिंमत हुद्दे पाठविले असेत त्यास मसाला रुपये २५ देविले असेत. देणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३४-३५.
खमस सलासीन मया व अलफ.
रजब २३.

[ २७० ] मनेखान व मनसूरखान दिंमत राजश्री कान्होजी भोसले हे लढाईंत सांपडले, त्यांस अटकेंत ठेविले आहेत ह्मणून हुजूर विदित झालें. ऐशास लढाईंत शिपाई सांपडला, त्यास कैदेंत ठेवणें हें राज्यांत कोठेंही झालें नाहीं. हल्लीं उभयतांस हुजूर पाठवणें ह्मणून पत्रें:—

इ. स. १७३४-३५.
खमस सलासीन मया व अलफ.
सफर २.

१ राजश्री रघोजी भोसले, १ रघुनाथभट पटवर्धन. १ देशमुख देशपांडे परगणे कुन्हें यांस मसाल्याचें पत्र.

---

(269) A similar letter to Krishnaji Powar Vishwasrao.

A. D. 1734-35.

(270) Raghoji Bhosle kept Manekhán and Mansurkhan, employes of Kanoji Bhosle, as prisoners of war. Raghoji and Raghunath Bhat Patwardhan were informed that throughout the whole kingdom, soldiers captured in war were never kept as prisoners, and were directed to send the two captives to the Huzur.

A. D. 1734-35.

इ. स. १७३४-३५.
सित सलासीन मया व अलफ.
जमादिलावल ८.

[ २७१ ] राजश्री त्र्यंबकराव सोमवंशी यांस, स्वामी कृपाळू होऊन सरलष्करी सांगितली. रजपूत जयसिंगाकडून आले होते त्यांस जमियेत देखील चाकरी ठेविले.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब १७.

[ २७२ ] मौजे अकलखोप येथील पत्रें:—१ पेशवे यांस पत्र जे, तुमची फौज मौजे मजकुरावरून येणार तरी मौजे मजकूर खासगीचा गांव, तरी यास हरएकविशीं उपसर्ग न देणें. १ प्रतिनिधीस पत्र जे, मौजे मजकुरास तुह्मांकडून उपसर्ग लागतो तरी कोणेविशीं उपसर्ग न देणें. १ मौजे मजकुरास पत्र जे, पेशवे व प्रतिनिधि या उभयतांच्या फौजा आल्यानंतर तुह्मीं हुजूर पाटील कुळकर्णी येणें, गांवची लावणी करणें. १ जोत्याजी निकम यास पत्र जे, मौजे मजकुरास पाटील व कुळकर्णी यांस आणण्याविशीं रवाना केले, ऐशास पेशवे प्रतिनिधि यांच्या फौजा गेल्यानंतर पाटील कुळकर्णी हुजूर येतील. तूं आपला मसाला घेऊन उठोन येणें. एकूण ४.

## (ब) किल्ले.

### किल्ले आणि त्यांची व्यवस्था.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब १४.

[ २७३ ] राजश्री मुद्राधारी व लेखक किल्ले, चंदनगड यांसी आज्ञा कीं, किल्ले मजकुरीं ब्राह्मणाच्या असामी २८ आहेत, ते शेत खातात आणि चाकरी करीत नाहींत ह्मणोन हुजूर विदित झालें त्यावरून असाम्या बाद येणेंप्रमाणें घातल्या:—

---

A. D. 1734-35.

(271) Trimbakrao Somavanshi was appointed Sir Laskar. Some Rajputs who had come from Jaysing were enlisted in the service of Government.

A. D. 1752-53.

(272) The Peshwa's army was about to march through Akalkhop, a village in charge of the Kasgi Department. The Peshwa was directed not to molest the village in any way.

A. D. 1752-53.

(273) 28 appointments in connection with the fort of Chandangarh were held by Brahmins, and lands were enjoyed by them on that account. They however performed no service. There appointments were cancelled, and their lands were taken back and granted to Gadkaries.

१ शिवाजी विठ्ठल, १ निळो चिंतामणी, १ सखाराम त्रिंबक, १ बहिरो रघुनाथ, १ नरहरी शिवदेव, १ नरसो तिमाजी, १ यादोभट, १ भिकाजीराम, १ लक्ष्मण उद्धव, १ बापुराव कृष्ण, १ विनाजी कृष्ण, १ बाळ जोशी, १ धोंडो खंडेराव, १ महादाजी हरी, १ गोविंद त्रिंबक, १ गोविंद गणेश, १ अंताजी महादेव, १ तुळाजी यमाजी, १ बाबा जोशी, १ गोविंद शामराव, १ गोविंद नरहरी, १ हैबत मुरो, १ गोविंद नरसिंह, १ बेंकाजी नरहरी, १ चांगदेव केशव, १ आनंदराव भगवंत, १ सदाशीव आबजी, १ शिदो मोरेश्वर. एकूण अठ्ठावीस असामी दूर करून त्यांची जमीन असामीवार एकुणांत करून लोकांची समजावीस करणें. याखेरीज आणखी किल्ला असामी भरणारे ब्राह्मण असतील त्यापैकीं दर असामीस निंमे जमीन घेऊन लोकांची बेगमी करणें. आणि किल्ला गडकरी यांपासोन अलग नौबत घेणें पत्र १.

[२७४] किल्ल्यांची यादी.

१ सातारा अगर शाहूगड ऊर्फ अजीमतारा,
२ गुणवंतगड,
३ पावनगड,
४ पन्हाळा,
५ प्रतापगड,
६ वितंडगड ऊर्फ तिकोणा,
७ कठीणगड ऊर्फ तुंग,
८ राजगड माची संजीवनी माची, सुवेळ माची पद्मावती,
९ प्रचंडगड ऊर्फ तोरणा,
१० पुरंदर ऊर्फ वज्रगड,
११ सिंहगड ऊर्फ कोंडणा,
१२ पांडवगड,
१३ वैराटगड,
१४ महिमानगड,
१५ महिमंडणगड,
१६ मनमोहनगड,
१७ चंदनगड,
१८ सज्जनगड ऊर्फ परळी,
१९ वर्धनगड,
२० व्याघ्रगड ऊर्फ वासोटा,
२१ कमळगड,
२२ मबारदगड,
२३ भुज्यगड,

(274) List of forts from a ledger in the Satara Raja's records:—

1 Satara or Shahugad alias Ajimtara.
2 Gunwantgad.
3 Pawangad.
4 Panala.
5 Pratapgad.
6 Vitandgad alias Tikona.
7 Kathingad alias Tung.
8 Rajgad Machi. Sanjivani Machi, Suvek Machi, Padmavti.
9 Prachandgad alias Torna.
10 Purandhar alias Wajragad.
11 Sinhgad alias Kondana.
12 Pandavagad.
13 Vairatgad.
14 Mahimangad.
15 Mahimandangad.
16 Manamohangad.
17 Chandangad.
18 Sajjangad alias Parali.
19 Vardhangad.
20 Wyaghragad alias Wasota.
21 Kamalgad.
22 Mabaradgad.
23 Bhujyagad.
24 Machhindragad.
25 Sumerugad.

२४ मच्छिंद्रगड,
२५ सुमेरुगड,
२६ रत्नागिरी,
२७ सुधागड ऊर्फ भोरप,
२८ महिमंतगड,
२९ वंदनगड,
३० संतोषगड ऊर्फ ताथवडा,
३१ सुंदरगड ऊर्फ दातेगड,
३२ कोट इसलामपूर,
३३ राजगड,
३४ लोहगड,
३५ घनगड,
३६ कारीगड,
३७ विचित्रगड ऊर्फ रोहिडा,
३८ जयगड,
३९ प्रचितगड,

४० कर्नाळा,
४१ जीवधन,
४२ पाली ऊर्फ सरसगड,
४३ वज्रगड ऊर्फ रुद्रमाल,
४४ नारायणगड,
४५ इसापूर,
४६ राजमाची,
१ श्रीवर्धन,
१ मनरंजन,
४७ कोथळा,
४८ बावामलंग,
४९ माहुली,
१ माहुली,
१ पळसमुंडी,
१ भंडारदुर्ग,
५० कोहोज,
५१ पर्वतदुर्ग,
५२ असावा,

५३ अशारी,
५४ टकमक,
५५ कावनई,
५६ अलंग,
५७ कुरंग,
५८ मदनगड,
५९ त्रिगलवाडी,
६० सारंगा ऊर्फ बहिरवगड,
६१ मंगळगड ऊर्फ कागोरी,
६२ गगनगड,
६३ बिजागड ऊर्फ खरगोण,
६४ नांदगिरी ऊर्फ किकाणगी,
६५ रसाळगड,
६६ सावापूर,
६७ देवगड,
६८ कोथेल,

26 Ratnagiri.
27 Sudhagad alias Bhorad.
28 Mahimantgad.
29 Vandangad.
30 Santoshgad alias Tathavada.
31 Sundargad alias Dategad.
32 Kot-Islampur.
33 Rajgad.
34 Lohagad.
35 Ghanagad.
36 Kwarigad.
37 Vichitragad alias Rohida.
38 Jaygad.
39 Prachitgad.

40 Karnala.
41 Jivdhan.
42 Pali alias Sarasgad.
43 Wajragad alias Rudramal.
44 Narayangad.
45 Isapur.
46 Rajmachi
1 Shriwardhan;
1 Manaranjan.
47 Kothala.
48 Bawa Malang.
49 Mahuli-
1 Mahuli,
1 Palasmundi,
1 Bhandardurg.
50 Kohoj.
51 Parwatdurg.

52 Asavà.
53 Ashari.
54 Takmaka.
55 Kavnai.
56 Alang.
57 Kurang.
58 Madangad.
59 Trigalwàdi.
60 Saranga alias Bahiravgad.
61 Mangalgad alias Kagori.
62 Gagangad.
63 Bijagad alias Khargana.
64 Nandgiri alias Kikangi.
65 Rasàlgad,

६९ विशालगड,
७० ढाकगड,
७१ सुमरगड,
७२ विश्रामगड,
७३ कलानिधीगड,
७४ महिपतगड,
७५ कल्याणगड,
७६ सुवर्णदुर्ग,
७७ वसंतगड,
७८ मृगगड,
७९ ढाका,
८० पवनगड,
८१ जीवधन,
८२ कर्नाळा,
८३ वारूगड,
८४ गुणवंत ऊर्फ दातेगड,
८५ सदाशिवगड,
८६ गहनगड ऊर्फ चंद्रगड,
८७ गगनगड ऊर्फ हलवडा,
८८ रसाळगड,
८९ विकटगड,
९० कमलेगड,
९१ कोटकोल्हापूर,
९२ सालेरी,
९३ नाहवा,
९४ हातगड,
९५ अहीवडा,
९६ मार्कंडा,
९७ रवला,
९८ जवला,
९९ अणकाई,
१०० ठणकाई,
१०१ रामसेज,
१०२ भास्करगड,
१०३ त्रिंबक,
१०४ गडगडा,
१०५ घोटाडा,
१०६ रतनगड,
१०७ हरिश्चंद्रगड,
१०८ कुंजरगड,
१०९ सीतगड,
११० गोरखनाथ,
१११ चावंड,
११२ हाडसर,
११३ परबल,
११४ गंभीरगड,
११५ बहिरवदुर्ग,
११६ विशाळगड,
११७ रांगणा,
११८ मनोहार,
११९ भिवगड,
१२० पारगड,
१२१ वल्लभगड,
१२२ मधलीरगड,
१२३ महिंद्रगड,
१२४ महिपालगड,
१२५ सामानगड,

---

66 Sàwàpur.
67 Deogad.
68 Kothale.
69 Vishalgad.
70 Dhàkgad.
71 Summargad.
72 Vishramgad.
73 Kalànidhigad.
74 Mahipatgad.
75 Kaliyangad.
76 Suwarnadurg.
77 Wasantgad.
78 Mragagad.
79 Dhàkà.
80 Pawangad.
81 Jivdhan.
82 Karnàlà.
83 Warugad.
84 Gunwant alias Da-tegad.
85 Sadashivagad.
86 Gahangad alias Chandragad.
87 Gagangad.
88 Rasàlgad.
89 Vikatgad.
90 Kamalgad.
91 Kot Kolhapur.
92 Sâleri.
93 Nàhâva.
94 Hatgad
95 Ahivada.
96 Markanda.
97 Ravala.
98 Javla.
99 Anakai.
100 Tankài.
101 Ramsej.
102 Bhaskargad.
103 Trimbak.
104 Gâdgada.
105 Ghotàda.
106 Ratngad.
107 Harischandragad.
108 Kunjargad.
109 Sitgad.
110 Gorakhnath.
111 Chàwand.
112 Hadsar.
113 Parbal.
114 Gambhirgad.
115 Bahiravdurg.
116 Vishalgad.
117 Ràngna.
118 Manohar.
119 Bhivgad.
120 Pargad.
121 Wallabhgad.
122 Madhalirgad.
123 Mahindragad.

१२६ कठोरगड,
१२७ भुदरगड,
१२८ बहादूरबंडा,
१२९ ठाणे इसलामपूर,
१३० ठाणे मिरज,
१३१ ठाणे सोनी,
१३२ कोपाल,
१३३ माणीकगड,
१३४ सरसगड,
१३५ सागरगड,
१३६ सुरगड,
१३७ सारगड,
१३८ खांदेरी,
१३९ कुलाबा,
१४० घोसाळे,
१४१ सोनगड,
१४२ लिंगाणा,
१४३ विरूरंग,
१४४ कालेगड,
१४५ कुरूड,
१४६ केळणा,
१४७ मंडणगड,
१४८ रसाळगड,
१४९ हारशा,
१५० मतगड,
१५१ श्रीमंतगड,
१५२ प्रौढगड,
१५३ महिपालगड,
१५४ गंधर्वगड,
१५५ राजसगड,
१५६ मर्दनगड,
१५७ भूपालगड,
१५८ विलासगड,
१५९ पवित्रगड,
१६० मंडणगड,
१६१ साळोत्रा,
१६२ अचळगीर,
१६३ कनेरा,
१६४ दहेर,
१६५ वाघेरा,
१६६ खैरा,
१६७ सेवगांव,
१६८ भूपतगड,
१६९ कूहन,
१७० बळवंतगड,
१७१ मोहनगड,
१७२ मित्रगड,
१७३ बाहुला,
१७४ बिताका,
१७५ मारदत्ता,
१७६ औंढा,
१७७ अवड,
१७८ पाभारी,
१७९ सिपाला,
१८० निंबगिरी,
१८१ सोनगीर,
१८२ गनीरगड,

124 Mahipalgad.
125 Sàmàngad.
126 Kathorgad.
127 Bhudargad.
128 Bahadurbanda.
129 Thana-Islampur
130 Thana-Miraj.
131 Thana-Soni.
132 Kopa'.
133 Manikgad.
134 Sarasgada.
135 Sagargad.
136 Surgad.
137 Sârgad.
138 Khanderi.
139 Kulàba.
140 Ghosàle
141 Songad.
142 Linganä.
143 Viruràng.
144 Kalegad.
145 Kurud.
146 Kelna.
147 Mandangad.
148 Rasâlgad.
149 Hârshâ.
150 Matgad.
151 Shrimantgad.
152 Proadhgad.
153 Mahipatgad.
154 Gandharvgad.
155 Râjasgad.
156 Mardangad.
157 Bhupalgad.
158 Vilasgad.
159 Pavitragad.
160 Mandangad.
161 Sàlotra.
162 Achalgir.
163 Kanera.
164 Daher.
165 Waghera.
166 Khaira.
167 Shevgaon.
168 Bhupatgad.
169 Kuhan.
170 Balvantgad.
171 Mohangad.
172 Mitragad.
173 Bahula.
174 Bitàkà.
175 Mardatta.
176 Oundha.
177 Awad.
178 Pàbhari.
179 Shipala.
180 Nimbgiri.
181 Songir.
182 Ganirgad.
183 Komangad Diva.

१८३ कोमनगडदिवा, १८४ करवीरगड, १८५ सुपे, १८६ भांडे, १८७ महिमर्दनगड, १८८ कानकार्दीगड, १८९ सोर, १९० सिद्दी, १९१ कडवल, १९२ द्रोणागिरी, १९३ वीरगड, १९४ माणगड, १९५ फत्तेदुर्ग, १९६ सरोरा, १९७ खापरा, १९८ नरगुंद, १९९ तोरगड, २०० मलंगगड.

# मुलकी खातें.

—:o:—

## (अ) जमिनीची पाहणी व जमाबंदी.

इ. स. १७४६-४७. सबा अर्बैन मया व अलफ. साबान ४.

[ २७५ ] ताकीदपत्रें चिटणिशी श्रावण वद्य दशमी गुरुवासरे रासोजी बिन त्रिंबकजी जाधव मोकदम मौजे जायगांव परगणे हवेली मेहेकर देशमुख व देशपांडे परगणे मजकूर यांस ताकीद, मौजे जायगांव परगणे मजकूर येथील पाटिलकी मशारनिल्हेची आहे तेथील जमिनीचा थलझाडा कुळकर्णी यापाशीं होता तो धामधुमीमुळें गेला, त्यास रेणुको अनंत देशपांडे यांजकडे थलझाडा आहे परंतु ते आपणांस देत नाहींत. तरी रेणुको अनंत यांस ताकीद करून मौजे मजकूरचा थलझाडा व पांढर झाडा कुल कैफत दस्तक शिकियानिशीं करून यांजपाशीं देणें. फिरून बोभाट येऊं न देणें म्हणून पत्र १. या कामास जेजाल बारदार पाठविले:—२५ कुसाजी भिलारा. २५ बहिरजी तुपा एकूण ५०.

---

184 Karvirgad. 185 Supe. 186 Bhânde. 187 Mahimardangad. 188 Kânkârdigad. 189 Sour. 190 Sidhi. 191 Kadval. 192 Dronagiri. 193 Virgad. 194 Mângad. 195 Fatteḍurg. 196 Sarora. 197 Khapra. 198 Nargunda. 199 Torgad. 200 Malangagad.

A. D. 1746-47.

( 275 ) The Thalzada (field register) of Jaygaon in Pargana Haveli Mehekar was lost by the Kulkerni during a disturbance. The Patil informed Government that a copy of the document was with Renuko Anant Deshpande, and that he refused to give it. Orders were issued to the officer of the Pargana to get documents from Renuko Anant, and to give to the village officers a new Thalzada and Pandharzada (House register) duly signed and sealed.

## (ब) साऱ्याचा वसूल, सूट व हप्तेबंदी.

[ २७६ ] राजश्री नागोजीराम यांसी आज्ञा जे, मौजे मापूर तर्फ ( लागत नाहीं ) तुमचीं शेतें आहेत तुह्मीं ज्याप्रमाणें बोली केली असेल त्याप्रमाणें रयतेची उगवणी करावी ती गोष्ट एकीकडे ठेवून बोली रयतेस दुसरी बोलिला हें तुह्मांस योग्य नव्हे तर पाहिले बोलीप्रमाणें वांटणी घेणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहरम २५.

[ २७७ ] मोकदमानी मौजे रहिमतपूर यांसी अभयपत्र जे, कसबे मजकुरास कसाला पडिला यानिमित्त गांव खराब जाला. याकरितां सन इहिदे खमसैनची बाकींपैकीं रुपये ३००० व सन इसन्नेपैकीं स्वारीपट्टी एकूण दोन कलमें सोड दिली तरी बेशक लावणी करणें. खंडणीप्रमाणें उगवणी केली जाईल. अभय असे. पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रमजान २१.

## (क) मामलेदार आणि कमावीसदार.

[ २७८ ] हुजूर खर्चाची ओढ आहे याजकरितां मामलेदारांकडून पेस्तर सालच्या मामलतीपैकीं ऐवजाबद्दल ऐवज घेतला, यास येणेंप्रमाणें देणें. पेस्तर सालच्या ऐवजीं व्याजसुद्धां मजुरा दिल्हे जातील.

२०००० राजश्री प्रतिनिधीस पत्र जे, तुमच्या चिरंजीवाकडे आजाहत देशमुखीचा मामला आहे त्याऐवजीं तुर्त देणें येविशीं राजश्री अंताजी शिवदेव यासी आज्ञा केली आहे. ते लिहितील त्याप्रमाणें ऐवज सत्वर पाठवणें पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब १२.

---

(276) Nagoji Ram let out his fields at Mapur for certain rents. He desired to levy from his tenants higher rents than those previously fixed. He was directed to stick to the original terms.

A. D. 1752-53.

(277) Kasaba Rahimatpur having been plundered, a remission of land revenue to the extent of Rs. 3,000 was granted.

A. D. 1752-53.

(278) Government being in need of money, an advance payment on account of next year's revenue was taken from the Mamlatdars, and they were infomed that credit

A. D. 1752-53.

१०००० राजश्री घनःशाम नारायण यास पत्र जे, ऐवज पाठवणें. या कामास जासूद जानू जथा निसबत अंदोजी नाईक जाधव पाटील यासी खर्चास रुपये १० दहा देणें, पत्र १. एकूण १००००.

[२७९] कित्तापत्र चिटणिशी देशमुख व देशपांडिये परगणे साखरखेडले यासी आज्ञा केली ऐसी जे, पुतळी सरकारांतील बायको इजला मौजे वडदरें परगणे मजकूर हा गांव दहा वर्षांचा इजारा करून दिल्हा होता. तेथील इजारा दोन वर्षें चालविला. तिसरे वर्षी बेजहा करून बेज्या पैसा घेतला व मौजे मजकूरच्या पाटलाकडे कर्ज आहे तेंही मना केलें, म्हणून हुजूर विदित जाहलें. ऐसीयास इजारियाशिवाय जास्ती पैसा घ्यावयास प्रयोजन काय आहे? हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें असे तरी देखत आज्ञापत्र इजाऱ्याशिवाय जास्ती पैसा जो घेतला असेल तो फिरून देणें, व पाटील कुळकर्णी याचें खत पुतळीकडे आहे तें पाहून पाटिलास ताकीद करून वाजवी कर्ज असेल तें खताप्रमाणें हिशेब करून देवणें म्हणून पत्र. परवानगी महादू भोसला दिमत थोरला वाडा पत्र १.

इ. स. १७४३-४४.
अर्बा अर्बैन मया व अल्फ.
सफर ९.

## (ड) गांवच्या शिवेसंबंधी तंटे.

[२८०] कित्तापत्र बनाम देशमुख व देशपांडिये परगणे गेरूमाटरगांव सरकार नरनाळा सुभे पायाघाट यासी आज्ञा केली ऐसी जे, रामसिंग बिन संभाजी सवडदकर देशमुख देहाय परगणे अंबडापूर सरकार मेहेकर बालाघाट याचें वतनी देशमुखीचें गांव मौजे चिंचपूर व मौजे थोरभोकर व मौजे घोणसर परगणे अंबडापूर या गांवींचे शिवेशीं धुळोजी बिन उजळोजी वाकरा मोकदम मौजे फत्तेपूर परगणे मजकूर हा कजिया करीत होता. याजबद्दल रामसिंग देशमुख यांणीं परगणे मजकूरचे देशपांडिये व देहाय मजकूरचा मोकदम रायभानजी इंगळा

इ. स. १७४४-४५.
खमस अर्बैन मया व अलफ.
रजब २.

---

would be given for the payment made, together with interest, in the amount of the next year's revenue.

(279) The revenue of Waddare in Pargane Sakhar-Khedle was farmed out for ten years to Putali, a female servant at the palace.

A. D. 1743-44.

(280) In a dispute regarding the boundary of the village of Balapur, the Panch asked the Patil to walk over the old boundary after taking cow's hide over his head.

A. D. 1744-45.

व निंबाजी विश्वनाथ पांडिया देहाय मजकूर यासी समागमें घेऊन अवरंगाबादेस नवाब निजामनमुलूख याजकडे जाऊन फिर्याद केली. ते समयीं धुळोजी वाकरा याचा लेंक दुर्गोजी वाकरा अवरंगाबादेस जाऊन नवाबास रुजू न होतां राहिला. रामसिंग याचा करीना नवाब यांणीं मनास आणून हुकूम दिला जे, मवाजने माफीला जमीन जे कदीम असेल ते अनभवावी. त्यास मौजे रायदर व मौजे घारूड परगणे बाळापूर व मौजे फत्तेपूर परगणे गेरुमाटरगांव, एकूण तीन देहांची मुकदमी धुळोजी वाकरा याची त्यास धुळोजीनें फत्तेपूरची जमीन रायदर व घारूड या गांवांखाले घालून फत्तेपूरचे जमिनीस उणाव आणून रामसिंग देशमुख व रायभान मुकादम यांच्या तिहीं गांवांशीं कजिया करितो. त्यास रामसिंग देशमुख व रायभान इंगळा मोकदम याचे तीन गांव मौजे चिंचपूर व मौजे थोरभोकर व मौजे घोणसर, एकूण तीन गांव व धुळोजी वाकरा याचे वतनी गांव मौजे फत्तेपूर परगणे गेरूमाटरगांव व रायदर व मौजे घारुड परगणे बाळापूर, एकूण देह तीन ऐसे साहीं गांवची जमीन मवाजना करून कानगोच्या दप्तरीं कदीम रकमाला असेल त्याप्रमाणें जमीन दुमाले करून घेऊन अनभवावी. एकमेकांनीं कटकट करूं नये. येणेंप्रमाणें नवाबांनीं हुकूम करून दिवाणी परवाना करून दिला. त्यास मवाजना करावयास धुळोजी गैरहजीर होऊन कृष्णाजी व येसाजी अटोळे यांचे विद्यमानें पंचाइत मतें निवाडियांस मान्य जाहला. त्यास तुम्हीं परगणे मजकूरचे देशमुख व देशपांडिये व जयाजी पाटील मौजे दिवठाणें परगणे मजकूर व जानजी वाकरे देशमुख व मुकादम मौजे लोखंडे परगणे बाळापूर व धुळोजी वाकरा ऐसे एकमत होऊन पायाघाट व बालाघाटाचें गोत जमीदार जमा केले. त्यास तुम्हीं व समस्त गोतांनीं विचार मनास आणून सांगितलें जे, हरदु जणाचे शिंवेचा कजिया आहे त्यास त्यांणीं आपलें सत्य स्मरोन शिंवेवरून चालावें. त्याप्रमाणें आम्हीं पंचाइत गोत पाठीमागोन शिंवेवरून धोंडे टाकून शींव करार करून देऊं म्हणोन तुम्हीं व पंचाइतांनीं निश्चय केला. त्यास धुळोजी अग्रवादी याणीं क्रिया करावी. तो क्रियेस गैर रजावंद जहाला. ते समयीं तुम्हीं व समस्त गोतांनीं रामसिंग सवडदकर देशमुख परगणे अंबडापूर यासी सांगितलें जे, तुम्हीं आपल्या मोकदमाजवळून क्रिया करवणें. त्यावरून रामसिंग याणें मान्य करून रायभानजी इंगळा मोकदम देहायेंतील यासी क्रिया करणें म्हणून सांगितलें. त्यावरून पंचाइत गोतांनीं रायभान इंगळा याचे डोईवर गाईचें कातडें व गळां तुळशीच्या माळा व पांढरीचा जोडा बांधोन तुम्हीं तिहीं गांवची शींव असेल ती चालवून येणें म्हणोन सांगितलें. त्याप्रमाणें रायभान मान्य होऊन कदीम शींव होती त्याप्रमाणें चालला. पाठीमागोन पंचाइत गोत वतनदार यांणीं शिंवेवर धोंडे ठेविले. दस रात्र पंचा रात्रीचा वायदा रायभानास दिल्हा. त्याप्रमाणें क्रियेस

---

The Patil did so, and also stood an ordeal for fifteen nights. The boundary was therefore confirmed as pointed out by him.

खरा जाहला. क्रियेचे समयीं गाईचें कातडें रायभानानें डोईवर घेतलें होतें. त्यास शुद्ध करावें याजबद्दल क्रियेचे दिवशीं पायाघाट व बालाघाटचें गोत वतनदार होते. ते ब्राह्मण मिळोन रायभानास शुद्ध करून गोतानें आपलें साक्षीपत्र करून दिल्हें. त्याप्रमाणें तुह्मीं धुळोजी वाकरा याणें शिंवेवर धोंडे रोंवून आपलें संवादपत्र रामसिंग देशमुख व रायभान मोकदम यासी लिहून द्यावें, तें न करितां या गती कजिया करूं लागला याजबद्दल.—रामसिंग देशमुख व रायभान इंगळा मोकदम देह तीन हुजूर येऊन वर्तमान विदित केलें.त्या धुळोजीस हुजूर येणें ह्मणून तलब केली. त्यावरून धुळोजीचा पुत्र गोविंद वाकरा हुजूर आला. रामसिंग देशमुख व गोविंद वाकरा याचा कजिया मनास आणून राजीनामे व जामीन घेऊन पंचाइत नेमून दिल्ही. पंचाइतांनीं हरदू जणांचा करीना मनास आणून करार केला जे, रायभान इंगळा मोकदम चिंचपूर व मौजे थोरभोकर व मौजे घोणसर यांणीं गोताच्या सांगितल्यावरून गाईचें कातडें डोईवर घेऊन आपली शींव कदीम होती त्याप्रमाणें चालिला. दस रात्री व पंच रात्रींचे क्रियेस खरा उतरला. त्याप्रमाणें वर्तावें ऐसा निश्चय करून हुजूर विदित केलें. त्याप्रमाणें गोविंद बिन धुळोजी वाकरा याणेंही मान्य केलें, आणि आपलें पत्र रामसिंग देशमुख व रायभान मोकदम यासी लिहून द्यावयासी मान्य होउन पळोन गेला. त्यावरून हें आज्ञापत्र तुह्मांस सादर केलें असे. तर बालाघाट व पायाघाट येथील वतनदार गोत व तुह्मीं जमा होऊन रायभान इंगळा मोकदम देहायेंतील याजकडून क्रिया करून शींव करार करून दिल्ही आहे, त्याप्रमाणें हुजुरून करार केली असे. तरी तुह्मीं धुळोजी वाकरा मोकदम मौजे फत्तेपूर शिंवेवर येऊन पूर्वी क्रियेचे समयीं वतनदार गोत होतें तें जमा करून शिंवेवर धोंडे रोंवून आपलें पत्र धुळोजी वाकरा मोकदम मौजे फत्तेपूर परगणे मजकूर याचे संवादपत्र रामसिंग सवडदकर देशमुख व रायभान मोकदम देहायेंतील यास लिहून देऊन कजिया तोडणें. याउपरी फत्तेपूरकर रामसिंग देशमुख व रायभान मोकदम देहायेंतील परगणे अंबडापूर यांसी शिंवेचा कजिया करितील तर तुमचें वतन व धुळोजी वाकरा याचे वतनी गांव हुजूर अमानत होतील असें स्पष्ट समजोन वर्तणूक करणें. रामसिंग देशमुख व रायभान मोकदम देहायेंतील याचेतील धुळोजी वाकरा याणें जिरायत कापून नेलें आहे, तें व गुरें घोडीं नागावा नेला आहे तो माघारा देऊन पावल्याचें पत्र घेऊन हुजूर पाठवणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें अस्सल पत्र भोगवट्यास रामसिंग सवडदकर देशमुख याजपाशीं परतोन देणें ह्मणून पत्र चिटणिशी, श्रावण शुध्द प्रतिपदा रविवार.

१ सदरहू पत्र, १ वतनपत्र रामसिंग देशमुख सवडदकर व रायभानजी मोकदम देहायेंतील परगणे अंबडापूर सरकार मेहेकर, १ राजश्री संताजी अटोळे यास पत्र, १ राजश्री उदाजी अटोळे.

# इतर कर.

## जमिनीच्या महसुलाखेरीज दुसरे कर. (जकात.)

[ २८१ ] कमावीसदार जकात महालानिहाय व चौकीदार व देशमुख देशपांडे व मोकदमा जिल्हेनिहाय महालानिहाय यांस आज्ञापत्र जे, कासारशेटे सासवडे व समस्त कासार हुजूर बाजार व कासार महालानिहाये यांनीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली. कासारांनीं हरएक पेठेस जिन्नस खरेदी फरोक्त केला. त्यास व मार्गी जकाती हंशील व चौकी माफ आहे, व गांवगन्ना कांसार राहतात त्यांसही सारा व हंशील माफ आहे. अशास सांप्रत मार्गी व पेठांत व गांवगन्ना राहतात त्यांस व यात्रेंत उपसर्ग लागतो याजकरितां स्वामींनीं पत्र करून देऊन पुरातन जकात व हंशील व सारा व बैठक वेठबिगार कासारांस माफ आहे. त्याप्रमाणें चालविलें पाहिजे ह्मणून विदित केलें. त्यावरून मनास आणून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी कांसारी जिनसांस जकात व हंशील व चौकी वेठबिगार बैठकसारा कासारांस माफ पुरातन आहे त्याप्रमाणें चालवणें. ह्मणून पत्र चिटणिशी, मार्गशीर्ष शुद्ध तृतीया इंदुवासर शके ६८ दुर्गति नाम संवत्सरे पत्र १.

इ. स. १७४४-४५.
खमस अर्बैन मया व अलफ.
रबिलाखर २.

# इतर उत्पन्नें.

## घासदाणा.

[ २८२ ] मोकदमा जिल्हेनिहाय प्रांत वाई.

१ मौजे देगांव, १ मौजे किकली, १ मौजे जांब, १ मौजे वनगेळे, १ मौजे मालगांव, १ मौजे शीवथर, १ मौजे वडूथ, १ मौजे जळगांव, १ मौजे जांबबुद्रुक, १ मौजे तडवळें, १ मौजे शेंदूरजणें, १ मौजे वंचळी, १ मौजे तांदुळवाडी, १ मौजे जायगांव, १ मौजे चिंचणेर. येकूण

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर ११.

---

(281) All Kasars ( Braziers ) enjoyed immunity from taxation in regard to any purchases made in the town, and from Octroi on the road or at the fair, and from forced labour. The immunity was continued.

A. D. 1744-45.

(282) Baburao Sadashiv levied Ghasdana from fifteen villages in Prant Wai at Rs. 10 to 20 from each village. The villagers refused on that occount to pay the amount of Sirdeshmukhi (to Government); they were told that the levy of Ghasdana was no reason for withholding the Sirdeshmukhi dues.

A. D. 1752-53.

देहे १९ यांसी आज्ञा केली ऐसी जे, राजश्री बाबुराव सदासीव यांनीं देहाये मजकूरापासून घासदाणियाबद्दल गांव पाहून दहावीस रुपये घेतले. यास्तव तुम्हीं सरदेशमुखीचा ऐवज तटला ह्मणून हुजूर विदित जालें, त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तर राव मशारनिल्हे यानीं घासदाणियाचे रोखे केले ह्मणून सरदेशमुखीचा अंमल तटावयास तुह्मांस प्रयोजन काय? मुदामतप्रमाणें सरदेशमुखीचा ऐवज राजश्री हैबतराव केशरकर यांजकडे सुरळीत देणें. उजूर केलिया मुलाहिजा होणार नाहीं ह्मणून पत्र १.

---

## महालचे व गांवचे वतनदार.

---

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
जमादिलावल २९.

[२८३] किता एक वतनपत्रें श्रावण बहुल दशमी भौमवार बाजी येशवंत व गंगाधर येशवंत उपनाम चंद्रचूड गोत्र (जागा कोरी आहे) सूत्र आश्वलायन निंमे कुळकर्णी व ज्योतिषि मौजे निंबगांव नागाणा तर्फ खेड सरकार जुन्नर यासी दिल्हें वतनपत्र ऐसें जे, तुह्मीं सातारियाचे मुक्कामीं हुजूर येऊन स्वामीसन्निध विनंति केली कीं, ह्माळसाबाई कोम मल्हार रघुनाथ अत्रे गोत्र अत्रि कुळकर्णी व ज्योतिषि मौजे मजकूर इचे पोटीं पुत्रसंतान नाहीं, वतनसंबंधें व योगक्षेमामुळें कर्ज जाहलें तें वारावें व वृद्धापकाळीं कांहीं दानधर्म करावा यानिमित्त आपला जांवई लक्ष्मण गोविंद उपनाम टल्लू यास निंमे वतन दान दिल्हें आणि आमच्या घरास येऊन आपले खुश रजावंदीनें ह्माळसाबाई इणें सदरहू वतन कुळकर्ण व ज्योतीषदेखील कानू कायदे व घरवाडा निंमे आपणांस रुपये दोन हजारास विकत दिल्हें, आणि खरेदीखत व गोताचा महजर करून दिल्हा आहे तो राजश्री बाजीराऊ पंडित प्रधान यांस दाखवून पत्रें करून घेतलीं आहेत, तीं स्वामींनीं मनास आणून वतनपत्रें करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे ह्मणोन विदित करून खरेदीखत महजर राजश्री प्रधान पंतांचें पत्र हुजूर आणून दाखविलें.

खरेदीखत शके १६५६ आनंद नाम संवत्सरे अश्विन वद्य प्रतिपदा ते दिवशीं राजश्री बाजी येशवंत व गंगाधर येशवंत उपनाम चंद्रचूड अजहत देशपांडिये सरकार जुन्नर यांसी ह्माळसाबाई कोम मल्हार रघुनाथ अत्रे गोत्र अत्रि कुळकर्णी व ज्योतिषि अष्टाधिकारी मौजे निंबगांव नागाणा तर्फ खेड सरकार जुन्नर सुरुसन खमस सलासीन मया व अलफ सन ११४४ कारणें लिहून दिल्हें खरेदीखत ऐसें जे, मौजे मजकूरचें कुळकर्ण व ज्योतिषपण

---

A. D. 1740-41.

(283) Mahalsabai Kom Malhar Raghunath Atre, holder of the Kulkarni and Jotishi Watans of Nimbgaon Nagana in Tarf Khed of Sirkar Junnar, having no son, and being in embarrassed circumstances, made a gift of a half share in her

पुरातन वतन आहे, त्यासी आपले पोटीं पुत्रसंतान नाहीं व वंशांतही कोणी नाहीं. एका जिवानिशीं आपण राहिले. वृत्ति चालवून पांढरीची सेवा करावयास कोणी वंशवृद्धि नाहीं, नाउमेद झाली, आपली वृद्धावस्था जहाली, कांहीं दानधर्म करून जन्माचें सार्थक करावें व आपणांस योगक्षेम व वृत्तीमुळें कर्ज जहालें आहे तें वारावें यानिमित्त मौजे मजकूरचें कुळकर्ण व ज्योतिष आपलें पुरातन वतन त्यांपैकीं माझे जांवई लक्ष्मण गोविंद उपनाम टल्लू यांसी देखील घरवाडा व कानु व कायदे निंमे वतन दान दिल्हें, आणि तुमच्या घरास येऊन तुमच्या गळां पडोन तुह्मांस सदरील वतन कुळकर्ण ज्योतिषदेखील घरवाडा व कानु कायदे, हक्क लाजिमा निंमे वतन वडीलपण तुह्मांस विकत देऊन रुपये २००० तुह्मांपासून घेतले घरवाडा उजवे बाजूस निंमे तुह्मांस दिल्हा व डावे बाजूस निंमे लक्ष्मण गोविंद यांसी दिल्हा. तुह्मीं आपले उजवे बाजूस घर बांधून सुखरूप वंशपरंपरेनें नांदणें. कुळकर्ण्याचा मुशाहिरा टके ६० साठी एकूण रुपये २४ व गल्ला खंडी ३ येणेंप्रमाणें आहे तो निंमे तुह्मीं घेणें व निंमे लक्ष्मण गोविंद यांसी देऊन वंशपरंपरेनें अनभवून रहाणें. कुळकर्ण व ज्योतिषपणाचें मान.

## कुळकर्णाचें मान.

१ दिवाणांतून शिरपाव पाटिलामागें.
१ तेलियाचें तेल दर दुकानास दररोज ८८८९ टांक.
१ चांभाराचा जोडा वर्षास एक.
१ कोळियाचे पाणी पाटिलामागें.
१ लांकडाची मोळी सणाची एक.
१ शाईस तेल व कागदास रुमाल गांवापैकीं.
१ तांबोळियाकडील पानें पाटील घेईल त्याचीं निंमे घ्यावी. एकूण ७.

१ दिपवाळी दसरा वाजवणें पाटिलामागें.
१ माळियाची सेव सब्राजी पाटिलामागें.
४ श्री मार्तंडजीचे देवळाचे हक्क उत्पन्न. कलमें.
 १ माहे पौर्णिमेचे यात्रेस टके २॥.
 १ भंडारप्रसाद पाटिलामागें.
 १ अश्वीन आदितवारीं महिन्यांत ऊद पाटिलामागें, एका वारी घ्यावें.
 १ अश्वीने पौर्णिमेस मिठाई यात्रेचे दिवशीं पाटलाचे निंमे. एकूण ६.

---

Watans to her son-in-law, and sold the remaining half to Baji Yeshwant and Gangadhar Yeshwant Chandrachud for Rs 2000. The sale was sanctioned by the Peshwa, and was subsequently ratified by the Raja at the request of Chandrachud, a present of Rs. 500 being levied. The rights and perquisites of the Watans were as follows:—

*Kulkarni Watans.*

1 Sirpav to be received by the Kulkarni after the Patil.
1 Music to be played at the Kulkarni's house on the Dipawali and Dasra festivals, after at the Patil's.
1 Oil weighing 9 Taks to be taken from every oilman's shop.

ज्योतिषाचे हक्कः—१ बलुते गुरवाबरोबर, १ बेवळी प्रसाद भर बलुतियाबरोबर, १ इनाम शेत साडे बारमणी जमीन बिघे ८२९ एकूण ३.

येणेंप्रमाणें कुळकर्णाचे मान तेरा, निम्मे तुह्मीं घेणें व निम्मे लक्ष्मुण गोविंद यासी देणें, व ज्योतिषपणाचे हक्क उत्पन्न होईल ते निम्मे तुह्मीं घेणें व निम्मे लक्ष्मुण गोविंद यासी देणें. इनाम जमीन बिघे ८२९ पैकीं निम्मे तुह्मीं घेणें. सदरील कुळकर्ण व ज्योतिषपण बंदोबस्तपैकीं निंमे तुह्मांस दिल्हें व मानपान, हक्क, उत्पन्न वगैरे लाजिमे निंमेप्रमाणें घेऊन सुखरूप रहाणें. वंशपरंपरा भोगवटा घेणें व आपला मिरासचा घरठाणा आहे त्यापैकीं निंमे उजवे बाजूस तुह्मांस दिला असे व निंमे डावे बाजूस लक्ष्मुण गोविंद यांसी दिल्हा असे. यांसी कोणी आपला अपर आपण हिला हरकत करील त्यांस पूर्वजांची शपथ असे. हें खरेदीखत लिहून दिल्हें असे.

येणेंप्रमाणें खरेदीखत व महजर गोताचे साक्षीनिशीं व राजश्री प्रधान पंतांचें पत्र आणून दाखविलें तें मनास आणितां तुह्मीं माळसाबाई कोम मल्हार रघुनाथ अत्रे इजपासून मौजे मजकूरचें निंमे कुळकर्ण व निंमे ज्योतिषदेखील कानुकायदे, व बरवाडा दोन हजार रुपये देऊन खरेदी केलें ऐसें तहकीम कळोन आलें. त्यावरून स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन सदरहू वतन मौजे मजकूरचें निंमे कुळकर्ण व निंमे ज्योतिषदेखील बरवाडा व कुळकर्णाचा मुशाहिरा व इनामसहित व हक्क लाजिमे कानुकायदे, वडीलपण, मानपान, तश्रीफ खरेदीखताप्रमाणें तुह्मांस व तुमचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें अजरामऱ्हामत करून देऊन हें वतनपत्र करून दिल्हें असे. तरी तुह्मीं सदरील वतन आपले दुमाले करून घेऊन वतनाची सेवा करून तुह्मीं व तुमचे वंशपरंपरेनें वतन अनभवून सुखरूप राहाणें.

---

1 Vegetable to be taken from the vegetable sellers, after the Patil.
1 One pair of shoes from the shoe-makers annually.
1 Water to be supplied by the Koli after at the Patil's house.
1 One bundle of fuel on each festival.
1 Oil for ink and a piece of cloth for keeping papers, to be received from the village.
1 Half the number of leaves received by the Patil, to be taken from the leaves-sellers.
1 Proceeds of the temple of Shri Martand.
1 2½ Taks at the Pournima fair.
1 Bhandara presents after the Patil.
1 Sweet-meats, half the quantity received by the Patil.

*Jotishi Wattans.*

1 Baluta equal to Guravas.

तुमचे मार्था वतनसंबंधें शेरणी कुतर्फा रुपये १०० करार केले असेत. वसूल घेऊन सुखरूप राहाणें ह्मणून येविशीं पत्रें.

[२८४] किता वतनपत्र वैशाख शुद्ध तृतीया गुरुवासरे शिदोजी बिन शिवाजी बिन

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
रबिलावल २६.

ह्मसाजी थोरात देश चौगुला तर्फ वाळवे प्रांत पन्हाळा यांस दिल्हें वतनपत्र ऐसें जे, तुह्मीं किल्ले सातारियाचे मुक्कामीं हुजूर स्वामी-सन्निध येऊन विनंति केली कीं, आपणांस कांहीं वतन करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे ह्मणून. त्यावरून मनास आणितां तुह्मीं कदीम स्वामीच्या राज्यांतील एकनिष्ठपणें सेवा करीत आहां. तुमचें चालवणें अगत्य जाणोन स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन तालुके मजकूरचें देश चौगुलकीचें वतन नूतन अजरामऱ्हामत करून दिल्हें असे. देहे बितपशील.

१ कसबा वाळवे, १ मौजे उरूण देखील पेठ इसलामपूर, १ मौजे गोटाखिंडी, १ मौजे येलूर, १ मौजे शिरगांव, १ मौजे पुणदी, १ मौजे देवरंडे १ मौजे पळूस, १ मौजे धापडे, १ मौजे कामेरी, १ मौजे बाहे, १ मौजे कुंडल, १ मौजे येडें, १ मोजे लवंड, १ मौजे नागांव, १ मौजे कणेगांव, १ मौजे नागठाणे, १ मौजे भादुरवाडी, ऐकूण १८.
येणेंप्रमाणें देहे अठरा तर्फ मजकूर येथील देश चौगुलकीचें वतन तुह्मांस व तुमचे

---

1 Presents at the temple, equal to the first-rate Balutas.
1 Inam of 25 Bighas assessed at 12½ Maunds.

(284) The Desh Chowgulki Watan in 18 villages of Tarf Walve in Prant Panala was granted to Sidhoji bin Siwaji Thorat and Nazar of Rs. 1,000 was levied. The rights and perquisites of the Watan were as follows:—

A. D. 1740-41.

1 An allowance at the rate of Rs. 1-4 per hundred of the village revenues in cash to be levied from the villages.
1 Faski to be levied on sales of corn in the markets.
1 Land to be taken in the villages at the rate of 1¼ Bighas for every Chahur.
1 Butter and vegetables to be taken from villages on the anniversary ceremonies of the death of parents.
1 Oil nine Taks to be taken every day from every oil press.
1 One goat from each village on the Dasara festival.
1 25 leaves to be taken from each leaves-seller every day.
1 One pair of shoes from the shoe-makers of each village.

पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें दिल्हें असे. या वतनास हक्क लाजिमा रयते निसबतीनें करून दिल्हा असे वितपशील:—

१ गांवगन्नास नक्क आकार होईल त्यास दर सनदे रयत निसबत रुपया १। याप्रमाणें हक्क घ्यावा कलम.

१ गांवगन्ना दर बाहुरीं जमीन बिघा १। प्रमाणें घ्यावी कलम.

१ दसरियाचें बकरें १ दर गांवास घ्यावें कलम.

१ दरगांवास चांभारापासोन १ जोडा घ्यावा कलम.

१ राबता महार १.

१ फांट्यांच्या मोळ्या सणास गांवगन्ना घ्याव्या कलम. एकूण ६.

१ बाजारांत गल्ला फरोक्त न होईल त्यास फसकी घ्यावी कलम.

१ पितरांस लोणी व शाकभाजी गांवगन्ना घ्यावी कलम.

१ तेलियाचे घाणियास दररोज तेल नवटांक घ्यावें कलम.

१ तांबोळियाचे दर दुकानास दररोज पानें सुमारें २९ प्रमाणें घ्यावीं कलम.

१ बाजाराचे दिवशीं माळवें शेव घ्यावी कलम.

१ वाणियाचे दुकानास सुपारी तंबाखू घ्यावीं कलम. एकूण ६.

एकूण कलमें बारा हक्क करार करून देऊन तुम्हांस हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुम्हीं तर्फ मजकूरचे देश चौगुलकीच्या वतनाची सेवा दंडकप्रमाणें याचे हातें घेत जाणें. हक्क लाजिमा कानु कायदे सदरहुप्रमाणें व पान मान तश्रीफ यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणें. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची तालीक लिहून घेऊन हें अस्सल पत्र भोगवटियाबद्दल याजवळी परतोन देणें, येविषयीं पत्रें ९.

[ २८५ ] किताफ्त्रें चिटणिशी बाळाजी रुद्र व केसो रुद्र व मोरो रुद्र शेणवे पोतदार तर्फ राजापूर याणीं हुजूर शाहुनगर नजीक किल्ले सातारचे मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, तर्फ मजकूरचें पोतदारीचें वतन आपलें आपण उपभोग करीत असों, परंतु वतन-

इ. स. १७४०-४१. इहिदे अर्बैन मया व अलफ. जिल्काद ९.

1 One Mhar for menial service.

1 Vegetables to be taken from vegetable-sellers on every Bazar day.

1 Bundles of fuel to be taken from villages on every festival.

1 Beetle-nut and tobacco to be taken from Banya's Shops.

(285) Balaji Rudra, Keso Rudra and Moro Rudra, Shenawai Potdar of Rajapur, having brought to notice the inadequacy of Haks and perquisites of his Watan the following addition was made to the same:—

A. D. 1740-41.

संबंधें हक्क लाजिमा थोडका तेणेंकरून कुटुंबाचा योगक्षेम चालत नाहीं. तरी महाराजांनीं कांहीं जास्ती हक्क लाजिमा करून भोगवटियास हुजूरचीं पत्रें करून देऊन वंशपरंपरेनें चाल-विलें पाहिजे म्हणून विदित केलें व जिल्हे जिल्हेकडील पत्रें आणून दाखविलीं, त्यावरून मनास आणितां पोतदारमजकूर पुरातन वतनदार, कुटुंबवत्सल यांचें चालविणें आवश्यक जाणोन स्वामी यांवरी कृपाळू होऊन यांस हक्क लाजिमा जास्ती करार करून दिल्हा बितपशील :—

हक्क रयत निसबत गांवगन्ना लाहारी दाभोली.

२०० कदीम हल्लीं चालत असत.
२०० जास्ती करार केल्या असेत.
———
४००

एकूण चारशें लाहारी गांवगांवगन्नापैकीं हक्क करार करून दिल्हा असे व सदरहूखेरीज गांवगन्ना मानपान पुरातनप्रमाणें करार केला असे. देवीत जाणें. १ कलम.

मौजे रिंगणें तालुके मजकूर पोतदार मजकूरचा पुरातन खोतीचा वतनी तेथें इनामत पूर्वी चालत होती हल्लीं चालत नाहीं त्यावरून हल्लीं जमीन इनाम करार करून दिल्ही असे.

०७ भातजमीन.
०३ वरकसजमीन.
———
०१०

मीठबंदर राजापूर व राहा मुसकी व बाजे महाल व महाल मजकुरीं ठिकाणांत जकात येथील मोईन.

| मीठ खंडीस रुके. | बैलीं हरजिन्नस रुके. |
|---|---|
| ०६ कदीम. | ०१ कदीम. |
| ०६ जास्ती. | ०१ जास्ती. |
| ।- | ०२ |
| बारा रुके दर खंडीस मीठ फरोक्त होईल त्यास वाण्यापासून पारखावण देत जाणें. कलम १. | दर बैलीं रुके दोन हरजिनसास देवीत जाणें. कलम १. |
| मीठारू तरांडियास मीठ पांटी १. | बाजे महाल व राहा मुसकी पाणवाट फसकी पुरातनप्रमाणें देणें. कलम १. |

एकूण कलमें चार. येणेंप्रमाणें चालवीत जाणें कलम १.

पोतदार मजकुरास पालख.

घरें ९ खासा. ९ हैसी.

---

1 The Hak to be levied from the Ryot direct which amounted to 200 Laharies was raised to 400.

1 The remuneration in connection with the salt manufactory and an octroi in the Mahal, which was calculated at the rates of 6 Rukas for every Khandy of salt sold, and one Ruka for every Khandy load of other articles, was ordered to be calculated at double the rates.

1 One basketful, of salt was to be taken from every ship carrying salt.

एकूण दहा बिघे जमीन इनाम दिल्ही असे. चतुःसिमा करून देऊन इनाम चालवणें. कलम १.

कसबा राजापुरी घरवंताचीं ठिकाणें दोन आहेत, त्यांखालें झाड झाडोरा वगैरे आदिकरून इनाम दिल्हीं असत. ठिकाणें दोन्हीं इनाम चालवीत जाणें. कलम १.

कसबा राजापुरी दुकानें पालक २.

चाकर व गुलाम यांचीं घरें पालक ३.

एकूण घरें पांच व दुकानें दोन व म्हैशी पांच येणेंप्रमाणें पालक चालवणें १.

एकूण कलमें सुमार ५.

एकूण कलमें पांच कदीम व जास्ती हक्क लाजिमा व पालक व इनाम सदरहूप्रमाणें करार करून दिल्हा असे. तरी तुम्हीं पोतदार मजकूर याचे दुमाला करून याचे हातें वतनाची सेवा घेऊन यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालविणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें येविषयीं पत्रें ४.

[ २८६ ] किताबपत्रें चिटणिशी बाळंभट व विश्वनाथभट बिन रघुनाथभट वैद्य गोत्र गार्ग्य सूत्र आश्वलायन हे स्वामीची सेवा निष्ठेनें करितात यांचें चालवणें अवश्य जाणोन यासी नूतन वतन महालानिहाय.

इ. स. १७४०-४१. इहिदे अर्बैन मया व अलफ. जिल्काद १०.

१ हवेली दाभोळ, १ तर्फ चिपळोण, १ तर्फ आवर्डे, १ तर्फ वेळंब, १ तर्फ गोहागर, १ तर्फ खेडतळवटी, १ तर्फ टाळ्सुरे, १ तर्फ पंचनदी, १ तर्फ केळशी, १ तर्फ वसवी, १ तर्फ नातू पाळवण,

एकूण महाल अकरा सुभा प्रांत दाभोळ येथील सर मोकदमीचें वतन यासी व याचे पुत्र पौत्रादी वंशपरंपरेनें करून दिल्हें असे. यास वतनास हकलाजिमा रयत निसबतीनें.

गांवगन्ना महालानिहाय आकार होईल त्यास रयतनिसबतीनें.

नक्ती आकारास दर सनदे रुपया १.

किराणा जिन्नस आकारास वजनी खंडीस हक्क एक पक्का ⁄।.

जलमार्गे गलबतावरून जिन्नस येईल त्यास.

केली मापें खंडीस हक्क तीन पायली ⁄।.

वजनी खंडीस हक्क दहा शेर ⁄।.

मीठबंदरीं मीठ पिकलें तेथें दरखंडीस हक्क तीन पायली ⁄।.

---

1 Ten Bighas of land, as also the trees in two pieces of land at Rajapur belonging to the Watandars, were granted in Inam.

1 Five houses of the Watandars, five she-buffaloes, two shops and three houses of servants and slaves were exempted from taxation.

(286) In consideration of the loyalty of Balambhat and Vishwanathbhat bin Raghunathbhat Waidya, the Sir Patilki Watan of Haveli Dabhol, Chiplun and

A. D. 1740-41.

ऐन जिनसी आकारास बारुले खंडीस गल्ला तीन पायली ०।

एकूण कळमें तीन जकातीस दर बैलास हक एक रुका.

गौळियाच्या म्हैशीस हक सालीना दरम्हैशीस लोणी अच्छेर ००॥.

तेलियाच्या घाणियासी तेल दरमाहा हक वजन कचें अच्छेर ००॥.

गांवगन्ना हक सालिना दरगांवास. लोणी एक शेर ००१, इरलें १.

गांवगन्ना चांभाराकडील जुतें दरसाल १.

येणेंप्रमाणें हक करून दिल्हा असे. तरी यासी व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें पत्र भोगवटियास यासजवळ परतोन देणें येविशीं पत्रें १४, मार्गशीर्ष बहुल तृतीया इंदुवासर.

[ २८७ ] किताबपत्रें राजश्री देवराव मेघःशाम व राजश्री नागोजीराव मेघःशाम मोकदम प्रथमाति सूत्र आश्वलायन हे स्वामीची सेवा निष्ठेनें करितात. त्यांचें चालवणें आवश्यक जाणोन स्वामी याजवरी कृपाळू होऊन यासी नूतन वतन परगणे इंदापूर सरकार जुन्नर येथील नाडगौंडीचें

इ. स. १७४२-४३.
सलास अर्बैन मया व अलफ.
मोहरम ५.

---

other Mahals, was conferred on them. The Haks to be levied on account of the Watan from the ryot were as follows:—

1 Rupee 1 for every hundred Rs. of the land revenue in cash.

1 Three Pailies for every Khandy (by measure) of grain of the land revenue in kind.

1 One Dhada for every Khandy (by weight) of groceries of the land revenue in kind.

1 One Ruka from the carrier of every bullock-load on account of octroi.

1 Three Pailies for every Khandy (by measure), and ten Sheers for every Khandy (by weight), brought by sea.

1 Three Pailies of salt from every salt manufactory.

1 Half a sheer of oil every month from every oil-press.

1 Half a sheer of butter every year for every she-buffalo belonging to a cow-herd.

1 One sheer of butter, and one head screen for use in the rainy season every year from each village.

1 One pair of shoes every year from the shoe-maker of each village.

(287) In consideration of the loyalty of Deorao and Nagojirao Meghasham, the Nadgauda Watan of Pargana Indapur in Sirkar Junnar was conferred on them.

A. D. 1742-43.

वतन यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अजरामऱ्हामत वतन करून दिल्हें असे. बासी हक व लाजिमा व बाजे कानूकायदे. बितपशील.

गांवगन्ना परगणे मजकूर.

जमीन पड व हितकदीम रकमाला आहे त्यास दर चाहुरीं इनाम जमीन बिघे ८२.

जमाबंदी नक्ती व गल्ला व वजनी व सुमारीं जो होईल त्यास रयत निसबतीनें दर सनदे दुहोत्राप्रमाणें हक कलम १.

पाळणुक देशमुख व देशपांडिये यांच्या शिरस्तियांप्रमाणें चालवणें कलम १.

कसबे मजकुरीं गैरवारशी पांढरीमध्यें जमीन आहे तेथें यास वाडा बांधावयास पेठ व कसबा मिळोन जमीन बिघे ८२.

आंबराई वगैरे झाड झाडोरा सरकारांत जमा होईल त्यास दरसनदे २, कलम १.

मणवार व पितरांचें तूप व पानवळा पात्रीत जाणें. एकूण कलम १.

गुऱ्हाळास दर फडास गुळाची ढेप १. कलम १.

मोहतर्फ व जकात व टोकरा कमावीसबाब व फुरयबाब व वनचराई आकार होईल त्यास दर सनदे रुपये २ कलम १.

किता बाजे कानूकायदे.

१ शिरपांव देशमुख व देशपांडे यांचे मागें घ्यावा कलम.

१ गांवगन्ना दर गांवास राबता महार एक महिना घ्यावा.

१ बाजारास फसकी व शेव.

१ तेलियाच्या दर घाणियास दरमाहा तेल्याचे मापें तेल वजन ८८१ एक शेर पेठ व गांवगन्ना कलम.

१ दरगांवास चांभारापासून सालिना जोडा १ कलम.

१ गांवगन्ना मेंढरांचे कळप आहेत त्यापासून दर कळपास सालिना मेंढरूं १. एकूण कलम.

The Haks of the Watan were as follows:—

1 Two Bighas of land in Inam for every Chahur of the total land in each village.

1 A tax at the rate of two per cent on the Jamabundy of every village (including revenue in cash and in kind) to be levied from the village.

1 Two per cent of the Mohotarfa, Octroi, pasturage fees, fines &c.

1 Exemptions from house-tax like the Deshmukhs and Deshpande.

1 Sirpav after the Deshmukh and Deshpande.

1 One Mhar for menial service for one month from each village.

1 Faski and Shewa levies (levies of grain and vegetables from traders in these articles) on market days.

1 One sheer of oil every month from every oil-press in the villages.

1 One pair of shoes from the Chambhars of each village.

1 One goat every year from the owner of each flock.

इनाम गांव मौजे पिंपरीबुद्रुक परगणे मजकूर दुतर्फा, खेरीज हकदार व कदीम इनामदार देखील इनाम तिजाई देह १.

पानमळे परगणे मजकुरीं आहेत त्यास पाटलास हक जो असेल त्याचप्रमाणें यास देवीत जाणें. कलम १.

१ लग्न मुहूर्तास टिळा, विडा, खोबरियाची वाटी कलम.

१ मांगाकडील गांवगन्ना येळवे कलम.

१ तांबोळियाचे दर दुकानास दर आठवडा पानें सुमारें २५.

१ वाणियाचे दर दुकानास बाजारी सुपारी १.

१ साळी व कोष्टी याचे मागास सालीना अटफळे १.

१ धनगराचे मागास सालीना घोंगडे १ कलम.

येणेंप्रमाणें कलमें बेवीस हक व इनाम व इनामगांव व बाजे कानूकायदे करून दिल्हे आहेत. याप्रमाणें याचे दुमाला करून याशी व याचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें येविशीं पत्रें ८.

[२८८] बाळगोपाळजी बिन येसाजी भोसले यासी दिल्हें वतनपत्र ऐसें जे, तुमचें चालवणें आवश्यक जाणून स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन तुह्मांस नूतन वतन कर्यात अष्टे प्रांत मिरजपैकीं देहाय बितपशील.

इ. स. १७४४-४५. खमस अर्बैन मया व अलफ. सवाल १८.

---

1 One rope from the Mangs of each village.

1 Leaves, a piece of cocoa-nut, and sandal ointment, at every marriage.

1 25 leaves every week from every shop of the leaves-seller.

1 One Beetle-nut from every Bania's shop.

1 One cloth every year from every loom of salis and one from every loom of dhangars.

1 Two Bighas of land in the village of Indapur for building a house.

1 Two percent of revenue from mango fruit, dead wood &c.

1 The usual levies on festival days, and on universaries of the death of parents.

1 One lump of Joggery from every Joggery Manufactury.

1 A village in Inam.

1 The rights of Patil in regard to levies from leaves producing gardens

(288) The Desh Chougulki Watan of 8 villages in Karyat Ashte of Prant Miraj was conferred on Balgopalji bin Yesuji Bhosle. The Huks of the Watans to be

A. D. 1744-45.

१ कसबा अष्टे, १ मौजे तांदुळवाडी, १ मौजे मालवाडी, १ मौजे कुंडलवाडी, १ मौजे बोरगणी, १ मौजे ढवळी, १ मौजे साखराळे, १ मौजे इटकीर.

एकूण देह आठ येथील देशचौगुलकीचें वतन तुह्मांस वंशपरंपरेनें अजरामऱ्हामत करून देऊन वतनास हक्क व इनाम व कानूकायदे रयतेनिसबतीनें.

गांवगन्ना जमाबंदी आकार होईल त्यास रयतेनिसबतीनें दरसनदे रुपये १। सवाप्रमाणें हक्क कलम १.

किता हक्क गांवगन्ना दरसालीना.

१ दसरियास बकरें एक.
१ रावता महार एक.
१ पक्षास लोणी व शाकभाजी.
१ सणाचे दिवशीं महारांनीं लांकडांची मोळी द्यावी कलम. एकूण ४.

तांबोळियाच्या दुकानास दररोज पानें सुमारें २५ पंचवीस कलम एक १.

बाजार भरेल ते दिवशीं हक्क.
१ बाजारांत गल्ला फरोक्त होईल त्यास फसकी.
१ वाणियाच्या दुकानास सुपारी एक व तंबाखू.
१ माळवें विकेल त्यास शेव घ्यावी कलम. एकूण ३.

चांभारानें सालीना पायपोसजोडा एक द्यावा.

तेलियाच्या घाणियास दररोज तेल ४॥ साडे चार टांक कलम १.

येणेंप्रमाणें हक्क व इनाम व कानूकायदे कलमें बारा नेमून दिलीं असेत. तरी तुह्मीं कर्यात मजकूरचे देशचौगुलकीचे वतनाची सेवा दंडकप्रमाणें करून वतनास हक्क व इनाम कानूकायदे सदरहूप्रमाणें आपले दुमाला करून घेऊन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वतन अनभवून सुखरूप राहाणें ह्मणून कार्तिक शुद्ध पंचमी छ मजकूर पत्रें ४.

---

levied from the ryots were as follows :—

1 A tax from the ryots at the rate of 1-4 for every hundred Rupees of the land revenue.

1 One goat, butter and vegetable on anniversaries of parent's death; a bundle of fuel on festivals, and one Mhar for menial service to be given every year by each village.

1 25 leaves every day from every leave-seller's shop.

1 Faski and Shewa (levies of grain and vegetables from dealers in these articles), and one beetle-nut and tobacco from every Bania's shop on every market day.

1 One pair of shoes annually from the Chambhars.

1 4½ Taks of oil from each Oil-press.

[ २८९ ] वतनपत्र जेष्ठ शुद्ध द्वितीया भानुवासर गोरखोजी बिन तुकोजी बिन कोंडाजी पाटील भापकर निंमे मोकदम व वडीलपण मौजे भानगांव परगणे कर्डे सरकार जुन्नर सुभे खुजस्ते बुनियाद यासी दिल्हें वतनपत्र ऐसें जे, तुह्मीं कसबे कोरेगांव समत मजकूर परगणे वाई येथील मुक्कामीं स्वामीसंनिध विनंति केली जे, मौजे मजकूरचे कदीम मोकदम बगोजी बिन घालोजी बिन तुकोजी कुदंडा याजवर वतनसंबंधें कसाला पडोन कर्जदार जहाला. याजबद्दल त्यानें मौजे मजकूरची निंमे मोकदमी वडीलपण आपणास विकत दिल्हें. त्याची किंमत रुपये ७७५१ सात हजार सातशें एकावन रुपये करार करून आपणाकडून घेऊन वतनाचें खरेदीपत्र आपणांस करून दिल्हें. त्याप्रमाणें मौजे मजकूरची निंमे मोकदमी व वडीलपण आपण अनभवीत आहों. महाराज स्वामीनीं खरेदीपत्र मनास आणून भोगवटियास पत्रें करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे ह्मणून विनंति करून खरेदीपत्र आणून दाखविलें.

इ. स. १७३०-३१. सलसैन मया व अलफ. रजब १३.

खरेदीखत शके १६५२ विरोधकृत नाम संवत्सरे अश्वीन वद्य त्रयोदशी रविवासर ते दिवशीं राजश्री गोरखोजी बिन तुकोजी बिन कोंडाजी पाटील भापकर मोकदम मौजे लोणी परगणे सुपे सरकार जुन्नर यासी बगोजी बिन घालोजी बिन तुकोजी पाटील कुदंडे मोकदम मौजे भानगांव परगणे कर्डे सरकार जुन्नर सुरुसन हजार ११४१ कारणें खरेदीपत्र लिहून दिलें ऐसें जे, आपणावर कसाला दिवाणाचा व पांढरी पडिला त्यामुळें कर्ज जाहलें. आपली मातबरी आणि गांवही खराब पाडिला. द्यावयास अवकाश नाहीं, दोहीं दिवाणच्या कसालियानें तंग केले. मग आपण विचार केला कीं, मौजे मजकूरची मोकदमी कुल आपली दरोबस्त आहे त्यास निंमे मोकदमी देऊन आपणांस भाऊ करावा आणि कर्ज वारावें. गांव लावावा ऐसें जाहलें. मग आपण एक दो जागा जाऊन निंमे मोकदमी विकरा घातली. ते जागा आपल्या चित्तास न आली. मग तुह्मांसी येऊन कुल हकीकत जाहीर केली, आणि तुमच्या गळां पडोन तुमचें मन मनावून मिनत माना करून तुह्मांस आपली निंमे मोकदमी वडीलपण आधीं तुमचें नांव मागोन आपलें नांव आपले खुषीनें खुष रजावंदीनें निंमे मोकदमी देखील जल, तरु, पाषाण, सहित दिधली असे. याचा महजर हल्लीं दुतर्फचे व देशमुख व देशपांडिये यांच्या ठाण्यांत तुह्मीं आह्मीं जाऊन करून देऊं. महजरास खर्च जो पडेल तो तुह्मीं देणें. आपण तुह्मांस निंमे मोकदमी वडीलपण देऊन तुह्मांपासून वतनाची किंमत रुपये नोकरर ७७५१ करून

---

(289) Half a share in the Patilki Watan of Bhangaon in Pargana Karde of Sirkar Junnar of Subhe Mujaste Buniyad, was sold for Rs. 7751 by Bagoji Kudanda to Ghor-

A. D. 1730-31.

[illegible] असेत. मिमे मोकदमीचा हक व मानपान हक व घरठाण व शेत जिरायत मळे [illegible] दिधले असेत. मानपान हक आदा व भितपशीलवार:—

मान.

१ मोकदमीचें नांव आधीं गोरखोजी पाटील मागून बंगोजी पाटील याप्रमाणें लिहावें.

१ दिवाणांत भेट गोरखोजी पाटील भापकर यांनीं ठेवावी बंगोजी पाटील यानीं न ठेवावी.

१ दिवाणांतून शिरपाव व पानें आधीं गोरखोजी पाटील यानीं घ्यावीं, मागून बंगोजी पाटील यानीं घ्यावीं.

१ पोळ्याचा बैल आधीं गोरखोजी पाटील याचा वेसींतून यावा, मागून बंगोजी पाटील याचा यावा.

१ तोरण मांगानें व गेरु महारानें आधीं गोरखोजी पाटील यांचें घरीं द्यावी, मागून बंगोजी पाटील यांचें घरीं द्यावी.

१ दिपवाळीचे वाजंत्री आधीं गोरखोजी पाटील यांचें घरीं वाजवावें, मागून बंगोजी पाटील यांचें घरीं वाजवावें.

१ कोळ्यानें पाणी आधीं गोरखोजी पाटील याचे घरीं घालावें, मागून बंगोजी पाटील याचे घरीं घालावें.

१ गणेश व गवर आधीं गोरखोजी पाटील याची वाजवीत आणावी आणि दुर्गामातेपाशीं ठेवावी. मागून बंगोजी पाटील याची वाजवीत आणून दोन्ही एकत्र करून पुढें गोरखोजी पाटील यांची, मागून बंगोजी पाटील यांची न्यावी.

१ कडकर्णे आधीं गोरखोजी पाटील, मागून बंगोजी पाटील यांचे घरीं द्यावें. एकूण ९.

१ होळीची पोळी आधीं बंगोजी पाटील याची वाजवीत आणावी; मागून गोरखोजी पाटील याची वाजवीत आणून बंगोजी पाटील याची आधीं लावून मागून गोरखोजी पाटील याची लावावी.

१ दसरियाचीं वाजंत्रें रोज दहा व गांवच्या माळ्यानें फुलें व गुरवानें चावरी आधीं बंगोजी पाटील याचे घरीं, मागून गोरखोजी पाटील याचे घरीं.

१ दसरियाची आपटियाची पूजा आधीं बंगोजी पाटील यानें करावी, मागून गोरखोजी पाटील यानें करावी.

---

khoji Bhapkar. The rights and perquisites of the share sold were as follows:—

1 All documents to be signed, first by Gorkhoji and then by Bagoji.
1 The present to Government to be made by Gorkhoji.
1 The Holi cake to be brought and presented to the Holi, first by Bagoji, and then by Gorkhoji.

१ शिराळशेट आधीं बंगोजी पाटील याचा वाजवीत आणून ठेवावा. मागून गोरखोजी पाटील याचा वाजवीत आणून दोन्हीं एक जागा करून पुढें बंगोजी पाटलाचा, मागून गोरखोजी पाटलाचा जावा.

१ टिळा विडा आधीं गांवांतील बंगोजी पाटील, मागून गोरखोजी पाटील यास द्यावा.

१ तुळशीजी पूजा कार्तिकी द्वादशीची आधीं बंगोजी पाटील याचे घरीं ब्राह्मणानें सांगावी, मागून गोरखोजी पाटील याचे घरीं सांगावी.

१ हरिजागर कार्तिक वद्य १ प्रतिपदेस आधीं बंगोजी पाटील यांनीं करावा, मागून गोरखोजी पाटील यांनीं दुसरे दिवशीं करावा.

१ महारानें मोळी आधीं बंगोजी पाटील याचे घरीं देऊन, मागून गोरखोजी पाटील याचे घरीं द्यावी. एकूण ८.

नांगर करावा तो उभयतां मोकदमास पुसोन कुळकर्णी यानें करावा कलम १.

समाईक हक्कलाजिमे शिरस्ताः—शेलपाटी दर बुडास मोकरर ८१॥ दीड मण. १ पाल-भारा दर असामीस कडबा सुमार २५. १ कापूस दर टिकियास वजन ८८५. १ हुरडा दर असामीस भारा एक. १ चांभारानें जोडे दरसाल दोन द्यावे. १ बादुक दर असामीस भारा एक. १ तेलियाच्या दर घाणियास दररोज तेल ८८८९ नवटांक. १ तांबोळियाच्या दर दुकानास दररोज पानें सुमार तेरा. १ गुऱ्हाळास दर शेतीं हक्क (१ गुळाची ढेप. १ उंसाची मोळी. १ रसाची माण. एकूण ३.) सदरहू जोशियाच्या मळ्यांत न घ्यावे वरकड जागा घ्यावे. १ बकरें दसरियाचें दर कळपास एक घ्यावें कलम. १ साळी कोष्टी व मोमीन याच्या दर मागास दरसालीं अटफळें एक. १ धनगराच्या मागास दरसाल अटफळें एक घ्यावें. १ खोबरियाच्या वाट्या. (१ मागणीची, १ फुललग्नाची, १ पाटाची एकूण ३.) १ माळ्याची शेव माळ्यानें द्यावी. १ माळ्याच्या मळ्यामध्यें धान्य पेऱ्या-खेरीज जिन्नस होईल त्यास एक वाफा द्यावा कलम. १ बाजाराची शेव उकलून घ्यावी. १ वाणियांचीं बिराडें राहतील त्याकडे वोटल वाटा शिरस्तेप्रमाणें घ्यावा. १ वाणियाच्या किराणियाचे गोणीस मोकदमास हक्क वजन पावशेर. १ मीठ व भुसाचे गोणीस शिरस्त्या-प्रमाणें मोकदमाचा हक्क. १ बाहे जमा दरसाल रुपये २५ पंचवीस घ्यावे. १ वाणियाच्या दर दुकानास दररोज एक सुपारी घ्यावी.

---

1 The Sirpav and leaves from Government to be received, first by Gorkhoji and then by Bagoji.

1 Gorkhoji to have precedence over Bagoji as regards the Pola Bullock procession, the fixing of *Toran*, the Dipwali singing, the Koli's water and the Gunesh and Gowri processions.

एकूण कलमें एकवीस उत्पन्न होईल ते निंमेनिम वांटणी करून निंमे गोरखोजी पाटील व निंमे बंगोजी पाटील याप्रमाणें घ्यावी. घरजागा बंगोजी पाटील मोकदम्याच्या वाडिया- पैकीं निंमे गोरखोजी पाटील मोकदम व निंमे बंगोजी पाटील मोकदम एकूण कलम १.

हकीम व देशमुख व देशपांडिये यांस अर्ज करून इनाम जिराइत करून घेतले तर निंमे गोरखोजी पाटील मोकदम व निंमे बंगोजी पाटील मोकदम यानीं घ्यावें कलम १.

मुंढी वसात व शिकार उभयतांनीं वांटून घ्यावी. आधीं गोरखोजी पाटील यांनीं घ्यावी, मागून बंगोजी पाटील यांनीं घ्यावी कलम १.

गांवापाशीं पेंठ नवी वसवितां ज्याच्या थळांत वस्ती होईल त्यास कटकट करावयास संबंध नाहीं. तेथील हक्क लाजिमा मानपान होईल तो उभयतांनीं निंमे निम वांटून घ्यावा कलम १.

मोकदमाचीं गुरें मरतील त्यांचीं कातडीं महारांनीं आणून उभयतां मोकदमाचीं द्यावीं. कलम १.

उभयतां मोकदमानीं आपले भाऊ भापकर व कुदंडे वजा करून बाकी असामीदार कुळें यांपासून हक्क घ्यावा कलम १.

हक्क व लाजिमे लिहिले आहेत याशिवाय जुने हक्क व लाजिमे राहिले असतील ते व नवे हक्क लाजिमे व कानू कायदे उत्पन्न होतील ते निंमे गोरखोजी पाटील भापकर व निंमे बंगोजी पाटील कुदंडे यानीं घ्यावे कलम १.

मिराशीचीं शेतें जिराईत व बागाईत जमीनः—'-।२॥- शेत नांगीचें परतणें चावर -।॥- पैकीं वांटणी बंगोजी पाटील कुदंडे. १। शेत शिवदेवळगांव बाबत जानजी कुदंडे दोरी २॥ पैकीं वांटणी वडील दोरी. -।॥- शेत रखोजी पाटील कुदंडे.( -।- मांजरखिला. -।- चिपा एकूण -।॥-. -।॥- शेत डोंगरनजीक चवरा बाबत माणकोजी पाटील कुदंडे परतण. -।॥- शेतबाबन हिवजी पाटील कुदंडे मस्यावर तें परतणें.

---

1 Bagoji Patil to have precedence over Gorkhoji in regard to the Dasara singing, the Dasara worship of the Apta plant, the Shiral-shet procession, the anointing with sandal and the present of leaves at ceremonies, the Tulsi worship, and the receipt of a bundle of fuel from the Mhar.

1 The Haks to be levied from a suburb newly created, to be shared equally by both.

1 The hides of their dead cattle to be given to them by the Mhar.

The lollowing levies to be shared equally by both among themselves:—

1 25 Bundles of Karbee from each cultivator.

1 Cotton five Sheers per field,

२ शेत बाबत तांबेरे मळ्यैकीं वजा बागायत बिघे ८११ वजा कसब माळी कोष्टी या होन ।।- शेत पाणपट्टी परसणें -।२ शेत बाबत कवडा मळ पैकीं नजिक स्मशान अवांत पैवपल. एकूण १८॥-.

बागायत मळेजमीन बिघे बितपशील:—८११ पिंपळाचा मळा, (८८ बंगोजी पाटील, ८४ विठोजी पाटील कुदंडे, ८४ रामजी कुदंडे, एकूण ८११.) ८११ मळा बाबत तांबेरे बिघे सोळा ८१२. एकूण साहा दोरिया अर्धे परतणे बत्तीस बिघे. तुह्मांस वाडा बांधावयास जागा गांवामध्यें गतकुलनिवारशी जागा पाहून देऊं कलम १.

येणेंप्रमाणें मिरास तुह्मांस करून दिली असे. निंमे मोकदमी तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें अनुभवून अजरामर करणें. यासी आपले वंशींचा कोणी व भाऊबंद कुदंडे मुजाईम आहले तरि आपण समजावूं. त्यास तुह्मांशीं बोलावयास संबंध नाहीं. यासी आम्हीं आजसारखें करूं. तरी आपणांस आपल्या कुलस्वामीची व श्री ज्ञानेश्वर स्वामीची व बेचाळीस पूर्वजांची शपथ असे. हें सत्य सत्य त्रिवाचा सत्य असे. हें खरेदीपत्र लिहिलें. सही निशाण नांगर बंगोजी पाटील कुदंडे मोकदम बिकलम सखोजी त्रिमल व रामाजी त्रिमल अबाजी जोशी कुळकर्णी मौजे मजकूर यासी साक्ष कुदंडे. विठोजी बिन संताजी पाटील व रामजी बिन गंगाजी पाटील कुदंडे मौजे मजकूर. १ शिवाजी पाटील वल्लद बंगोजी पाटील बिन धुमाजी पाटील कुदंडे मौजे मजकूर येणेंप्रमाणें खरेदीपत्र एक.

येणेंप्रमाणें खरेदीपत्र आणून दाखविलें, तें मनास आणून तुह्मांवरी स्वामी कृपाळू होऊन तुह्मांस हें वतनपत्र सादर केलें असे; तरी तुह्मीं मौजे मजकूरची निंमे मोकदमी वडीलपासून खरेदी करून खरेदीपत्र करून देऊन अनुभवीत आहां. त्याप्रमाणें वतन तुह्मांस व तुमचे

---

1 A Bundle of Jowari sars from every cultivator.

1 Two pairs of shoes from the shoe-makers every year.

1 One bundle of green stalks from every cultivator.

1 Nine Taks of oil from every oil-press every day.

1 13 leaves from each Tamboli's shop.

1 A quantity of Jaggery, a bundle of sugar-canes and a can of sugar-cane juice from every field except one belonging to a Joshi.

1 One goat on Dasara day from every herd.

1 One cloth from every loom of weavers, and one from every loom of Dhangars.

1 Pieces of Cocoa-nut at negotiation of mrrriage, at marriages, and at re-marriages.

1 Vegetables from vegetable producer.

वंशपरंपरेनें करार केलें असे. तरी तुह्मीं सदरहू वतन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून वतनाची सेवा वृंडकप्रमाणें करून सुखरूप राहणें. वतनसंबंधें तुमचे माथां शेरणी बेरीज रुपये. करार करून निंमे ऐवज हुजूर व निंमे जिल्हेकडे वसूल घेतला असे, ह्मणून जेष्ठ शुद्ध द्वितीया भानुवासर शके ७९ विभव नाम संवत्सरे पत्रें.

[ २९० ] मोकदमानी व कुळकर्णी व रयाज मौजे निरवांगी परगणे इंदापूर यांसी आज्ञा जे, मौजे मजकूरच्या पाटिलाच्या कजियामुळें हुजुरून पाटिलास मसाला केला; त्या दहशतीनें रयत परागंदा झाली ह्मणून हुजूर विदित झालें. तर तुह्मीं बेराम होऊन रयत जमा करून मौजे मजकूरची लावणी सुदामत आहे, त्याप्रमाणें करून सुखरूप राहणें. कौल असे पत्र एक.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजाज ?.

[२९१] राघोजी बिन यमाजी व सटवाजी बिन आबाजी खडके न्हावी कसबे पुणें तर्फ हवेली प्रांत मजकूर यांणीं हुजूर किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, कसबे मजकूरचे व प्रांत मजकुरपैकीं देहे ६ सहा येथील दरोबस्त न्हावीपणाचें वतन पुरातनपासून आपले वडील अनभवीत असतां काळादुकाळामुळें परागंदा होऊन किल्ले रायरी येथें जाऊन राहिले. मागें नरसोजी बिन शितोजी मगर न्हावी याचे वडील मौजे माळशिरस परगणे सुपे येथून कसबे मजकुरास येऊन न्हावीपणाचें कामकाज करूं लागले.

इ. स. १७७९-८०.
समानीन मया व अलफ.
रबिलाखर १७.

---

1 From the produce except corn grown by gardeners, the portion grown on one plot.
1 ¼ of a seer to be taken from traders for every bag of Groceries.
1 The usual levy to be made for every bag of salt and grain.
1 One beetle-nut from every trader's shop every day.
1 Both the Patils to levy the Haks from all persons excepting the members of their families.

The Sale was sanctioned by the Raja and a Nazar was levied.

(290) The Patil of Nirwangi Pargana Indapur was fined in connection with a dispute regarding the Patilki Watan. The ryots became alarmed at this, and left the village. A letter was sent to the Patil and Kulkarni and the ryots, assuring them of their safety, and directing the Patil and Kulkarni to collect the ryots and cultivate the land.

A. D. 1752-53.

(291) The barber's Watan of kasba Poona, originally belonged to the Khadke famiy. The family having left the village in times of scarcity, the duties of the Watan

A. D. 1779-80.

त्यावर कित्येका दिवसांनीं आपले वडील कसबेमजकुरास आले. त्याणीं पूर्ववतप्रमाणें वतन अनभवावें, परंतु पदरीं मातबरी आणि वराणियांत पुरुषबळही नाहीं, वतन मेहनतीचें, यामुळें आपले वडिलांनीं व मगराचे वडिलांनीं वतन निंमेनिम बराबरीनें चालविलें. त्यानंतर कांहींका दिवसांनीं जाचक नाईकवाडी कसबे मजकूर याचे बिरादरीत विठोजी बिन हसाजी अढाव न्हावी सुपेकर याचा वडील चाकरीस होता. याणें गंगातीरीं दादाजी कोंडदेव सुभा प्रांत मजकूर यांचें क्षौर केलें. तेसमयीं ते कांहीं पैका देऊं लागले. सबब अढावानें मागणें मागितलें कीं, मजला कांहीं वतन करून दिल्हें पाहिजे. त्यावरून दादाजी कोंडदेव यांणीं कसबे मजकुरीं अढावास आणून कामकाज करावयास व बलुतें घ्यावयास सांगितलें. तेव्हां आपला व मगराचा व अढावाचा कजिया लागोन मनसुबी दादाजी कोंडदेव यापाशीं पडली. त्यांणीं मनास आणून सदरहु वतन तिहीं ठाई करून दिल्हें. बितपशील:—

कसबे मजकूर येथील न्हावीपणाचें दरोबस्त वतन मेहेतरकी मानपानसुद्धां तिहीं ठाई तीन तक्सिमा तिघांजणानीं अनभवून उत्पन्न होईल तें तिघांनीं अनभवावें. कलम १.

प्रांत मजकूरपैकीं देहे ६ याची वांटणी येणेंप्रमाणें:—

२ लवके याजकडे तर्फ हवेलीपैकीं (१ मौजे वानवडी, १ मौजे पर्वती, एकूण २.)

२ मगराकडे. (१ मौजे हिंगणेबुदरुख कर्यात मावळ, १ मौजे वडगांव तर्फ हवेली, एकूण २.)

२ अढाव याजकडे. (१ मौजे भावबडे तर्फ हवेली, १ मौजे बावधनबुद्रुक कर्यात मावळ, एकूण २.)

एकूण कसबे मजकूर व देहे सहा सदरीलप्रमाणें अनभवावयासी सांगितलें, परंतु पत्रें हालीं नाहींत. त्याप्रमाणें न्हावीपणाचे वतनाचा भोगवटा सदरील तिघां जणाकडे अद्यापीवर चालत आहे. परंतु भोगवटियासी पत्रेंही असावीं याजकरितां महाराजांनीं कृपाळू होऊन भोगवटियासी पत्रें करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे म्हणोन विदित करून कसबे मजकुराहून देशमुख व देशपांडिये व मोकदमांनी व शेटे महाजन यांची सड आणून दाखविली. त्याजवरून मनास आणितां कसबे मजकूरचे न्हावीपणाची तिसरी तक्सीम मानपानसुद्धां व मौजे वानवडी व मौजे पर्वती हे दोन गांव येथील न्हावीपणाचें वतन याचें याजकडे अद्यापीही चालत आहे, ऐसें जाणोन स्वामी याजवरी कृपाळू होऊन यासी हुजुरून याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वतन करार केलें असे. तरी तुह्मीं कसबे मजकूरचें न्हावीपणाचें

---

were performed by the Magar family which came from Malshiras in Pargana Supa. The Watan was since then divided between the two families. The Watan was subsequently granted by Dadaji Kondeva Subha of Prant Poona to Hasaji Adhav, in consideration of the latter having shaved him on the banks of the Ganges. The other two families protested

वतन तिसरी तक्षीम मेहेतरकी मानपानसुद्धां व सदरील दोन गांवचें पुरातनपासून याजकडे चालत आहे, त्याप्रमाणें त्यासी व त्याचे वंशपरंपरेनें वतन चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें पत्र भोगवटियासी याजवळ परतोन देणें. येविशीं चिटणिशी पत्रें:—

१ मोकदमानी व शेटे महाजन व माळी मेहेतर कसबे पुणें व मौजे वानवडी व मौजे पर्वती तर्फ हवेली प्रांत मजकूर. १ मुख्य नांवाचें पत्र. १ राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी प्रांत पुणें. १ देशमुख व देशपांडे परगणे मजकूर. १ राजश्री माधवराव पंडित प्रधान यास पत्रें जे, न्हावी मजकुरास भोगवटियास तुह्मीं आपलीं पत्रें करून देणें एकूण ५.

---

## न्यायखातें.

[ २९२ ] अभयपत्र दिंमत महमद वगैरे पटवेकरी यांस जे, तुह्मीं किल्ले सातारचे मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, आपल्यामध्यें व जंगमामध्यें उदिमाचा कज्या लागला होता, त्याच्या निवाड्याबद्दल पटवेकर व जंगम पैठणीथळास गेले होते. तेथील देशमुख व देशपांडे व महाजन चौधरी व मोकदम व कांसार व मण्यार व समस्त महास्थळिक लोक यांच्या भेटी घेतल्या, आपआपले करीने सांगितले बितपशील :—

इ. स. १७२४-२५.
खमस अशरीन मया व अलफ.
रमजान २१.

जंगमानीं सांगितलें कीं, सळै आपली रेशमी काम आपलें आहे. पटवेगार याणीं सांगितलें कीं, सळै आपली रेशमी कामकाज जें करणें तें पटवेकर करतात, सालाबाद पूर्वापार चालत आलें आहे, तेणेंप्रमाणें आपण करीत असों. ऐसे करीनें पैठणी थळिकास सांगितलें, त्यांणीं थळिकानीं हरदोजणांस सांगितलें कीं, समस्त सभा करतों, दोघेजण सभेस येणें. जें सांगणें तें सांगोन त्यावरी थळिकांनीं सभा केली. हरदोजणास बलावूं पाठविलें. त्यास पटवेकर सभेस हजर आले, जंगम गैरहजर झाले. त्यांची थळिकांनीं चार दिवस वाट पाहिली. जंगम हाजीर

---

and the result was that Dadoji divided the Watan equally among the three families. A Sanad confirming the Watan was now granted.

(292) A dispute arose between the Patwekaries (manufacturers of silken threads &c.) and Jangams as to the privilege to work in silk. They went to Paithan where the village community convened a meeting to consider the question. The Jangams however failed to attend. The meeting decided that the prac-

A. D. 1724-25.

झालेच नाहीं; त्यावरी थळिकांनीं समस्त महाजनाऊ जेजूरी यांस पत्र लिहून दिलें आहे जे, पैठणी चाली परंपरा रेशमीकाम (फाटलें आहे.) पटवेकरांनीं करावीं, जंगमास संबंध नाहीं. सुती काम कटदोरे व सूत वगैरे जितकें पडेल तें जंगमांनीं करावें ऐशी चाली आहे, ह्मणून थळींचें पत्र छ १२ जमादिलाखर सन सलासचें आहे, तें स्वामींनीं मनास आणून पैठणीचे चालीप्रमाणें हरदोजण वंशपरंपरेनें वर्तणूक करीत ऐसें केलें पाहिजे ह्मणून विदित केलें व थळपत्र आणून दाखविलें. त्यावरून स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन हें तुह्मांस अभयपत्र सादर केलें असे; तरी तुह्मीं पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें रेशमी कामकाज असेल तें करीत जाणें. तुमच्या रेशमी कामास व सळैस जंगमास संबंध नाहीं. जंगमांनीं सुती काम असेल तें करावें. येणेंप्रमाणें अभयपत्र दिल्हें.

[ २९३ ] राजश्री बाजीराव प्रधान यांस पत्र जे, सुभानजी निंबाळकर तुळाजी गाडेकर यांचा चोपडजचे पाटिलकीचा कज्या लागला आहे याचा इनसाफ करावा लागतो याबद्दल परगणे सुपें येथील देशमुख देशपांडे व मोकदम देहाय व बाराबलुते चोपडज व वाकीव परगणे पुणें येथील देशमुख देशपांडे व चोपडजचे गिर्दनवाई गावींचे गावींच मोकदम हुजूर आणविले आहेत. तुह्मींही ताकीद करून ८ रोजांत हुजूर हजीर होत असें करणें.

इ. स. १७२५-२६.
सित अशरीन मया व अलफ.
मोहोरम ११.

[ २९४ ] राजश्री आबाजी बिन शंकराजी राजे महाडीक यासी दिल्हें वृत्तीपत्र ऐसी जे, सौभाग्यवति मातोश्री भवानीबाई महाडीक यासी तर्फ तारळे येथील वतन सरदेशमुखी व नाडगौंडा व इनाम कसबे दरोबस्त वगैरे देहे तर्फ मजकूर आपण दिल्हे होते. त्यास राजश्री शंकराजी राजे महाडीक देहावसान पावले. भवानीबाई याणीं सहगमन केलें. ते समयीं दुर्गोजी महाडीक जेष्ठ पुत्र यासी आपणापासून वारंवार द्रव्यांश विशेषात्कारें पावला असोन अमर्यादेनें वर्तोन

इ. स. १७२८-२९.
तिसा अशरीन मया व अलफ.
जमादिलाखर १६.

---

tice was for the Jangams to work in cotton and for the Pátvekaries to work in silk, and gave a document to that effect to the Patwekaries. The Patwekaries now prayed the Raja to confirm the decision. Their prayer was granted.

(293) Bajirao Pradhán was directed to send within 8 days, certain Deshmukhs, Deshpahdes and Patils for the settlement of a dispute regarding a Patilki Watan in Prant Poona.

A. D. 1725-26.

(294) On the death of Shankarji Raje Mahadik, his wife Bhavanibai burnt herself on his pyre. Before herself emolution she asked the Raja to continue her Watans

A. D. 1728-29.

विभक्त आहे. अबाजी महाडीक यासी कांहीं पावलें नाहीं. तरी सदरहू वतन इनामें कुली यास देऊन यांचें चालविलें पाहिजे असें बोलोन स्वामीचे हातें दिल्हे. त्यास प्रस्तुत सर्व सभेच्या मतें ज्येष्ठ पुत्रास यापैकीं कांहीं द्यावें ऐसा निश्चय जाहला. त्यावरून सदरहू वतनें व इनामाचा विभाग करून तुह्मांस विभाग करून दिला आहे तितपशील:—

वतन सरदेशमुखी व नाडगौंडकी देहाय. १ कसबा तारळें, १ मौजे बेपोशी, १ मौजे तोडोसी, १ मौजे वजरोसी, १ मौजे मरळोसी, १ मौजे कडवेखुर्द, १ मौजे घोट, एकूण ७.

खालसा व हुजूर वसुली इनाम देहे. १ मौजे बेपोशी, १ मौजे मरळोसी, एकूण २. इनाम पट्टी देशमुख व देशपांडे तर्फ मजकूर रुपये १०८.

इनाम दुतर्फी. १ कसबा तारळे दुतर्फा देखील इनाम तिजाई कुलबाब, कुलकानू व जकात तर्फ मजकूर. ३ दुतर्फा देखील इनाम तिजाई दिल्हा कुलबाब कुलकानू. (१ मौजे घोट, १ मौजे तोडोसी, १ मौजे कडवेखुर्द) एकूण ४. धनगरवाडा वस्ती तर्फ मजकूर यांजकडून सरदेशमुखी व नारगौंडकीचा हक होईल त्यापैकीं निंमे -॥- कित्ता १.

येणेंप्रमाणें तुह्मांस व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें दिल्हें असे. तरी तुह्मीं सदरहूप्रमाणें अनुभवून सुखरूप राहणें येविशीं पत्रें, पौष बहुल द्वितीया इंदुवासर मुक्काम पाली. १ राजश्री आबाजी महाडीक याचे नांवें वृत्तीपत्र, १ राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी प्रांत कऱ्हाड, १ देशमुख व देशपांडे तर्फ तारळें, १ मोकदमानी देहाय सरदेशमुखी व नाडगौंडा, २ खालसा व हुजूर वसुली देहे (१ मौजे बेपोसी, १ मौजे मरळोसी.) १ कसबा तारळे दुतर्फा दिला तिजाई, ३ दुतर्फा दिल्हा तिजाई (१ कडवेखुर्द, १ तोडोशी, १ घोट.) १ इनामपट्टी देशमुख देशपांडे १०८, १ धनगरवस्ती वाडा तर्फ तारळें, एकूण १२.

[२९५) कित्ता वतनपत्रें चिटणिशी ज्येष्ठ बहुल त्रयोदशी सौम्यवासर वतनपत्रें बनाम

इ. स. १७४४-४५.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
रबिलाबल २९.

मलकाण्णा बिन बाळशेट व नागापा बिन बाळशेट व चेनापा बिन महादशेट कोरे शेट कसबे तासगांव कर्यात मजकूर प्रांत मिरज यांस दिल्हें वतनपत्र ऐसी जे, तुह्मांशीं व गंगाण्णा बिन सांतशेट

---

to her younger son Abaji, as elder son treated her with disrespect and was living separate from her. After her death, the question as to the continuance of the Watans having now come up before the Raja. it was directed with the advice of the council to give a portion to the elder son. The rest was continued to the younger son.

(295) There was a dispute regarding the Shete Watan of Tasgaon

A. D. 1744-45.

in Prant Miraj between Malkanna and others on the one side, and Siva-Ganganna and others on the other. An inquiry was made in the matter by Khandoji Jagthap, Thanedar of

व संगापा बिन लिंगशेट महाजन कसबे मजकूर यांस कसबे मजकूरचे [illegible] [illegible]
लागला होता. त्यास हरद् जणांचा इनसाफ राजश्री खंडोजी जगताप ठाणेदार कसबे मजकूर
यार्णी मनास आणून मौजे ब्रह्मनाळ येथें श्री कृष्णेची क्रिया नेमून दिल्ही. क्रियेस
गंगाण्णा व संगापा खोटे झाले. त्या सदरहु क्रियेस गैररजावंद मौजे वाडी प्रांत मजकूर
येथील मुक्कामीं गंगाण्णा व संगापा हुजूर येऊन फिर्याद जाले. त्यावरून तुह्मांस तलब
करून हुजूर आणिले आणि कसबे जत प्रांत विजापूर येथें थळास पाठविलें. तेथील
गोतानीं तुह्मां दोघां वादियांच्या तकरिरा लिहून घेऊन कसबे मजकूरचे गोताची सब
आणविली, यास गंगाण्णा बिन सांतशेट व संगापा बिन लिंगशेट हे दोघेजण गोताचे सबेस
रजावंद न होऊन किल्ले सातारियाचे मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, पुन्हा श्रीकृष्णेची
क्रिया नियत करून आपणांस नेमून द्यावी; ज्यास कसबे मजकूरचें गोत श्रींतून हातीं
धरून बाहेर काढील, नियत पावेतों दिव्यास उतरेल तो खरा. त्यावरून हरद् जण महाजन-
मजकुरांस व तुह्मांस जामीन घेऊन कसबे मजकूरचे देशमुख व देशपांडे व बारा बलुते हुजूर
आणून पुरसीस केली. त्याणीं तुमचे वडील शेटेपण करीत आले ह्मणून साक्ष दिली. त्याजवरी
दश रात्रींची नियत करून तुह्मां हरद् जण वादियांस श्रीचें स्थळ संगममाहुली येथें नेमून
देऊन महादजी बिन (जागा कोरी आहे.) पाटील मुतालिक मौजे खेड तर्फ वंदन यांसी आज्ञापत्र
देऊन बराबरी सूर्याजी बिन नरसोजी भणगा हुजरे व संताजी काळ्या दिंमत राजश्री श्रीनिवास
पंडित प्रतिनिधि व अंताजी कृष्ण हवालदार संमत कोरेगांव व निंब या तिघांस देऊन
पाठविलें. त्याणीं श्रींत उभे करून कसबे मजकूरच्या गोतास बोलिले जे, क्रियापुरःस्कर खरा
असेल त्यास हातीं धरून काढणें. त्यावरून त्यांनीं तुह्मांस हे आपले गांवचे शेटे खरे असें
बोलून हातीं धरून काढलें. त्याउपरीं तुह्मांस व गोतास हुजूरचीं माणसें येऊन रक्षण केलें.

---

Kasbe Tasgaon, and the parties were directed to pass through certain ordeal at Brahmnál on the banks of the Krishna. Siwa-Ganganna and others failed at the ordeal. Being dissatisfied with the ordeal, they applied to the Huzur. The other parties were then called and the inquiry of the case was entrusted to the villagers of Kasba Jat in Pargana Bijapur. The villages took down the statements of the parties, and called evidence of the caste people. Ganganna and others then came to the Huzur and expressed their willingness to abide by the decision of their caste people and prayed for an ordeal at the river Krishna. Securities were taken from all. The Deshmukh, the Deshpande and Balutas were called and examined. They stated that the Shete Watan belonged to Malkanna. Malkanna was then sent to the river Krishna at Mahuli in charge of some Government Officers. They made the parties to enter the river, and asked the caste-people to get out of water, whoever might be the real

दिव्यास उतरलेस यामुळें तुह्मीं कसबे मजकूरचे शेटेपणास खरे जालेस. गंगाण्णा व संगाप्पा हे दोघेजण खोटे जाले. त्यास कसबा मजकूरच्या शेटेपणाशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं ऐसें जालें. त्यावरून हुजुरून गंगाण्णा बिन सांतशेट व संगापा बिन लिंगशेट महाजन कसबे मजकूर यांस आज्ञा केली कीं, तुह्मीं शेटेपणास भांडत होता त्यास दिव्यामुळें खोटे जाहलेस. याउपरी मल्काण्णा व नागापा व चेनापा व कोरेशेट कसबे मजकूर यांस इजीतखत लिहून देणें. त्यावरून त्यांनीं आपलें खुष रंजावंदीनें तुह्मांस इजीतखत लिहून दिल्हें. कसबे मजकूरचें शेटेपणाचें वतन पुरातन तुमचें खरें; तुमचे वडील पिढी दरपिढी वतन अनुभवीत आले, असें जाणून स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन कसबे मजकूरचें शेटेपण तुमचें पूर्ववतप्रमाणें तुमचे दुमाला करून वतनपत्र करून दिल्हें असे. तरी तुह्मीं कसबे मजकूरचें शेटेपणाचें आपलें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवीत जाणें. शेटेपणाचें हक, लाजिमे, पानमान, तश्रीफ, इनामगाळ, कानूकायदे सुदामत चालत आले असतील त्याप्रमाणें आपले वंशपरंपरेनें वृत्ति अनुभवून उपभोग घेणें. वतनसंबंधें तुमचे माथां शेरणी, स्वराज्य व मोंगलाई दुतर्फा रुपये ५०० पांचशें करार केले त्याचा वसूल निंमे हुजूर व निंमे जिल्हेकडे देऊन सुखरूप राहणें येविशीं पत्रें:—

१ मुख्य पत्र, १ मोकदम कसबे मजकूर, १ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी, १ देशमूख व देशपांडे, १ खंडोजी जगताप, एकूण ५.

[ २९६ ] येसाजी बिन शहाजी बिन विसाजी व शिवजी बिन विसाजी कवे भोसले निंमे मोकदम मौजे मावडी तर्फ कऱ्हेपठार प्रांत पुणें यासी दिल्हें वतनपत्र ऐसी जे, तुह्मीं शाहूनगर किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसंनिध विनंति केली जे, मौजे मजकूरची मुकादमी दरोबस्त वतन आपलें आहे. त्यास आपले वडील चाकरीमुळें गांव सोडून मोगलाईत गेले. मागें गावीं आपलें कोणी नव्हतें. जगताप बळावून मुकादमी खातात, आपणांस वतन लागों देत नाहींत, त्यास महाराज स्वामींनीं जगताप यांस हुजूर आणून इनसाफ केला पाहिजे ह्मणून विनंति केली, त्यावरून गंगाजी बिन बहिरजी बिन तुकोजी जगताप व मौजे मजकूर समाकूळ

इ. स. १७४१-४२.
इसने अर्बैन मया व अलफ.
मोहोरम २०.

---

owner of the Watan. The caste people took Malkanna out as the Shete Malkanna and his people were then kept at Mahuli, and guarded for 10 days. No harm came to them during that period, and they were consequently declared successful. Sanad was thereupon issued affirming their right to the Watan and a Nazar of Rs. 500 was imposed.

(296) For the adjudication of a dispute relating to the Patilki Watan of Mawdi, Panch were called. They consisted of 15 men from the village Chougula, Thal-

A. D. 1741-42.

पांढरी व बलुते व भोवरगांवींचे मुकादम हुजूर आणून गोविंदराव शितोळे देशमुख व विठ्ठो विठ्ठल देशपांडे परगणे मजकूर याचे विद्यमानें तुह्मां हरदू जणाचे कजिये मनास आणून राजीनामे वर्तावयाचे जामीन घेऊन मौजे मजकूरची समाकूळची समाकूळ पांढरी व भोवरगांव मोकदम मौजे मजकूरची समाकुळ पांढरी.—

बाबाजी बिन चांगोजी चाचर चौगुला १, मानाजी बिन लखमोजी गायकवाड चौगुला १, रत्नोजी बिन अमणाजी भोळा थळकरी १, सटवाजी बिन माणकोजी पाडव न्हावी १, धोंडजी बिन विठोजी पंडित सोनार १, हैबतजी बिन जोगोजी पाडव गुरव १, माहार गायकवाड (एक सुभाना बिन मलनाक महार, बेलनाक बिन मागूनाक महार एकूण २.

सटवोजी बिन संभोजी पांडा सुतार १, सुभानजी बिन विरोजी पऱ्हाळे लोहार १, कुसाजी बिन रखमाजी परीट १, सेटियाजी बिन माणकोजी कणेकर कुंभार १, रावो महादेव बाघ जोशी मौजे मजकूर १, तुळाजी बिन मोरोजी पोट्या चांभार १, महादजी बिन सोनजी राउत मांग १.

भोवरगांवींचे:—खानाजी बिन सखोजी पाटील रानगा मौजे जवळ अर्जुन तर्फ कऱ्हेपठार, माणकोजी बिन गणोजी तावरे पाटील मौजे अंबिबुद्रुख परगणे सुपे १.

येणेंप्रमाणें हुजूर आणून यांचे माथा सत्य घालून देशमुख व देशपांडे यांचे रुबरू प्रथकाकारें पुरशीस केली. त्याणीं आपलें सत्य स्मरोन सांगितलें जे, मौजे मजकूरची मोकदमी पूर्वी लावे भोसले याची होती ते चाकरीमुळें गांव सोडून गेले. त्यामागें त्याच्या सात डोया गांवावरी आले नाहीं. मागें जगताप याच्या सात डोया मोकदमी करीत आहेत. ऐशी साक्ष अवघ्यांनीं दिलियावरून देशमुख व देशपांडे (पुढें फाटलें आहे.) आहेत यास आज्ञा केली जे, भोसले व जगताप याची समजाविशी करून देणें. त्यावरून त्यांणीं तुमची व जगताप याची समाजाविशी करून निंमे मोकदमी वडीलपण तुह्मांस व निंमे मोकदमी धाकुटेपण जगताप यास देऊन नांव नागर तुह्मांकडे व मागेंची होळी आधीं तुह्मीं बांधावी, तुह्मांमागें जगताप यांणीं बांधावी; वरकड पानमान, कानूकायदे, हक, इनाम सुदामत शिरस्ता असेल त्यापैकीं अर्धी वडीलपणें निंमे तुह्मीं घ्यावें, निंमे धाकुटेपणें जगताप याणीं घ्यावें. याप्रमाणें समजाविशी करून तुमचा राजीनामा जगताप व जगताप याचा राजीनामा तुह्मांस देऊन

---

kara, carpenter, blacksmith, washerman, shoe-maker, Mhar, &c. and some men from other villages and the Deshmukh and the Deshpande. It appeared from the evidence of these men that the Watan originally belonged to the Bhosle family, that the family was absent from the village for 7 generations and that during that period the Watan was enjoyed by the Jagtap family. The Deshmukhs and the Deshpande were thereupon

समजावयाशी याप्रमाणें रुबरूज करून तुम्हांस हें वेतनपत्र सादर केलें असे. तरी तुम्हीं मौजे मजकूरची मोकदमी वडीलपण आपले हुमाला करून घेऊन नांव नांगर तुम्हीं करणें व होळीची पोळी आधीं तुम्हीं बांधणें, तुम्हांमागें जगताप बांधतील. बरकड कानूकायदे, पानमान व हक्क इनाम सुदामत असेल त्यापैकीं निंमे वडीलपण आधीं तुम्हीं घेणें तुमचे मागें धाकुटपण निंमे जगताप याणीं घ्यावें. येणेंप्रमाणें तुम्हीं पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें निंमे मोकदमीचें वतन अनुभवून सुखरूप राहणें. या वतनसंबंधें तुमचे माथां शेरणी व स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा रुपये १००० करार केले असत. याचा वसूल देऊन हुजत घेणें. येविशीं पत्र. शके १६८ दुर्मती नाम संवत्सरे फाल्गून वद्य सप्तमी सौम्यवासर सन इसन्ने अर्बैन मया. छ चिटणीशी पत्रें.

१ वतन पत्र, १ देशमूख व देशपांडे, १ देशाधिकारी, १ राजश्री बाळाजी पंडित प्रधान, एकूण ४.

[ २९७ ] वतनपत्र देवजी बिन दादाजी दांगट मोकदम मौजे वडगांवबुद्रुक तर्फ हवेली कर्यात मावळ प्रांत मावळे यासी दिल्हें वतनपत्र ऐसी जे, तूं शाहूनगरनजीक किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, सन समान सलासीन मया व अलफ या सालीं महाराज उंबरेजीचे मुक्कामीं असतां आपण येऊन वर्तमान जाहीर केलें जे, मौजे मजकूरचे मुकादमचें वतन पुरातन आपले आजे पणजे खात आले. त्याजवरी काळदुकाळामुळें देशावरी गेलों. मागें गांवावरी शंकराजी बिन माणकोजी दांगट याचे वडील शिवाजी दांगट होता. आडनावांचा दांगट म्हणून मोकदमी करूं लागला; त्याजपासोन मोकदमी त्याजकडे चालों लागली. हल्लीं त्याचा शंकराजी बिन माणकोजी दांगट मोकदमी अनुभवितो. आपण गांवावरी आलों, आपल्यास पाटिलकीशीं दाखल होऊं देत नाहीं. तरी महाराजानीं शंकराजीस हुजूर आणून—हक्क इनसाफ केला पाहिजे म्हणून त्यावरून महाराजानीं त्यास तलब करून हुजूर

इ. स. १७४१-४२.
इसन्ने अर्बैन मया व अलफ.
सफर १.

---

directed to settle the matter amicably between the parties. This was done and the Watan was divided equally between two families.

(297) Deoji bin Dadaji Daugat represented to the Huzur that the Patilki Watan of Wadgaon Bk. in Tarf Haveli belonged to his family, and that during his ancestor's absence from the village on account of famine, Shankarji Dangat's ancestors had usurped the Watan, and prayed that it might be restored to him. Shankaraji and Haraji were then called to the Huzur and they and the complainant were asked to put in their statement of the case.

A. D. 1741-42.

आणवून त्यास व आपल्यास आज्ञा केली कीं, तुह्मीं दोघे वादी आपले करीने काय असतील तें लिहून देणें. त्यावरून शंकाजीनें व आपण आपलाले करीने लिहून दिले बितपशील:—

देवजी बिन दादाजी पाटील दांगट मौजे वडगांवबुद्रुक तर्फ कर्यात मावळ हवेली सेवेशीं तकरीर लिहून दिल्ही ऐसी जे, आपला पणजा परसो पाटील याणें पाटिलकी केली परंतु किती दिवस केली, कोणाचे कारकीर्दीस, हें आपल्यास ठाऊक नाहीं. त्याचा लेंक वडील दावजी पाटील, धाकटा देको पाटील यांणीं केली त्याचेही कारकीर्दी ठावकी नाहीं. आपला बाप लहान होता त्याचें लग्न गांवावरी केलें. त्याउपरी काळादुकाळाकरितां देशावरी गेले. तिकडेस आपला आजा व बाप मेला. आपण थोर जाहलों आगे गांवावरी आलों तों संभाजी दांगट पाटिलकी करीत होता. त्याणें तूं आमचा भाऊ, आह्मीं तुह्मे भाऊ ऐसें मजला बोलावून आपल्यास पाटिलकीच्या वाड्यांत जागा दिला. एक दो सणाच्या मोळ्या महाराकडून देविल्या. उकतें शेत दिल्हें. त्याउपरी त्याची आपली कटकट जाहली. शंकाजीचा दाखला पाहतां आपले आजे व बाप देशावरी गेले. मागें पठाराचा [illegible]रण करून गांवावरी येऊन राहिला. त्याणें दिवाणाचा कौल घेऊन पाटिलकी करूं लागला; यावरी त्या गांवांतून बाहेर काढावयास शंकाजीचा पणजा शिवजी दांगट पांढरीनें आणून त्यास बोलिले कीं, तूं आड-नांवाचा दांगट आहेस. पाटिलकीचा कारभार कर. तो कारभार करूं लागला. पठाराबाहेर घातला. त्यापासोन हे पाटिलकी करतात. आपल्यास तो वडिलांनीं सांगितलें कीं, आपलें वतन. त्यावरून गांवावरी आलों. परंतु जापल्यास लागों देत नाहीं, ऐसेयास हेत करीत आपण गोतमुखें खरी करून देईन. न देईन तर खोटा पांढर व भोवरगांव श्रीकृष्णेंत शिरोन सांगतील, त्यास आपण राजी असा ऐशी तकरीरनामा लिहून दिला.

शंकराजी पाटील बिन माणकोजी पाटील व हरजी बिन संभाजी पाटील दांगट मौजे वड-गांवबुद्रुक तर्फ हवेली कर्यात मावळ सेवेशी तकरीर लिहून दिल्ही ऐसी जे, आपला वडि-लापासोन पुस्त दरपुस्त मोकदमी आपली आहे. आपला पूर्वज भाऊ पाटील बेदरचे पादशा-हाचे वेळेस पाटिलकी करीत होता. त्याचा लेंक शिवजी त्याणीं केली. त्यास शिवजी लहान

---

Deoji stated in writing as follows:—

His great grand-father held the office of Patil as also his grand-father, during a famine, the latter left the village and died elsewhere. His son (Deoji's father) also did not return to the village. Deoji had heard from his father that the Watan in question belonged to his family, and on his father's death he came to the village. During the absence of Deoji's ancestors, a man named Pathara Charam commenced to officiate as Patil with the permission of Government officers. But the villagers displaced and brought in one Shankraji bearing the surname of Deoji's family.

होता. गांवात पठारे चारण करून होते ते कारभारास दखलगिरी करून पाटिलकीचें काम-काज करूं लागले. हा लहान यासी रेटाई करून पाटील आपण ह्मणवून शिवजीशीं वाद सांगों लागले; त्यास शिवजी लहान होता तोंपर्यंत पठारे याणीं दहा पांच वर्षें पाटिलकी केली. शिवजी थोर जाहलियावरी पठारे यांस वाद सांगून पठारे गांवांतून काढून राजश्री दादाजी कोंडदेव याचे कारकीर्दीस पाटिलकी केली. त्याचा लेंक सुर्याजी याणें कैलासवासी थोरले महाराज यांचे वेळेस पाटिलकी केली, त्याचा लेंक संभाजी याणें पाटिलकी केली. त्याचा लेंक माणकोजी याणें पाटिलकी केली, त्याचा लेंक हल्लीं आपण पाटिलकी करितों, अर्थात आपली पाटिलकी खरी आहे. देवजी दांगट आपल्याशीं भांडतो त्यास हा आपला कांहीं नव्हे यास पाटिलकीशीं निसबत नाहीं. याचा दाखला गांवांत नाहीं. येणेंप्रमाणें करीना देशमुख व देशपांडे व समाकूळ पांडर व भोवरगांवचे मुलें गाव हा करीना करून देऊन. ऐसे शंकाजी दांगट याणें आपला तपशीलवार करीना लिहून तकरीरनामा महाराजांचे सेवेशीं लिहून दिला.

येणेंप्रमाणें आह्मीं हरदू वादी याणीं तकरीरा लिहून दिल्या. त्यावरी महाराजांनीं आज्ञा केली कीं, तुह्मीं हरदू जण वादे पांडरीस राजी आहां कीं काय? त्यास आपण हरदू जण बोलिलों कीं, पांडरेस राजी असों; त्यावरून महाराजांनीं राजश्री पंतसचीव यांसी आज्ञा केली कीं, मौजे मजकूरचे बलुते आणविणें. त्यावरून कांहीं बलुते आणवून हुजूर दाखल केले. त्याउपरी बलुते यांस महाराजांनीं पुरसीस केली तेव्हां बलुते याणीं तकरीरा केल्या तपशील.- -

किस्त असामी.--१ बुद माळी, १ शिवजी बिन कोंडजी न्हावी, १ बनाजी बिन नरसोजी परीट, १ रायनाक बिन सायनाक महार, १ हमा बिन चांदनाक महार. एकूण ५. मजकूर

---

This man Shankraji then began to officiate and the Watan has since been continued in his and his descendant's possession. When Devji came to the village, Shankraji in order to conciliate him called him his Bhau-band, gave him a field and a part of his house. The whole Watan however belonged to himself (Devji) and he added that he would prove this by the evidence of the residents of that and the surrounding villages. He farther expressed his willingness to abide by any statement the villagers might make standing in a sacred river.

Shankraji and Hiroji stated as follows:—

The Watan belonged to their family. Their ancestor Bhau Patil officiated as Patil during the rule of Bedar Emperor, and he was on his death succeeded by his son (Shiv Patil). Taking advantage of Shiv's minority Pathara, a Charan, usurped the Watan, but was soon afterwards turned

पांचजणांनीं तकरीर लिहून दिल्ही कीं, कदीम पाटिलकी सयद बुरान करीत होता तो दुकाळामुळें गेला. त्यावरी दावजी दांगट थळकरी कुणबी गांवींचा, त्यानें सात वर्षें पाटिलकी जमेदाराचे आज्ञेनें केली. त्यानंतर सोरट पडलें. दावजी उठोन देशावरी गेला. त्यावर हसाजी पठारा चारण करून गांवीं होता त्याणें दोन वर्षें पाटिलकीचा कारभार केला. त्यास तूं कोण, पाटिलकी दांगटाची, ह्मणून गांवांतून काढल्यावरी शिवजी दांगट मौजे शिवणी येथील बहुलीस होता तो गांवावरी येऊन दांगटाची पाटिलकी ह्मणून करूं लागला. त्याचा लेंक सूर्याजी, त्याचे पुत्र महाजण, वडील संभाजी त्याणें पाटिलकी केली. त्याचे माणकोजी व हरजी याणें केली. त्याचा शंकराजी हल्लीं करितो. इतुकें आपणास ठाऊक असे या पांचांनीं लिहून दिल्हें.

कित्ता असामी:—१ निंबाजी बिन जानोजी सुतार, १ वडजा बिन बहिरा चांभार, एकूण २. या दोघांनीं तकरीर लिहून दिली कीं, शंकाजी दांगट याचे बाप आजे यानीं पाटिलकी आज तीन डोया करीत आले, हें आपले वडिलांनीं आपणांस सांगितलें आहे. हल्लीं शंकाजी दांगट व हरजी दांगट पाटिलकी करितात इतकें आपणांस ठाऊक आहे. देवजीच्या वडिलांनीं अगर देवजी दांगटानें पाटिलकी केली हें आपल्यास ठाउकें नाहीं. अलीकडे दहा वर्षें हे दोघे भांडतात ऐसें या दोघांनीं लिहून दिल्हीं.

येणेंप्रमाणें बलुते याणीं लिहून दिल्हें. यावरी मजालसीस महाराजांनीं कयास केला कीं. देवजीच्या वडिलाच्या पूर्वीचा दाखला आहे व शिवजीपासोन शंकाजीतागाईत पांच डोया पाटिलकी करीत आला. याबद्दल या दोघांनीं निमे निमे पाटिलकी खाऊन राहावें असा करार करून आम्हां हरदूजण वादियांस आज्ञा केली. या गोष्टीला वाद्या गैर रजावंद जाहला. मनसुफीचें ठिकाण लागणें होतें तों अगेरसाल आलें. याजकरितां बलुते गांस गांवास जावयाची महाराजांनीं आज्ञा केली. ते गेले. बाजद बरसात आपले पाटिलकीविशीं महाराजांस

out during the administration of Dadoji Konddeo in the reign of great Shivaji. Shiv and his descendants, including Shankraji, have successively held the Watan, that he would prove this by the evidence of the Deshmukh, the Deshpande and the ryots of Wadgaon and the surrounding villages.

The statements of the parties being recorded they were asked whether they were willing to abide by the evidence of the residents of the village. Both consented. Chimnaji Pandit Sachiv was then directed to summon the Balutas of the village. They came and were examined. Five persons, (one Mali, one barber, one washerman and two Mhars) stated, that the Watan belonged to a Mahomedan family which had absconded since the famine, that the Watan was then managed, under the orders of the Jamidars, by one Deoji Dangat, a cultivator of the village, and afterwards

अर्जे केला. शंक्राजी हजर हुजूर झाला. त्याजवरी महाराजांनीं आलां हरदू वादियांस पुरशीस केली जे, तुह्मीं दोघे कोणचे इनसाफास राजी आहां ? यास आपण हरदूजण वादे समाकूळ पांढर भोयरगांव देशमूख देशपांडे यांसी राजी आहों ह्मणून बोलिले. ह्मणून महाराजांनीं पंडित मशारनिल्हे आज्ञा करून देशमुख व देशपांड्ये भोवरगांवींचे गोत ममाकूळ पांढरी व बलुते हुजूर आणविले त्यांणीं तकरार लिहून दिला बितपशील:—

मुख माळी बिन संतमाळी उमर वर्षें पाउणशें याणीं तकरीर केली कीं, पूर्वी सयद ब्र्हारण याची मोकदमी होती. तो देशावर गेला. त्यावरी दावजी दांगट थलकास एके चोवीसचें शेत नऱ्हाचे शिवेस आहे तें करून होता. तो पाटिलकीचा कारभार करूं लागला; मोकदम ह्मणविलें नाहीं. हणमंताची पोळी लावींत होता. तो दुकाळामुळें देशावर गेला. त्याउपरी हसाजी पठारे दोन चार वर्षें पाटिलकीचा कारभार करीत होता; त्यावर शिवजी पाटील दांगट पंधरा सोळा वर्षांचा वहुली तर्फ कुटेखोरें येथें होता. तो गांवावरी येऊन रव माळियास भेटून आपण दांगटाचा आहें ह्मणून सांगितलें. गांवीं रव माळी याणें राहून पाटिलकीचे कारभारास लाविला. पठारास बाहेर काढिला. शिवजीस सोयरीक आपल्या वडिलांनीं राणवडियांमी केली. त्यातागाइत शिवजीचा वंश पाटिलकी करितो. देवजी मुलकास कौल जाल्यावर गांवींची वसाहात जाली. गांवास आला, उक्तें शेत करून राहिला ऐशी तकरीर केली. सही १.

भोवरगांव तर्फ मजकूर:—१ कावजी बिन मालजी पाटील कोंडूरकर मौजे आंजेगांव बुद्रुक, १ रकमाजी बिन मालजी मते पाटील मौजे खडकवासले, १ हेमाजी पाटील पोळा मौजे धायटी, १ येसजी बिन गोपजी पाटील बोराटे मौजे नारजे, १ येसजी बिन येलचोजी पाटील मौजे नऱ्हे, १ अमाई बोराटी पाटलीण मौजे शिंगेबुद्रुक, एकूण ६. या महाजणांनीं सदरहू सातजणांप्रमाणें तकरार केली.

Hasaji Pathar Charan: that Hasaji was then turned out, and Sivaji Dangat of Siwane who had come from Behuli began to manage the Watan, and that it had since continued in the enjoyment of his descendants, of whom Shankraji was one.

Two persons one Chambhar and one carpenter stated that the Watan was, so far as they knew, being in the enjoyment of Shankraji's family and that they were not aware of Deoji's ancestors having ever served in the village.

On this evidence the Raja after consulting his council directed that as it was proved that Deoji's ancestors had once served in the Watan, and that as the Watan had for five generations been enjoyed by Shankraji's family, it should be shared equally by both the parties. The defendants would not agree to this course. Before the matter could be decided, the

क्रित्ता तकरीरा केल्याः—१ हसा महार, १ लिंगनाक बिन पदमनाक, १ राया महार, १ तवा महार. एकूण ४. या चौवांनीं तकरीर केली कीं, पूर्वी सयद बुऱ्हारण यासी पाटिलकी होती तो दुकाळामुळें देशावर गेला. मग दाउजी दांगट थळकरी कुणबी होता. त्याणें पांच सात वर्षांपर्यंत पाटिलकीचा कारभार केला तो सोरटाच्या दुकाळांत परागंदा जाला. त्याजवर शिवजीपासून आजतागाईत हलीं त्याचा वंश शंकाजी पाटिलकी करीत आहे. देवजीचा कांहीं दाखला नाहीं. हें लिहिलें सही.

क्रित्ता नांवनिसीः -१ मोरो नरहर कुळकर्णी, १ हरमाळी बिन संतमाळी, १ संतमाळी बिन राजमाळी, १ शिवमाबला बिन राऊमाबला, १ दुज वरटा, १ राया बिन रामनाक, १ तहनाक बिन संतनाक एकूण ७. या सातांजणीं तकरीर केली जे, शिवजी दांगट यांणीं पाटिलकी केली. त्याचा लेंक सूर्याजी यांणीं केली, त्याचा संभाजी याणें, त्याचा माणकोजी याणें, त्याचा हलीं शंकाजी करितो. देवजी दांगटाचा दाखला आपल्या वडिलांनीं सांगितला नाहीं व आपण ऐकिलें नाहीं. सुखमाळी व देवजी महार यांनीं समीपत्र केलें जे, पहिली पाटिलकी मुसलमानाची, अलीकडे दावजीनें केली ह्मणून लिहून दिलेंहे सही.

येणेंप्रमाणें तकरीरा लिहून घेतल्यावरी पसंत करितां गोही साक्षीचे ठिकाण लागत नाहीं. साक्ष्यांनीं तकरीरा एकसारख्या दिल्या. ऐसें जाणून वादी यास पुरशीस केली जे, याउपर विचार काय आहे? त्यावर शंकाजी बोलिला जे, माळियाच्या व महाराच्या वडिलांपासोन आपल्याशीं कुसूर आहे, यामुळें माळियानें आपल्यावर अदावत घातली आहे. यास आपण राजी नाहीं. बलुने, सुख माळी व हसा महार खेरीजकरून व थळे जे यांहीं माळियाच्या बळें तकरीरा

Balutas had to return to their village as the year was about to close. After the monsoon Devji again applied to the Raja for the settlement of the dispute. The defendant was called, and he and the plaintiff expressed their willingness to abide by the evidence of Deshmukh, the Deshpande and the ryots of Wadgaon and the surrounding villages. These persons were again called and examined. Their statements were recorded in detail. All stated that the Watan was for a long period in the enjoyment of Shankraji; some added that the Watan belonged to Mahomedan family and then it had for a few years been enjoyed by Devji's ancestor, who was a cultivator in the village.

The plaintiff urged that two of the witnesses had a grudge against his family, and that he was unwilling to abide by their evidence. The other witnesses admitted that they had given their evidence on the strength of the allegations made by the two witnesses in question. An ordeal on the river Krishna was then suggested, but the defendant would not consent to it. The case was then referred to the officers of Tarf Khed Khore

लिहून दिल्या. ऐसें बोलिल्यावर श्रीकृष्णेचें दिव्य नेमिलें. त्यास शंकराजी वगैरे रजावंद न झाला. त्यावरी तर्फ खेडखोरे व मोसेखोर व रोहिडखोरे येथील देशक हुजूर आले होते. त्याजवरी इनसाफ टाकिला. त्यांणीं इनसाफ केला कीं, शिवजीपासून एकशें दहा वर्षें भोगवटा शंकराजीचा आहे व देवजीच्या वाडिलाचा सात वर्षें. यावरून दोन तक्षिमा व वडीलपण शंकराजीकडे द्यावें व देवजीकडे धाकटपण व एक तक्षीम द्यावी. त्यासही राजी न जाहलों ह्मणून महाराजांनीं रवा दिव्य नेमिलें. तेसमयीं सुखमाळी बिन संतमाळी याणें तकरीर केली कीं, मौजे मजकूरचे मोकदमीचा कजिया देवजी व शंकराजी दांगट यांमध्यें लागला आहे, त्यास अग्रवादी याणें अग्निदिव्य करावें, ऐशी स्वामींनीं आज्ञा केली. मुळ पाटिलकी दांगटाची नव्हे, दांगट थळकरी वतनदार आहेत. दिव्य करणें तरी थळकरी ह्मणून करावें, पाटिलकीचें दिव्य करूं नये. पाटिलकी दांगटाची नव्हे. सयद बुन्हारण याची आहे. हल्लीं त्याचें नसल आहे. त्यास पूर्वील कागदपत्रासमेत पंधरा दिवशीं हजर करीन. त्याजवरी आपण बोलिलों जे, माळी बोलतो हें लटकें. आपल्यास अग्निदिव्य नेमून द्यावें, खरा जाले तर महाराजांनीं पाटिलकी द्यावी, त्याजवरून पालीस दिव्य करावयाचें नेमून दिल्हें, बरोबर हुजरे दिल्हे.

श्रीसंनिध आपण अग्निदिव्य केलें, दिव्यास उतरले. याजकरितां महाराजांनीं भोगवट्यास पत्रें करून दिल्हीं पाहिजे ह्मणून विदित केलें. त्यावरून मनास आणतां तूं दिव्यास राजी जाहलास. राजश्री अपाजी हणमंत सुभेदार व हुजरे व जिल्हेकडील व बाळाजी दादाजी व बाबोजी राउत याजबरोबर देऊन अग्निदिव्य करावयास पालीस पाठविले, तेथील गोत हे मिळोन श्रीचे देवळीं बैसोन तेल तूप मोईनप्रमाणें एकत्र करून भांडें लावून ताविलें. तूं स्नान करून येऊन मौजे मजकूरची आपली मोकदमी, शंकराजी आपला नव्हे ऐसें बोलोन सर्वांदेखत दोन रवा काढिला; उपरांतीं हातास लाखोटे केले. ते दिवशीं तेथें राहून दुसरे दिवशीं हरदू वादियांस महाराजनिल्हे जिल्हेकडील कारकून घेऊन हुजूर आले. तिसरे दिवशीं

---

Mose Khore and Rohid Khore, who were at that time at the Huzur. Considering the evidence, they gave it as their opinion that as Deoji's ancestor and Shankaraji's family had enjoyed the Watan for 7 years and 110 years respectively, ⅔ rds. of the Watan should be continued to Shankaraji, and that his be considered as the elder branch, and that ⅓rd. of the Watan be continued to Deoji. The plaintiff now declined to agree to these terms and an ordeal by fire was at last ordered. Sukha Mali, one of the witnesses above referred to, urged that the Watan really belonged to a Mahomedan family, that he was ready to produce the lawful claimant with his evidence, and that the Dangats should be allowed a trial by ordeal in regard to Patilki Watan. The plaintiff having expressed his determination to pass through the ordeal, and having staked his

हमीर मजालसीस हाताचे लाखाटे फोडिले. तों पूर्वीचीं चिन्हें लिहिलीं होतीं. त्यास अधिक उणें नाहीं. दिव्यास उतरला. शंकाजीनेंही हात पाहून बोलिला जे, तूं पाटील खरा आपण खोटा. ऐसें बोलून शंकाजीनें तुजला इजीतखत लिहून दिल्हें, तेसमयीं समस्तांनीं टाळी पिटली व जाल्या करिन्याप्रमाणें थळकरी यांणीं थळपत्र करून दिल्हें आहे. तूं मौजे मजकूरचा पाटील खरा ऐसें जाणून हल्लीं तुझी पाटिलकी तुझे दुमाला केली असे. तरी मौजे मजकूरचे मोकदमीचा मानपान, हकलाजिमे व वाजे, कानु, इनाम पासोडी सुदामत चालत आले असेल त्याप्रमाणें तूं आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें मौजे मजकूरची मोकदमीचें वतन अनभवून सुखरूप राहणें. या वतनसंबंधें तुझे माथां शेरणी दुतर्फा रुपये---करार करून. (जागा कोरी आहे.) पत्रें. शके ६८ दुर्मति संवत्सरे कार्तिक शुद्ध १३ भोमवासर सुा इसन्ने अर्बैन चिटणिशी पत्रें.— १ वतन पत्र, १ देशमुख व देशपाडे, १ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी, १ पंत सचीव.

[ २९८ ] वतनपत्र चिटणिशी कार्तिक बहुल त्रयोदशी भोमवासरे कानोजी बिन भायाजी बिन धकोजी व खंडोजी बिन सुभानजी बिन खंडोजी व अबाजी बिन अकोजी बिन काळोजी बोराडे हरपळे निमे मोकदम मौजे फुरसंगी तर्फ हवेली परगणे पुणें यासी दिल्हें वतन-

इ. स. १७४१-४२.
इसन्ने अर्बैन मया व अलफ.
सवाल १७.

honour on coming out successful he was sent to Pali in charge of Appaji Hanmant Subhedar, an attendant of the Raja, and certain other persons. On reaching the village, the residents were called to the temple, a pot containing heated oil and ghee was brought, and the plaintiff who had bathed was directed to take out a piece of metal, lying at the bottom of the heated pot. He did so twice, solemnly repeating every time that the Watan belonged to him, and that Shankarji was not in any way related to him. His hand was then enclosed in a covering which was sealed, and he was brought to Satara. The covering was taken out in the presence of the Raja and his council, and the plaintiff's hand was found to bear all marks which were previously made on it. The defendant was also asked to see the marks. The plaintiff was then declared to have successfully stood the ordeal. The announcement was received with applause by the persons present. Shankraji then admitted that Deoji was true and he false, and gave in a document acknowledging his defeat. The document together with a present was then handed to Deoji, and a Sanad was issued.

( 298 ) The Patilki Watan of Fursungi in Tarf Haveli of Poona Pargana, belonged to the Kamthi family. The owner of half a share in the Watan having no son,

A. D. 1741-42.

पत्र ऐसें जे, तुह्मीं शाहूनगरनजीक किल्ले मजकूर येथील मुक्कामीं येऊन स्वामीसंनिध विनंति केली कीं, मौजे मजकूरची मोकदमी पुरातन वतन कामथियाचें त्यास जिघन पाटील व सांत पाटील कामथे हे दोघे भाऊ मोकदमी करीत होते. जिघन पाटील कामथे यास पुत्रसंतान नव्हतें. एक कन्या शडांगुली जाली, तिचें नांव कोंडाई ते आमची वडील बाळजी बोराडे हरपळे यासी देऊन आपणांजवळ ठेवून घेतला. त्याउपरी कित्येका दिवशीं दुकाळामुळें सांत पाटील आपलीं मुलेंमाणसें घेऊन देशांतरास गेला. मागें जिघन पाटील गांवीं मोकदमी करीत होता त्याची बायको मृत्यु पावली. त्याउपरी बाळजी बोराडा व कोंडाई त्याचेच घरीं राहिली. वृद्धापकाळीं त्याची सेवा केली. त्याजकरितां जिघन पाटिलानें आपली निमे मोकदमी बाळाजी बोराडे हरपळे यास दिल्ही. उपरांतीक जिघन पाटील मृत्यु पावले. त्याजवर मौजे मजकूरची मोकदमी आमचा वडील बाळजी बोराडाच करीत होता. तों सांत पाटील आपले पुत्र घेऊन गांवास आले आणि मोकदमी करूं लागले. आमचा वडील बाळजी बोराडा याचा दाखला कांहींच नाहींसा केला. याजकरितां बाळजी बोराडा याणें गाइकवाड हरपळे पाठीराखे करून आणून कामथियांस रेटून काढिलें. त्यामुळें कामथे परागंदा जाले. मागें मोकदमी आमचा वडील करीत होता व गाइकवाड हरपळे पाठिराखे करून आणिले तेही गांवींच होते. कित्येका दिवशीं गाइकवाड हरपळे बोलावून आह्मांस रेटून कुली कारभार तेच करूं लागले; त्याउपरी वाघोजी बिन सोनजी व वाल्होजी बिन जैतजी व तुकोजी बिन संताजी कामथे हे महाराजांपाशीं फिर्याद होऊन विनंति केली कीं, मौजे मजकूरची मोकदमी पुरातन आपले आहे. त्यास भिकाजी बिन सूर्याजी गाइकवाड हरपळे बळेंच वतन खातो, त्यास हुजूर आणून इनसाफ केला पाहिजे. ह्मणून त्यावरून महाराजांहीं भिकाजी गाइकवाड हरपळे हुजूर आणून हकीकत पुशिली. त्याणें तकरीर केली जे, मौजे मजकूरची मोकदमी पुरातन आपली आहे. कामथे शलवाइक कुणबी यास मोकदमीशीं संबंध नाहीं, हें गोतमुखें खरें करून देईन. न करें तरी गोताचा अन्यायी दिवाणाचा

made a gift of it to his son-in-law surnamed Borade. The owner of the other half was then absent, but on his return he refused to allow Borade to do the duties of the Watan. Borade brought in a man surnamed Gaikwad to assist him, and took possession of the Watan. He was subsequently ousted by Gaikwad, who carried the duties of the Watan. A complaint was then made to the Huzur, and the parties were summoned. Gaikwad falsely swore by the feet of the Raja that the Watan belonged to him, and that Kamathi was a mere cultivator in his village. Divine retribution was however at hand. Gaikwad was attacked with diarrhoea and had to be carried on a bullock to his village where he died shortly afterwards. The parties again came to the Huzur, and requested the

गुन्हेगार ऐसें बोलिला. त्याउपरी परगणे मजकूरचे देशमुख व देशपांडे व भोवरगांवीचे मोकदम व बलुते हुजूर आणून आज्ञा केली जे, समस्त गोत श्री कृष्णावेण्णा संगमीं जाऊन हरदू वादियांचा इनसाफ करणें. त्यास भिकाजी हरपळा बोलिला जे, महाराजांचे पाय हेच कृष्णा, आपण पायाची क्रिया करितों ह्मणून मान्य करून पायाची क्रिया केली जे, मोजे मजकूरची आपले कामथे थळवाइक कुणबी ऐशी क्रिया केली. त्याजवर एक दो दिवसांत भिकाजी गाइकवाडास हगवण लागली. त्याजला बैलावरी घालून गांवास नेला. तेथें क्रिया लागोन एका महिन्यामध्यें मृत्यु पावला. त्याउपरी मागती महाराजासंनिध येऊन विनंति केली कीं, भिकाजी गाइकवाड हरपळा महाराजांच्या पायाची क्रिया लागोन मेला. यांउपरी महाराजांहीं परगणे मजकूरचे देशमुख व देशपांड्ये व समाकूळ पांढर यास हुजूर आणून आपला इनसाफ केला पाहिजे ह्मणून. त्यावरून महाराजांहीं देशमुख व देशपांडिये व समाकूळ पांढर यास हुजूर आणून आज्ञा केली जे,–हरदू वादियांस घेऊन श्री कृष्णा-वेणी संगमीं जाऊन इनसाफ करणें. त्यावरून देशमुख व देशपांडे व गोत बलुते श्री कृष्णा-वेणी संगमीं मार्गशीर्ष वद्य त्रयोदशी प्रमादी संवत्सर सुरुसन अर्बा सलासीन मया अलफ ते दिनीं कामथे व गाइकवाड हरपळे यांस श्री कृष्णावेणीमध्यें उभे केले. समस्त गोतांनीं स्नानें करून वाळवंटीं उभे राहिले. तेसमयीं समस्त गोत व बलुते यांच्या मतें येकनाक महार खेतरा मौजे मजकूर याणें उजवे हातीं कामथियास धरिलें, डावे हातीं गाइकवाड हर-पळे यास धरिलें. मग बोलिला जे, मूळ वतन मोकदमी कुली कामथी याची, त्याचे लेंकीचा वंश बोराडे हरपळे त्यानीं पाठिराखे गाइकवाड हरपळे आणिले होते, त्याच्या नांवावर गाइकवाडास हातीं धरिलें आहे. ऐसें बोलोन बाहेर काढिले. त्याउपर परगणे मजकूरचे देश-मुख व देशपांडिये, भोवरगावचे मोकदम, मौजे मजकूरची समाकूळ पांढर हे बोलिले जे, कदीम वतन मुकदमी कामथियाची व जिवन पाटील कामथे याचे लेंकीचा वंश बोराडा, हरपळा आणि जिवन पाटिलानें शडांगुली कोंडाई तिचा दादला बाळजी बोरोडा हरपळा यास निंमे मोकदमी दिली होती. याजकारितां मौजे मजकूरची मोकदमी निंमे वडीलपण कामथियानीं अनभवावें, निंमे

---

Raja to decide the matter, after consulting the Deshmukh and Deshpande, and the the ryots of the Pargana. These were called, and were directed to take the parties to the confluence of the Krishna and the Wenya, and to decide the matter. They accordingly went to the place appointed. Kamatni and Gaikwad (a member of the dead Gaikwad's family). were made to enter the river. The caste-people on both the sides then bathed in the river, and stood on its bank. At the instance of the caste-people and the Balutas, Eknak Mhar of the village took Kamathi by the right hand and Gaikwad by the left, and declared that the Watan originally belonged to

मोकदमी धाकटे भाऊपणा बोराडे हरपळे यानीं अनभवावी. गाइकवाड हरपळे यास मोकदमीशीं संबंध नाहीं ऐसें बोलोन करार करून हुजूर आले, वर्तमान विदित केलें. स्वामीनीं दशरात्र [illegible] वायदा नेमून दिल्हा; त्यास कामथे व आह्मीं बोराडे हरफळे व समस्त गोत नोलीप्रमाणें [illegible] कोणास क्रिया लागली नाहीं. त्याउपरी महाराजांहीं मनास आणून बाबोजी बिन [illegible] बिन मावजी पाटील कामथे यास मौजे मजकूरची निंमे मोकदमी व वडीलपण व [illegible] निंमे मोकदमी धाकटा भाऊपणा येणेंप्रमाणें करार केले. त्याप्रमाणें कामथे व आह्मीं [illegible] अनभवीत आहों. भोगवटियास पत्रें करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे [illegible] विदित केलें त्यावरून मनास आणितां पूर्वीं गोतमुखें व दिव्यमुखें निवाडा जाला. [illegible] मुकदमी वडीलपण व वडीलपणाचे मानपान व नांगर, दसरियाचा घट व पालोडीचें शेत [illegible] बोरमल्हे व चोळीचा तुकडा शेत पाईट हे कामथियानें अनभवावे. निंमे मोकदमी धाकटा भाऊपणा तुह्मीं अनभवावा. होळीची पोळी एका एरंडास आधीं कामथियानें बांधावी, [illegible] मागून त्याचे पोळीखालें तुह्मीं बांधावी. दिवाणांत भेट कामथियाणीं ठेवावी; दिवाणींचा शिरपाव विडा आधीं कामथियाणीं घ्यावा त्यामागून तुह्मीं घ्यावा. मोकदमीचा इनाम [illegible] थल रक्कम बारागणीचें आहे तें कामथियांनीं व तुह्मीं निंमेनिम अनभवावें. वरकड [illegible] लाजिमे कानूकायदे सुदामत चालत आले असतील ते निंमे आधीं वडीलपणें कामथियानें घ्यावे, मागून निंमे तुह्मीं घ्यावे; व कामथियाचे मिराशीचें शेत थल रक्कम तीन टक्यांचें [illegible] त्यापैकीं त्याच्या वडिलानीं महारास बारागणीचें दिल्हें. बाकी पावणेतीन टक्यांचें थल [illegible] कामथियानेंच अनभवावें. तुह्मांस त्या थळाशीं संबंध नाहीं. तुमचें शेत एक टक्याचें आहे तें [illegible] अनुभवावें. यावेरीज मौजे मजकुरीं गतकुळाचीं शेतें असतील तीं कामथियानीं व तुह्मीं [illegible] घ्यावें. पांढरीवर पुरातन कामथियाचे वाडे होते त्यापैकीं कोंडाई शडांगुलीस घर दिल्हें [illegible] तुह्मीं अनभवावें. वरकड जागे बाकी राहील ते कामथियांनीं अनभवावें व गांवांत गतकुळाचे [illegible] बखळ असेल ते कामथियांनीं व तुह्मीं निंमेनिम घ्यावें. येणेंप्रमाणें करार करून [illegible] निंमे मोकदमीचें वतनपत्र करून दिल्हें आहे. तरी मौजेमजकूरचे मोकदमीचे [illegible] प्रमाणें करून सदरीलप्रमाणें वतन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभवून सुखरूप राहणें. [illegible] वतनसंबंधें तुमचे माथां शेरणी, स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा रुपये. येविशीं पत्रें :—

Kamathi and that Gaikwad was brought in for assistance by Borade, a descendant of Kamathi in the female line. They were then taken out of water and the Panch decided that half the Watan belonged to Kamathi, and the remaining half to Borade, to whom it had been granted by a member of the Kamathi [illegible] was then reported to the Huzur. A period of 10 [illegible] fixed and no harm having come

१ मुख्य पत्र कानोजी बिन भायाजी बिन धाकोजी वगैरे, १ राजश्री पंत प्रधान, १ देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी परगणे पुणें. १ देशमुख व देशपांडिये परगणे पुणें.

[ २९९ ] किता एक पत्रें चिटणिशी फाल्गुन वद्य द्वादशी इंदुवार बनाम पठाण बिन मलिक दाउद भांड वस्ती कसबा पेण तर्फ मजकूर प्रांत कल्याण याणें मुकाम मजकुरीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली, कोंकण प्रांत व वरघांट मावळे या प्रांतीं आपले वडील व आपण भांडपणाचें

इ. स. १७४४-४५.
खमन अर्बैन मया व अलफ.
रबिलावल १.

कसब करून पोट भरीत असतों, दुसऱ्या भांडाचा दाखला या प्रांतीं नाहीं. महाराज स्वामींनीं आपणांस भांडपणाचें वतनपत्र व एक गांव इनाम करून देऊन वंशपरंपरेनें चालविला पाहिजे ह्मणून विनंति केली होती. त्यावरून मनास आणून कोंकण प्रांत सुभा राजपुरी परगणे चौल व प्रांत कल्याण व वरघांट मावळे येथील भांडपणाचें कसब आपले वंशपरंपरेनें करून हक्क मागून पोट भरावें. दुसऱ्या भांडास या प्रांतांत फिरावयास गरज नाहीं. ऐशीं पत्रें पेशजीं करून दिल्हीं आहेत व मौजे मुंगोशी तर्फ दुर्ग परगणे सागसे प्रांत कल्याण हा गांव आपणांस वंशपरंपरेनें इनाम करून देऊन राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांजकडून मौजे मजकूरचीं पत्रें करून देविलीं. त्याप्रमाणें मौजे मजकूर आपले दुमाला करून घेऊन इनाम अनभवीत आहों. राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांणींही आपलीं पत्रें करून दिल्हीं. त्याप्रमाणें मौजे मजकूर इनाम व कोंकण प्रांत व मावळे येथील भांडपण अनभवीत आहों. सांप्रत अजीज बिन जाफर भांड नाशीककर पोट भरावयास कसबा भिवंडी येथें राहून आपणाशीं कल्याणप्रांतींचे भांडपणाचा व इनाम गांवचा विभाग मागतो. त्यास तो आमचे अवलादेचा नव्हे. त्याशीं व आह्मांशीं तालुका नाहीं ह्मणून विनंति केली. यावरून मनास आणितां पठाण भांड बिन मलिक दाउद भांड यास राजापुरी व चौल व कल्याण व वरघांट मावळे येथील भांडपणाचें वतन पूर्वी करून देऊन पत्रें करून दिल्हीं आहेत व मौजे मुंगोशी हा गांव इनाम करून दिल्हा आहे. त्याप्रमाणें पठाण मजकूर बावा याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभवितील, यांसी अजीज बिन जाफर भांड कजिया करितो त्यास ताकीद करून याशीं कजिया करूं न देणें. अगर दुसरा

---

to Kamathi and Borade during this period they were declared to have succeeded in establishing their claims and Sanads were issued accordingly.

(299) Pathan bin Malik Bhand of Kasba Pen, held the hereditary Watan of Bhand in the territory of Rajapur, Choul and the Mawals above the ghauts, and a village was enjoyed by him in connection with the Watan. Another Mahomedan having obstructed his possession of the Watan, he was warned against

A. D. 1744-45.

कोणी भांड प्रांतांत फिरोन भीक मागेल त्यास सदरहु प्रांत फिरों न देणें. दस्त करून हुजूर पाठविणें येविशीं पत्रें चिटणिशी :—

१ देशमुख व देशपांडिये, १ देशाधिकारी, १ खंडोजी माणकरास पत्र. १ अजीज बिन जाफर भांड यास मसाला, एकूण ४.

[ ३०० ] कित्ता एक निवडपत्रें चिटणिशी आषाढ बहुल दशमी मंदवासर तद्दिनीं फकीर महमद बिन नूरमहमद मेहेतरा खूम आतार परगणे पुणें यासी दिल्हें निवडपत्र ऐसी जे, तुवां मुक्काम मजकुरीं येऊन स्वामीसंनिध विनंति केली कीं, परगणे मजकुरीं खूम आतार याची मेहेतरकी वतन आपलें आहे. त्यास आताराचे घरीं लग्न, शादी व मुंता होतील त्याकडे आपला मेहेतरकी मान, शेला व पानें आहेत त्यास बुवाजी बिन मोहबत आतार कसबे मजकूर हा खलेल करून आपणांस मान व हक्क देत नाहीं. त्यास महाराजांनीं हुजूर आणून करीना मनास आणून निवाडा करून आपला मान, शेला व हक्क सुरळीत चाले ऐसें केलें पाहिजे ह्मणून विनंति केली. त्याजवरून राजश्री बाळाजी बाजिराव पंडित प्रधान यास आज्ञा करून बुवाजी बिन मोहबत आतार यास हुजूर आणून तुह्मां हरदू जणांचा करीना मनास आणून निवाडा करावयाची आज्ञा देशमुख व देशपांडे परगणे मजकूर यास केली. त्यावरून त्याणीं तुह्मां हरदू जणांचा करीना मनास आणून विनंति केली कीं, परगणे मजकुरीं आतार खुमाची मेहेतरकी वतन फकीर महमद याचें आहे. बुवाजी आतार मेहेतरकीचा हक्क घ्यावयास खलेल करितो तो खोटा आहे. त्याजला मेहेतरकीच्या हक्कास व मानास खलेल करावयास संबंध नाहीं. बुवाजी आताराजवळ कागदपत्र आहेत ते तगलुफी आहेत ह्मणून विदित केलें. त्यावरून बुवाजीस वाजवी पुरशीस करितां तो खोटा जाला. मेहेतरकीचा हक्क व मान तुजला द्यावयास रजावंद होऊन साक्ष मोझ्यानिशीं इतीफाक लिहून दिल्हें तें मनास आणितां परगणे मजकूरच्या आतार खुमाची मेहेतरकीचें वतन पुरातन तुझें आहे. मेहेतरकीचा हक्क व लग्न, शादी मुंता आताराचे घरीं होतील. तेथें शेला व पानें मानाचीं आहेत हें तुवां घ्यावें. ऐसें जाणोन सदरहूप्रमाणें तुझे खुमाचे मेहेतरकीचें वतन तुजला करार केलें असे. तरी कसबा पुणें व गांवगन्ना परगणे मजकूर व यात्रा देवील

इ. स. १७४५-४६.
सित अर्बैन मया व अलफ.
जमादिलाखर २८.

---

doing so, and orders were issued that no other Bhand should be permitted to wander over the province and ask alms.

(300) The Watan of Mehetar of the guild of Atars belonged to Fakir Mahamad Nur-Mahamad and by virtue of his holding it, he received a Sheia (silken garment) and leaves at every marriage and *sunta* ceremony celebrated at an

A. D. 1745-46.

आतार खुनाचे मेहेतरकीचें कामकाज तूं करून मेहेतरकीचा हक, शेला मानाचा व पानें तूं ... पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें घेऊन सदरहु वतन अनभवून सुखरूप राहाणें. बुवाजी ... मोहद्दत आतार तुजशीं कजिया करीत होता तो खोटा जाहला. त्यास तुजशीं कजिया करण्यास संबंध नाहीं. येविशीं पत्रें:—

१ मुख्य निवाडपत्र, १ देशमुख व देशपांड्ये, १ देशाधिकारी. एकूण ३.

[ ३०१ ] येसाजी गणेश व मल्हार जीवजी व आबाजी निराजी व माणको उद्धव उपनाम प्रभुणे गोत्र अगस्ति सूत्र आश्वलायन ज्योतिषि कुळकर्णी निंमे वतन मौजे जळगांव परगणे सुपें व मौजे जळगांव तर्फ कन्हेपठार प्रांत पुणें याचा मजकूर यादीवरी सविस्तर असे.

इ. स. १७४९-५०. ... सन सल्लास खमसैन मया व अलफ. रजब १.

... ज्येष्ठ वद्य त्रयोदशी रविवासर शके ७१ शुक्ल संवत्सरे चिटणिशी पत्रें:—

१ मोकदमानी मौजे जळगांव परगणे सुपें व मोजे जळगांव तर्फ कन्हेपठार प्रांत पुणें ... पत्र, १ वतनपत्र, २ देशमुख व देशपांडिये, २ देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी, एकूण ६. पत्रावरी शिक्के जाहले नाहींत.

यादी येसाजी गणेश व मल्हार जिवजी व आबाजी निराजी व माणको उद्धव उपनाम प्रभुणे गोत्र अगस्ति सूत्र आश्वलायन ज्योतिषि व कुळकर्णी निंमे वतन मौजे जळगांव परगणे सुपें व मौजे जळगांव तर्फ कन्हेपठार प्रांत पुणें यांनीं शाहूनगरसमीप किल्ले सातारा ... मुक्कामीं स्वामीसंनिध विनंति केली जे, हरदो गांवींचें ज्योतिष व कुळकर्ण वतन ... आमचे आपले पणजे परशराम गणेश त्यांस पुत्र तिघे. त्यांतून मधील पुत्र दादोबा ... निसंतान जाहले, दोघांचें संतान आहे. वडील पुत्र नामाजी परशराम त्यास पुत्र त्रिंबक नामाजी, दुसरा शिवजी नामाजी, त्याचें संतान त्रिंबकजीचा आपाजी व शिवजीचा पुत्र दादो ... येणेंप्रमाणें वडील भावाचें संतान. धाकटा भाऊ राघो परशराम तो आमचा आजा ... त्याचें संतान—वडील गणेश त्याचा पुत्र येसाजी १, दुसरा जिवजी त्याचा मल्हार जिवजी १,

---

...'s house. Another person having obstructed him the matter was referred to the Panch and they decided in Fakir Mahamad's favour.

(301) The Joshi and Kulkarni Watans of Jalgaon in Pargana Supa, and Jalgaon in Prant Poona, belonged to two brothers of the Prabhune family. The Watans were mortgaged by one of them (A) for Rs. 175. The period fixed for the return of the loan having expired the creditor pressed for repayment or failing that, for a sale deed in his favour of the Watan, and sent persons to sit *Dharana* at A's house till the demand was satisfied.

A. D. 1749-50.

तिसरा निराजी त्याचा आबाजी १, चौथा उद्धव त्याचा माणकोजी १. येणेंप्रमाणें आपण राघो परशराम यांचें संतान. आमचे ऐन उभयतां बंधु एकत्र असोन देहाय मजकूरचें ज्योतिष कुळकर्ण वतन अनभवीत होते; त्यावर आमचे बाप रोजगार करीत होते. गांवीं नामाजी परशराम यांचे पुत्र त्रिंबकजी व शिवजी गांवीं वतनावर होते. त्यांचा परामर्श आमच्या बापानीं करून कुटुंबास रक्षणेंनिमित्त नक्ती ऐवज व वस्त्रें व गाई व बैल देऊन परामर्श केला असतां शिवजी नामाजी यांनीं आपल्या संसारकृत्यांस शिवजी दादाजी बुरटे दिंमत हणमंतराव निंबाळकर यांचें कर्ज रुपये १७५ घेऊन त्यांस खत लिहून दिल्हें जे, पावणेदोनशें रुपये कर्ज घेऊन ऐवजास गहाण मौजे जळगांव परगणे सुपें येथील ज्योतिष कुळकर्ण वतन ठेविलें असे ह्मणून मुदत करून खत लिहून दिल्हें. त्याची मुदत जाहालियावर शिवजी बुरट्यानीं रुपयेचा तगादा केला जे, रुपये देणें किंवा जळगांवचें वतन गहाण ठेवलें आहे त्याचें विक्रीतपत्र लिहून देणें ह्मणून त्वष्ट केलें. आणि पैकियानिमित्त माणसें लाविलीं तीं समागमें घेऊन शिवजी नामाजी आमचे वडील लष्करांत होते त्याकडे येऊन वर्तमान सांगितलें. तेसमयीं आमचे वडिलांनीं जिवजी रघुनाथ व निराजी रघुनाथ यांनीं शिवजी बुरटे यासी रुपये देऊन खत सोडविलें. तें शिवजी नामाजी याचे हातीं दिल्हें. व त्याची खर्चाची बेगमी करून गांवास रवाना केलें. याप्रमाणें आमचे वडील भावपणानें चालत होते ते मृत्यु पावले. यावर सांप्रत आह्मीं गांवास गेलों. तेथें आमचे नक्षीमदार भाऊ आपाजी त्रिंबक व दादो शिवदेव वतन चालवीत होते. त्यास पुशिलें जे, आह्मीं वतनावर आलों आहों. हरदो गांवींचें वतन तुह्मीं व आह्मीं यथाविभागें अनभवावें. त्यास आपाजी त्रिंबक मान्य जाहले. दादो शिवदेव यानें आह्मांस उत्तर दिल्हें जे, तुह्मांस विभाग देत नाहीं. त्यास आपाजी त्रिंबक यानें सांगितलें जे, याचा व आमचा पणजा परशराम गणेश त्याचे संतान आह्मीं व हे ऐसे आहों, वतन निम्मे आह्मीं व तुह्मीं व यांनीं निम्मे याप्रमाणें अनभवावें. तुह्मीं यांशीं कटकट सर्वथा न करणें ह्मणून दादो शिवदेव यांसी सांगितलें. परंतु त्याणें मान्य केलें नाहीं. आह्मांशीं कजिया करितो. निम्मे वतन आह्मांस अनभवूं देत नाहीं. आपाजी त्रिंबक मृत्यु पावले. त्यांचा पुत्र कुसाजी आपाजी व दादो शिवदेव गांवीं आहेत त्यास हुजूर आणून आपला इनसाफ मनास आणून वतन आपले दुमाले केलें पाहिजे ह्मणून विनंति केली. त्यावरून याचा करीना मनास आणून इनसाफ करावयाविशीं राजश्री चिमणाजी नारायण सचीव यासी आज्ञा केली. त्यांनीं मोकदम मौजे जळगांव परगणे

---

The other brother, B, who was serving elsewhere at the time, paid the money and freed the Watan. Both the brothers subsequently died. The Watan remained in the hands of A's sons as they were residing in the village; and they refused to give a share of it to B's sons when the latter returned to their home. B's sons then complained to the Huzur and

सुपें व याचे तर्कीमदार कुसाजी आपाजी व दादो शिवदेव यांसी तलब करून हुजूर आणविले. त्यास आपाजी त्रिंबक याचा पुत्र कुसाजी त्याचें वय बारा वर्षांचें. तो गांवीं राहिला, आणि मौजे जळगांव परगणे सुपें येथील पाटील व निंबाजी पाटील खोमणा मऱ्हाटा व दादो शिवदेव हुजूर आले त्यांस पुरशीस केली जे, येसाजी गणेश याजशीं दादो शिवदेव वतनाविशीं कटकट करितो याचा करीना कैसा आहे तो सांगणें ह्मणून निंबाजी पाटिलास आज्ञा केली. त्यावर पाटील मजकूर यानें विनंति केली जे, येसाजी गणेश व दादो शिवदेव यांचा पणजा परशराम गणेश त्याचें संतान हे हरदो जण. यांस आपले स्वाधीन करावें. गांवीं नेऊन दोघांची समजाविशी करितों ह्मणून पत्र लिहून देऊन हरदोजणांस हातीं घेऊन गांवांस नेले. तेथें हरदो गांवींचे बलुते व पाटील व समाकूळ पांढर मिळोन दादो शिवदेव यांसी सांगितलें जे, हे व तुह्मीं एका पुरुषाचें संतान, हे तुमचे निम्मेचे भाऊ आहेत. दोन्ही गांवींचें वतन निम्मे कुसाजी आपाजी व तुह्मीं अनभवणें व येसाजी गणेश व त्याचे चुलत बंधु देखील चौघे यांसी निम्मे. येणेंप्रमाणें वतन अनभवणें, कलह न करणें. ह्मणून सांगितलें. तें दादो शिवदेव याणें अमान्य केलें. तें त्यांणीं हुजूर येऊन वर्तमान विदित केलें. त्यावरून दादो शिवदेव यास तलब करून हुजूर आणिला आणि पुरशीस केली. तो बोलिला जे, हे आपले भाऊ नव्हेत, यांस वतनाचा वांटा देत नाहीं. त्यावरून त्यांस आज्ञा केली जे, बोलिल्याप्रमाणें हरदू जण तकरीरा लिहून देऊन जमान देणें; त्यावरून तकरीरा बितपशील.—

तकरीर कर्दे येसाजी गणेश व मल्हार जिवजी व आबाजी निराजी व माणकोजी उद्धव ज्योतिषि कुळकर्णी मौजे जळगांव परगणे सुपें व मौजे जळगांव परगणे कऱ्हेपठार प्रांत पुणें सुा सित अर्बैन मया अलफ लिहून दिल्ही तकरीर ऐसी जे, आपला आजा व दादो शिवदेव याचा आजा हे दोघे सखे एकोदर भाऊ. वडील नामाजी परशराम, धाकटा राघो परशराम तो आमचा आजा. हे उभयतां एकत्र असतां वतन उभयतां अनभवीत होते. रोजगारानिमित्त आमचे बाप गांव सोडून दुसरे जागा पोट भरावयास गेले. गांवीं शिवजी नामाजी होते. त्याणें आमच्या बापानें सर्वस्व चालविलें. शिवजी नामाजीनें मौजे जळगांव परगणे सुपें येथील वतन शिवजी बुरटे यास गहाण ठेवून रुपये १७५ घेऊन दाबत होते. ते आमचे वडील जिवजी रघुनाथ व निराजी रघुनाथ यांणीं रुपये शिवजी बुरटा यांस देऊन वतन सोडविलें. भाऊपणांत अंतर नव्हतें. आमचे वडील मृत्यु पावले. दादो हा वतनावरी राहिला ह्मणून आह्मांस वतनाचा वांटा न द्यावा ऐसें नाहीं. वतन दोघां भावांचें

---

the adjudication of the claim was entrusted to Chimnaji Narayan Sachiv. The Sachiv thereupon had the defendants and the Patil of Supa brought before him. The Patil requested that if both the parties were handed over to him he would take them to the village and effect a reconciliation, and gave in a writing to that effect. The parties were accordingly

आहे. त्यांणीं व आह्मीं निम्मेनिमप्रमाणें अनभवावें. परस्पर कजिया करावा ऐसें नाहीं. याप्रमाणें पांढरीचे साक्षीनिशीं खरें करून देऊं. न देऊं तरी दिवाणाचे गुन्हेगार व गोताचे अन्यायी लिहून दिल्ही तकरीर. सही बिकलम कित्ता आबाजी निराजी जामीन अमरसिंग खापडे देशमुख तर्फ उतराली तालुके रोहीडखोरें वर्तावयास जामीन १.

तकरीर कर्दे बेशमे दादो शिवदेव ज्योतिषि कुळकर्णी मौजे जळगांव परगणे सुपें व मौजे जळगांव तर्फ कऱ्हेपठार प्रांत पुणें मुा सित अर्बैन मया व अलफ कारणें साहेबाचे शेवेसी लिहून दिल्ही तकरीर ऐसी जे, स्वामींनीं आपणांस तलब करून हुजूर आणून पुरशीस केली जे, येसाजी गणेश व मल्हारजी जिवजी व आबाजी निराजी व माणको उद्धव हे दोघे जळगांवचें वतन निमे आपलें ह्मणतात. दादोबा व आपण एकजखी भाऊ, दोघांचे आजे सखे एकोदर बंधू असोन आपल्याशीं कजिया करितात. त्यासी तुह्मा करीना काय असेल तो लिहून देणें ह्मणून आज्ञा केली. तरी हे व आपण भाऊ खरे, परंतु वतनाचा विभाग यांस देत नाहीं. सबब हे वतनावरी नव्हते याजबद्दल आपले भाऊ नव्हेत ह्मणत होतों. याउपरी यांस व आह्मांस दोन्ही गांवची पांढर सत्य स्मरोन सांगेल त्याप्रमाणें आपण राजी असों. नव दिगर करूं तरी दिवाणाचे गुन्हेगार व गोताचे अन्यायी हे तकरीर लिहून दिल्ही. सही बिकलम. हे वर्तावयास जामीन येसाजी बळवंतराव बेलसरे जोशी कुळकर्णी मौजे कालविरे प्रांत सुपें येणेंप्रमाणें १.

येणेंप्रमाणें हरदुजणापासून तकरीरा व जामीन घेतलियावरी आज्ञा केली जे, तुह्मीं कोणत्या इनसाफास रजावंद आहां तें सांगणें त्यासी दादो शिवदेव यानें विनंति केली जे, गांवची पांढर हुजूर आणावी. ते आपलें सत्य स्मरोन सांगतील त्यासी आपण रजावंद असों ह्मणून राजीनामा लिहून दिल्हा. त्यावरून मौजे जळगांव प्रांत सुपें येथील पाटील व चौगुले व हरदु गांवचे बलुते हुजूर आणिले बितपशील.

पाटील खामणे मौजे जळगांव परगणे सुपें, २ ह्मराटे ( १सुलतानजी बिन दुर्योजी पाटील मोकदम, १ लिंबाजी बिन माणकोजी पाटील.) २ संगर धनगर ( सुभानजी बिन बापोजी पाटील, १ शेट्याजी बिन रायाजी पाटील.) एकूण ४. पिराजी बिन संताजी जाधव चौगुला मौजे जळगांव परगणे सुपें.१

---

made over to him and he took them to the village. The village community, the Balutas and the Patils were then assembled, who advised the parties to divide the Watan in equal shares. A's sons refused to do so. B's sons represented the matter to the Huzur, and the defendants were again called up and interrogated. They alleged that that B's sons were not their Bhauband, and had therefore no right to a share in the Watan. Both the parties were then called upon to state their pleas in

बलुते हरदोगांवींचे.—बाबू बिन माणकोजी सुतार, १ सूर्याजी बिन उदाजी लोहार, १ सुभानजी बिन नावजी कुंभार, १ उदाजी बिन माणकोजी चांभार, १ सुभानजी बिन जिवाजी गुरव, १ वाघोजी बिन लिंबाजी कोळी, १ मल्हारजी बिन राजू न्हावी, २ महार (१ माणीकनाक बिन राजनाक, १ येसनाक बिन निंबनाक )१ संबनाक बिन अजनाक मांग, एकूण १०.

येणेंप्रमाणें असामी पंधरा हुजूर आणून त्यासी प्रथकाकारें राजश्री चिमणाजी पंडित सचीव यांनीं पुरशीस केली. त्यांनीं आपलें सत्य स्मरोन सांगितलें जे, या दोघांचाही पणजा एक पुरुष. त्याचे पुत्र वडील नामाजी परशराम त्याचे नातू आपाजी त्याचा पुत्र हल्लीं आहे कुसाजी दुसरा दादो शिवदेव येणेंप्रमाणें वडिलाचें संतान. दुसरा पुत्र राघो परशराम त्याचे नातू येसाजी गणेश व मल्हार जिवजी व अबाजी निराजी व माणको ऊद्धव येणेंप्रमाणें आहे. वतन हरदो गांवींचे ज्योतिष कुळकर्ण कुसाजी आपाजी व दादो शिवदेव या दोघांहीं निम्मे अनभवावें. येसाजी गणेश व त्याचे चुलतभाऊदेखील चवघे यांनीं निम्मे वतन येणेंप्रमाणें अनभवावें ऐसें प्रथकाकारें अवघियांनीं सांगितलें त्याउपरी पाटील व बलुते एकत्र करून विठ्ठल बाबुराव देशपांडे परगणे सुपें यांचे विद्यमानें माथा बेलभंडार घालून नरककुंड बोदून आज्ञा केली जे, हरदोजण ज्योतिष कुळकर्णास भांडत आहेत त्यास तुह्मीं आपलें सत्य स्मरोन काय तें सांगणें. त्यावरून त्यांनीं तकरीर लिहून दिली जे, परशराम गणेश ज्योतिषि व कुळकर्णी देहाय मजकूर याचें संतान वडीलपुत्र नामाजी परशराम, दुसरा पुत्र राघो परशराम या दोघांनीं वतन अनभविलें त्याचें हें संतान हरदोजणांनीं निम्मेनिम वतन अनभवावें ऐसी तकरीर लिहून दिली. त्यावरून दादो शिवदेव यास आज्ञा केली जे, तूं पांढरीस रजावंद होऊन राजीनामा लिहून दिला होतास त्यास पांढरीनें निवाडा करून सांगितलें आहे त्याप्रमाणें रजावंद आहेस किंवा नाहींस हें सांगणें. त्याणें विनंति केली जे, पांढरीनें निवाडा केला आहे त्याप्रमाणें आपण मान्य जहालों. दोघेही समजोन निम्मेनिम वतन अनभवितों

---

writing, and to give security (for abiding by the decision of Government) B's sons stated that they were Bhaubands of the Watan, and were entitled to a share, though they had not actually enjoyed it; that they would prove this by evidence of the villagers and that if they failed, they would willingly submit to any punishment that Government and their caste would inflict, and gave one Desshmukh as their security. A's sons admitted that B's sons were Bhaubands, but alleged that they had no share as they had never served in the Watan. They further added that they were willing to abide by any evidence that the villagers might truthfully give; and that if they failed to do so they would suffer any penalty

आणि येसाजी गणेश यासी संवादपत्र लिहून देतों ह्मणून मान्य होऊन संवादपत्र लिहून दिलें तें अलाहिदा असे. तें मनास आणून पाटील व बलुते यांसी गांवास जावयाची आज्ञा दिली. याउपरी मागती दादो शिवदेव याणें फाट घेतला जे, आपण जाहल्या निवाडियासी राजी नाहीं. गांवींचे पाटील व बलुते हुजूर आणिले होते ते मागती हुजूर आणून महाराज स्वामींनीं करीना मनास आणून निवाडा केला पाहिजे ह्मणून विनंति केली. त्यावरून मौजे मजकूरची पांढर पेशजीं हुजूर आणिली होती त्यास मागती हुजूर आणून त्यास व विठ्ठल बाबुराव देशपांडिये परगणे सुपें यासी आज्ञा केली जे, यांचा निवाडा पूर्वी तुह्मीं करून पत्र लिहून दिल्हें आहे त्यास मागती दादो शिवदेव लबाडी करितो. त्यास तुह्मीं आपलें सत्य स्मरोन काय असेल तें सांगणें ह्मणून आज्ञा केली. त्यावरून त्यांनीं सांगितलें जे, आपण पूर्वी हरदोजणांचा निवाडा सांगितला आहे तोच प्रमाण. हरदो गांवींचें ज्योतिष व कुळकर्ण कुसाजी आपाजी व दादो शिवदेव यांनीं निंमे व येसाजी गणेश व मल्हार जिवजी व आबाजी निराजी व माणको उद्धव यांनीं निंमे, येणेंप्रमाणें अनभवावें हेंच पेशजीं आह्मीं सांगितलें आहे तेंच प्रमाण आहे, ऐशी साक्ष दिली. त्यावरून दादो शिवदेव यासी आज्ञा केली जे, पांढरीनें चार वेळां तुज सांगितलें जे, हरदोजण निंमेनिम वतन अनभवणें ह्मणून सांगितलें असतां अद्यापि तूं लबाडी करितोस हा तुझा काय विचार? हे वर्तणूक स्वामीस मानणार नाहीं ह्मणून आज्ञा केली. त्याउपरी दादो शिवदेव याणें विठ्ठल बाबुराव देशपांडिये व पांढरीचे साक्षीनिशीं रजावंद होऊन पूर्वी संवादपत्र लिहून दिल्हें होतें तेंच स्वामीचे पुढें ठेवून हरदोजण समजलों, निंमेनिम वतन

---

that Government or caste might inflict. They gave Esáji Balvantrao Belsare Joshi Kulkarni as their surety. They were then asked to state the kind of adjudication they would prefer. A's sons desired that the villagers should be called to the Huzur, and again expressed their willingness to abide by their evidence. The village Patil, Chaugula and Balutas (including Chambhar, Mhar, Maug, Barber &c.) were then brought to the Huzur, and were each separately interrogated by the Pant Sachiv, with the result that all of them were in favour of an equal division of the Watan between the two parties. They were then collected together, and the Deshpande of Supa put turmeric on their heads, symbol of hell was drawn and they were ordered to speak the truth. Both the parties adhered to their former statements. A's sons were then reminded that they had agreed to abide by the villagers' evidence, and had given an engagement to that effect and were asked whether they would now accept the opinion of the villagers, above referred to. They, however, refused to do so. The Patil and Balutas were thereupon permitted to return to the village. A's sons subsequently prayed that the Patil and Balutas might

अनभवितों ह्मणून साक्षीनिशीं सांगितलें. त्यावरून येसाजी गणेश व मल्हार जिवाजी व आबाजी निराजी व माणकोजी उद्धव यासी दादो शिवदेव यानें संवादपत्र लिहून दिल्हें तें देऊन हरदो गांवींचें ज्योतिष कुळकर्ण निंमे वतन करार करून शिरपाव देऊन हें पत्र तुह्मांस सादर केलें असे. तर तुह्मीं हरदो गांवींचें ज्योतिष व कुळकर्ण निंमे यांसी व याचे वंशपरंपरेनें चालवून कुळकर्णाची सेवा शिरस्ताप्रमाणें याचे हातें घेऊन यास सदरहू वतनास कुळकर्णाचा मुशाहिरा व हक्क व इनाम व मानपान तश्रीफ व कानू कायदे व ज्योतिषाचे बलुते व मिराशीचा वाडा पुरातन असेल तेणेंप्रमाणें चालवणें, प्रति- वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें पत्र भोगवटियासी यांजवळ परतोन देणें. याचे माथां हरदो गांवींचें वतनसंबंधें शेरणी स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा बेरीज रुपये करार करून निंमे ऐवज हुजूर व निंमे ऐवज जिल्हेकडे वसूल घेतला असे. पत्रें :—

१ मोकदमानी मौजे जळगांव परगणे सुपें व मोकदम मौजे जळगांव तर्फ कऱ्हेपठार प्रांत पुणें यांसी पत्र एक, १ वतनपत्र, २ देशमुख व देशपांडिये, २ देशाधिकारी.

एकूण सहा पत्रें देणें. पत्रें ज्येष्ठ वद्य त्रयोदशी रविवासर शके ७५ शुक्ल नाम संवत्सरे.

[ ३०२ ] आबाजी महादेव व व्यंकाजी कृष्ण देशपांडे परगणे शिरवळ या हरदो- जणांचा वृत्तीसंबंधें कजिया लागला त्यानिमित्त आबाजी महादेव हुजूर फिर्यादी जाहला; त्यावरून व्यंकाजी कृष्ण यांसी तलब करून हुजूर आणून प्रांत वाई व प्रांत कऱ्हाड व आजली महालोमहालचे जमदार यांजकडे या हरदूजणांचा इनसाफ दिल्हा. त्यास तुह्मांकडील राजेश्री

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलाखर २.

---

again be brought to the Huzur, and that the inquiry might be made by the Raja himself. The Patil and Balutas were again called up, and on being questioned expressed the same opinion as before. A's sons were then told by the Raja that their refusal to abide by the decision repeated 4 times by the villagers, was improper and was viewed with displeasure. A's sons then gave in a document stating that they had made up their quarrel with their opponents, and that both the parties should enjoy the Watan in equal shares. The document was made over by the Raja to the other party, and orders were issued to the village and district officers to accept service, and to continue the Watan accordingly.

(302) A dispute regarding the Deshpande Watan of Paragana Sirval having arisen between Abaji Mahadeo and Venkaji Krishna the former complained to the Huzur. The defendant was summoned and the District hereditary officers of Wai, Karad

A. D. 1752-53.

सदाशिव रघुनाथ याचे विद्यमानें मनसुफी केली. असें असतां व्यंकाजी कृष्ण मनसुफीस राजी जाहला नाहीं. त्यावरून हरदूजणांस तुह्मांकडे पाठविले आहेत. हे तुह्मांस राजी जाहले तरी हरएक मनसुफी करून हुजूर पाठविणें. राजी न होत तरी हरदूजण श्री महास्थळ जागृत असेल तेथें दहा महालचे जमीदार व गांवगन्नाचे पाटील श्रींचे देवाल्यीं बैसवून हरएक मनसुफी कोणाची पाठ न राखतां यथान्याय वाजवी इनसाफ करून हुजूर पाठवणें ह्मणून पत्र.—

१ राजमान्य राजश्री चिमणाजी पंडित सचीव यांसी, १ राजश्री कृष्णाजी त्रिंबक यांसी, एकूण २.

[ ३०३ ] मालोजी बिन शहाजी, बिन हिरोजी भणगा मोकदम मौजे वाघेसर तर्फ मेढें सुभा व्याघ्रगड यासी दिल्हें निवाडपत्र ऐसी जे, तुवां हुजूर शाहूनगर नजीक किल्ले सातारा येथील मुक्कामीं साहेबांसन्निध येऊन विनंति केली कीं, मौजे मजकूरची मोकदमी कदीम वतन आपले वडिलांपासून पिढी दरपिढी अनभवीत आहों. असें असतां आपल्याशीं व हिरोजी बिन नरसोजी भणगा यासी हाडभाऊपणाचा कजिया होउन हरदूजण हुजूर साहेबांसन्निध उभे राहिलों. साहेबीं यांचा व आपला करीना मनास आणोन आपणाबराबर साहेबीं कृष्णाजी मोरे हुजरे दिल्हे आणि मौजे भणंग तर्फ मजकूर येथील गोत व देशमुख व देशपांडे यांसी आज्ञा केली कीं, हरदूजणांचा इनसाफ धर्मन्यायें करणें. त्यावरून तर्फ मजकूरचे देशमुख व देशपांडे व भोवरगांव व मौजे भणंग व मौजे मजकूरची समाकूळ पांढर यांणीं श्रींचे

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब २३.

---

and other Mahals were directed to inquire into the case. Venkaji Krishna being dissatisfied with their decision, the parties were then sent to Chimnaji Pandit Sachiv and Krishnaji Trimbak, with instructions to investigate the matter in case the parties agreed to abide by their d[illegible] to report the result to the Huzur. In case the parties refused to abide by their decision, the Pant Sachiv and Krishnaji Trimbak were directed to take the parties to a sacred temple of fame, and there to decide their dispute with strict impartiality, with the assistance of the Jamidars and Patils of 10 Mahals, who should be assembled for the purpose, and to report the result.

(303) A dispute regarding the Patilki Watan of Waghesar in Tarf Madhe of Subha Vyaghragarh having arisen between Maloji Bhanange and Hiroji Bhanange, both came to the Huzur. The Raja ordered the Deshmukh, the Deshpande and the caste people of the village of Bhananga to inquire into the matter, and

A. D. 1752-53.

स्थळीं बसोन हरदूजण वादियांच्या तकरीरा व वर्तावयाचे जामीन घेऊन निवाडा केला. त्यास हिरोजी बिन नरसोजी याच्यानें कलमाचा झाडा न होय व साक्षमोज्याही पुरे जाहला आणि कजिया करितो. आडनांवाचा भणगा, आपला हाडभाऊ नव्हे, आगांतुक असें खरें जालें. तेव्हां देशमुख व देशपांडे व समस्त गोत यांणीं आपल्यास पुशिलें कीं, हिरोजी तुमा हाडभाऊ नव्हे असें झालें. परंतु याच्या वडिलानें तुमची सेवा चाकरी केली आहे, यासी बसावयास जागा व शेत देऊन थळवाईक आगांतुक म्हणून यासी राहूं देतां कीं नाहीं? त्यावरून आपण बोलिलों जे, तुह्मीं गोत मायबाप आहां जे आज्ञा कराल त्याप्रमाणें वर्त-णूक करूं. समस्त गोतानें आज्ञा केली कीं, तुह्मीं मौजे मजकूरपैकीं समाकूळ पांढरीमध्यें घर बांधावयासी जमीन लांबी हात सुमारें ३० व रुंदी हात सुमारें १६ येणें-प्रमाणें नेमून देणें, व मौजे मजकूरपैकीं शेत अवल दुमसीम तीन प्रतींची जमीन बिघे ... तीसचा पाटीलकीचा हक येणेंप्रमाणें देऊन थळवाईकपणें ठेवणें ह्मणून. त्यावरून आह्मी समस्त भाऊ बसोन विचार करून आपले आत्मसंतोषें सदरहूप्रमाणें घरास जागा व शेत देऊन थळवाईकपणें ठेवावा असें केलें. त्यास समस्त गोतानें समजावीस केली असतां हिरोजी बिन नरसोजी भणगा गैरराजी होऊन साहेबांसंनिध येऊन हुजूर उभा राहिला. त्यावरून महा-राज साहेबीं देशमुख व देशपांडे व समस्त गोतास व आपल्यास हुजूर सातारियाचे मुकामीं आणून त्यास व सभानायकांस आज्ञा केली कीं, या हरदूजणांचा हरएक न्याय करणें. त्यावरून त्याणीं आह्मां हरदूजणांस पुरशीस केली, आणि हिरोजी भणगा यासी पुसिलें जे, मनसुफी झाली त्यास तूं राजी नव्हेस, तरी तुझें काय वर्तमान असेल तें निवेदन करणें. त्यास हिरोजीस तेव्हांही कलमाचा झाडा नव्हे व त्याच्या साक्षमोझ्याही न पुरे. तेव्हां हिरोजी बोलिला कीं, तुह्मीं इनसाफ केला त्याप्रमाणेंच आपण मान्य आहे, मालोजी बिन शहाजी भणगा मोकदम यासी आपण हाडभाऊपणाचा वाद सांगत होतों तो खोटा जाहला. आपणांस मौजे वाघेसर तर्फ मजकूर येथील पाटिलकीशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं. कालकला आपले वंशींचा होऊन मालोजी बिन शहाजी भणगा मोकदम यासी पाटिलकीविशीं अगर भाऊ-पणाशीं कजिया करील तो दिवाणचा खोटा व गोताचा अन्यायी, ह्मणून इजीतखत लिहून दिल्हें. तें मनास आणून भोगवटियासी निवाडपत्र करून देऊन वतन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे ह्मणून विदित केलें. त्यावरून मनास आणून तुझें मौजे मजकूरचें मोक-

---

sent the parties to them in charge of a Government officer. These people assembled in the temple and took down the statement of both the parties. Hiroji failed to substantiate his allegation, and the Panch decided that he had no connection with Maloji and with the Watan. In view of the fact that Hiroji's father had served Maloji's family, the Panch directed

दमीचें वतन पुरातन, असें जाणून साहेब तुजवरी कृपाळू होऊन मोकदमीचें वतन तुज अजरामऱ्हामत करून दिल्हें असे. तरी मोकदमीचा मानपान, नांव, नांगर व हकलाजिमा व कानूकायदा तुझ्या वडिलांपासून सुदामत चालत आला असेल त्याप्रमाणें तूं व तुझे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें मौजे वाघेसर तर्फ मजकूर येथील मोकदमीचें वतन अनभवून सुखरूप राहणें. हिरोजी बिन नरसोजी मणगा यासी समस्त गोत यांणीं मौजे मजकूर-पैकीं समाकूळ पांढरीमध्यें घर बांधावयासी जमीन लांबी हात सुमारें २० व रुंदी हात सुमारें १९ येणेंप्रमाणें व मौजे मजकूरपैकीं शेत अवल दुमसीम तीन प्रतींची जमीन बिघे + तीस याच्या पाटिलकीचा हक्क दिल्हा आहे. त्याप्रमाणें त्याणें घेऊन आगांतूक थळवाईकपणें मौजेमजकुरीं सुखवस्तीनें असावें. मौजे वाघेसर येथील मुकदमीशीं त्यासी संबंध नाहीं. या वतन-संबंधें तुझे माथां शेरणी स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फादेखील सरदेशमुखी रुपये २०० करार निंमे ऐवज हुजूर व निंमे जिल्हेकडे वसूल घेतला असे ह्मणून निवाडपत्र १.

[ ३०४ ] आप्पाजी पाटील मौजे सोवेळी कसबा औंध यासी पत्र जे, दुधावजी जाधव पुसेगांवकर यासी गाई २ व बैल २ एकूण चार गुरें विकत देऊन रुपये १९ घेतले. तीं गुरें मौजे मजकूरचा जबा सुतार याणें आपलीं ह्मणून नेलीं. त्यास तीं गुरें ४ व रुपये व्याजसुद्धां घेऊन हुजूर येणें. या कामास हुजरे पाठविले त्यांस देविले रुपये :—

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल १२.

९ धनाजी जाधव, ९ जनाजी जाधव, एकूण १०.

---

Maloji to give Hiroji a site to build a house on, and 30 Bighas of land. Maloji consented to the arrangement. Hiroji, however, was dissatisfied with the decision and applied for further inquiry. The Deshmukh, the Deshpande and the castemen of the village were called to the Huzur, and they and the members of the Raja's council were directed to investigate the matter. Hiroji again failed to produce evidence and admitted his defeat. A Sanad conferring the Watan on Maloji was issued to him.

( 304 ) Appaji Patil of Soweli, in Karyat Oundh, sold two cows and two bullocks to Dudhavji Jadhav for Rs. 15. The cattle belonged to Jaba Sutar, and were taken away by him. Apaji was directed to repair to the Huzur, with the cattle and the above sum together with interest.

A. D. 1752-53.

[ ३०५ ] मोकदमानी मौजे सोनापूर तर्फ सातारा यांसी पत्र जे, मौजे मजकुरी पिराजी रणनवरे याची स्त्री कासाई रणनवरे बुधवंतराव मोरे याच्या वाड्यांत होती ती मृत्यु पावली. तिजला संतान नाहीं याजबद्दल तिचे भाचे जोत्याजी कोटकर यासी वस्तभाव व बटीक जे असेल तें देवविलें असे. बुधवंतराव याचे विद्यमानें देऊन पावलियाचें कबज घेणें, पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिल्काद ११.

[ ३०६ ] मोकदमानी मौजे शिदनाथवाडी संमत हवेली प्रांत वाई यासी पत्र जे, मौजे मजकूर पेशजींपासून नागजोशी यासी दुतर्फा इनाम आहे ते मृत्यु पावले. याची स्त्री प्रयाग, काशी, गया त्रयस्थळी यात्रा करून आली, तिजला यात्रेमुळें कर्ज जालें तें पुत्रांनीं फारिक करावें तें करीत नाहींत, याजबद्दल मौजे मजकूर नागजोशी याच्या पुत्राकडे इनाम आहे तो अमानत करून काशीयात्रेचें कर्ज वारावें याबद्दल हुजूर खासगीकडे ठेविला आहे. तरी मौजे मजकूरचा ऐवज हिशेब घेऊन हुजूर येणें. या कामास शिदोजी तोडकर दिंमत हुजूर पाठविला यास मसाला रुपये तीन देणें पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिल्काद १४.

[ ३०७ ] राजश्री रायाजी जाधवराऊ यास जाब जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें कीं, चंद्रभान बेलदार याणें सबुंवन गोसावी जटाधारी यास दारू पाजिली यामुळें गोसावी मृत्यु पावला. हें वर्तमान आपणांस कळलियाउपरी बेलदार गोसावियाचे स्वाधीन केला ह्मणून लिहिलें, विदित जालें. पाटील हिरामणी चोपदार मिरधे आखेराज.

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
सफर १९.

---

(305) A Maratha lady having died without issue, her property, together with her female slave, was ordered to be given to her husband's sister's son.

A. D. 1752-53.

(306.) The village of Sidhanath Wadi in Pargana Wai was an Inam to Nag Joshi. On his death his widow went on a pilgrimage to Prayag, Benares and Gaya. This involved her in some debt which her sons refused to pay off. The village in question which was in the possession of the sons, was therefore ordered to be attached for repayment of the debt.

A. D. 1752-53.

(307) Chandrabhan, a mason, gave liquor to a Gosavi to drink. The Gosavi died from the effect of the liquor. Rayaji Jadhavrao therefore handed over the mason to the Gosavi, and informed the Raja of his action.

A. D. 1726-27.

[ ३०८ ] शेट्याजी राऊत यास दिलें अभयपत्र ऐसी जे, तुमा बंधु शिदोजी राऊत मुकाम माची किल्ले वंदनगड याणीं राख ठेविली होती तिशीं याचा चुलत बंधु बकाजी अकर्मी प्रवर्तक होता त्यास एक दोन वेळां ताकीद केली परंतु ऐकिलें नाहीं. त्याउपरी बकाजी व रांड शिदोजी राऊत याचे घरीं एकजागा धरून दोघांसही जिवें मारिली, खून जाहला. हें वर्तमान हुजूर लिहून पाठविलें. खुनाची दहशत घातलियाबद्दल खून माफ ह्मणोन पत्र दिलें. चुलत बंधु मारला याचें प्रायश्चित घेऊन शुद्ध होणें. अभय असे ह्मणून अभयपत्र १.

इ. स. १७३५-३६.
सित सलासीन मया व अलफ.
रबिलावल ४.

[ ३०९ ] किर्त्तापत्र चिटणिशी वैशाख शुद्ध पंचमी रविवार पिंगळ नाम संवत्सरे बनाम मोकदमानी मौजे घारगांव परगणे कर्डेरांजणगांव यासी आज्ञा केली ऐसी जे, दावजी पाटील मडका मौजे पारगांव तर्फ चांभारगोंदे परगणा कडेवलित याणें हुजूर येऊन विनंति केली कीं, सदरहू दो गांवींचीं मुलें रानांत गुरें चारीत असतां दोन फौजा करून घारगांवकर मोंगल आणि पारगांवकर मराठे ऐसे होऊन पांच रोज भांडत होते. त्या खेळामध्यें पारगांवकर मुलांनीं घारगांवकर मुलांस पिटून काढिलें. तेव्हां पळतांना मौजे मजकूरचा हजामाचा पोर तोंडघशीं पडून कपाळ फुटलें आणि मयत पंधरा विसा रोजांनीं जाहला. याकरितां हजामाचे पोराची आई अहंमदनगरास फिर्याद जाहली. तेथें काजीशरा याणीं इनसाफ केला कीं, मुलांचा कज्या आहे त्यांत खुनाचा दावा पोंचत नाहीं, खून माफ. असें ह्मणून कागद शराचा करून दिल्हा असतां हजामीण जागा जागा फिर्याद देत फिरते. तर महाराजांनीं इनसाफ करून हुकूम करणें तो करावा ह्मणोन अर्ज केला. त्यावरून मनास आणतां तुमचे भांडणा-

इ. स. १७३६-३७.
सबा सलासीन मया व अलफ.
मोहरम ४.

---

(308) Sidhoji Raut of Machi Vandangarh, had a mistress. His cousin Bukaji kept on illicit intercourse with her. He was warned once or twice but without effect. On one occasion Sidhoji found Bukaji and the woman together in his house. He put them to death. He was afraid of being taken to task for the murder. At the request of his brother, a free pardon was granted to him and he was directed to undergo the necessary penance and purify himself from the sin of murdering his cousin.

A. D. 1735-36.

(309) The boys of the village of Ghargaon in Pargana Karde Ranjangaon and those of the village of Pargaon in Tarf Chambhargonde while pasturing cattle in the forest, arranged a fight between them, the former representing the Moguls and the latter the Marathas. The fight lasted for five

A. D. 1736-37.

मुळें पोर मेला त्या खुनाचा दावा वाजवी नाहीं. ऐसें जाणोन काजीनीं इनसाफ केला आहे त्याप्रमाणें करार करून पारगांवकरास खुनाचें लिगाड माफ केलें असे. दावजी पाटिलास शिरपाव मुंडासे देऊन खून माफ केला असे. तुह्मीं हजाम मजकुरास व त्याचे बायकोस ताकीद करून खुनाचा कज्या (?) करून यावें. फिरोन बोभाट आल्यास कार्यास येणार नाहीं. पारगांवीं कज्या करावयास संबंध नाहीं. ताकीद असे ह्मणून पत्र १.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
साबान १७.

[ ३१० ] किता एक अभयपत्र चिटणिशी कार्तिक बहुल चतुर्थी इंदुवासरे तारा नाईक व शंकरराव इंद्रजीत नाईक लमाण यांसी दिल्हें अभयपत्र ऐसी जे, परसा नाईक लमाण याचा तुमचा जातीविशीं दावा होता त्यामुळें तुह्मां हरदूजण दावेकरांची कटकट होऊन युद्ध जाहलें. तेसमयीं परसा नाइकाच्या तांड्यांत सरकारचे गोविंद सांखराव, सकरू कोटी कोठीवाले व माधव कारकून हे होते. युद्धसमयीं माधव कारकून मारला गेला. हें वर्तमान कोठिवाल्यियाणीं येऊन हुजूर विदित केलें. त्यावरून तुह्मांस तळेगांवचे मुक्कामीं तलब करून हुजूर आणून किल्ले सातान्यावरी कैदेंत ठेविलें. याजकरितां सखापा नष्टा खरडेकरी याणें स्वामीसंनिध विनंति केली कीं, लमाण मजकुराचा कज्यामुळें सरकारचा कारकून मारला गेला. याची गुन्हेगारी लमाणापासून घेऊन महाराजांनीं अन्याय माफ केला पाहिजे. ह्मणून त्यावरून मनास आणून सरकारचा कारकून माधव मारला गेला, याची गुन्हेगारी तुमचे माथां रुपये १९००० ठेवून सखापा नष्टा याचे गुजारतीनें हुजूर पोता वसूल घेऊन हें

---

days with the result that the boys of Pargaon routed the boys of Ghargaon. In the pursuit a barber's son of Ghargaon fell down while running and died some days afterwards. His mother complained to Kaji Shara at Ahamadnagar who decided that the facts disclosed no offence of murder and granted a certificate to that effect. The woman was not satisfied and went on complaining to one authority after another. Dawaji Patil of Pargaon represented the matter to the Raja and prayed for his decision. The Raja took the same view as the Kaji, and confirmed the order passed by the latter. Clothes of honour were given to the Patil. The Patil of Ghargaon was asked to direct the woman to abstain from making any further complaint in the matter.

A. D. 1740-41.

(310) In a caste dispute which took place between Tara Naik and Shankarrao Indrajit Naik Laman on the one hand and Parsaji Naik on the other, a Karkun of Government who was with the latter was killed. Tara and Shankarrao were

अभयपत्र सादर केलें असे. तरी तुह्मीं आपले तांड्यामध्यें जाऊन हरएक जागा हरजिन्नस खरेदी फरोक्त करून तांडा चालवून उदीम व्यवसाय करून सुखरूप राहणें येविशीं अभयपत्र.

[ ३११ ] महादजी खांडके यांस आज्ञा जे, तुझे सुनेनें विहिरींत जीव दिला याजकरितां मौजे मांडवेकर राजश्री धनसिंग जाधव याणें येऊन विदित केलें [suici] तुझें बायकोनें मारली ह्मणून बोलिला. त्यावरून तुज हुजूर आणून मनास आणून तहकिकात केली व तुजकडे खुनाचा लाझ्या (?) नाहीं. मुलीनें आपले आपण जीव दिल्हा आहे हें खरें झालें. त्याजवरून तुज हें अभयपत्र दिल्हें असे. तर तुजकडे खुनाचा लाझ्या (?) नाहीं. तुज खुनाचा लाझ्या (?) लागणार नाहीं. अभय असे ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सफर १०.

( ३१२ ) मोकदमानी मौजे हिंगणे गांव प्रांत पुणें यासी आज्ञा जे, कावजी नाईक कोळी चाकर सरकार याचा लेंक बापूजी कोळी यास सटवोजी कोळी मौजे मजकूर याणें विष घालून मारलें ह्मणून भिकाजी कोळी याणें विदित केलें. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तर कोळी मजकुरास हुजूर पाठवून देणें. देखत आज्ञापत्र हुजूर पाठवणें पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सफर २६.

[ ३१३ ] मोकदमानी मौजे कांबळे डबिराचें तर्फ शिरवाडी यासी पत्र जे, येमाजी करंजवणा वस्ती मौजे सेले तर्फ मजकूर याची आई महाडास बाजारास गेली होती ती फिरोन घरास जातां मार्गें कोणीं मारिली, वस्तभाव नेली ह्मणून विदित जाहलें. तरी बायको मारिलियाचा थाक तुह्मीं

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सफर २७.

---

therefore kept in confinement at Satara. They were released on payment of a fine of Rs 15000, and were permitted to carry on their trade of carriers.

(311) A woman being beaten by her mother-in-law committed suicide. Her father-in-law, Mahâdâji Khandke, was brought to the Huzur and inquiries were made, with the result that he was acquitted.

A. D. 1752-53.

(312) A Koli of Hinganagaon in Prant Poona was poisoned by another Koli. The latter was called to the Huzur.

A. D. 1752-53.

(313) A woman on her way back from Mâhâd, where she had gone for marketing, was murdered, and her property was taken away. The Mokadam of Kamble

A. D. 1752-53.

लावून देणें, आणि मौजे मजकूरचे मोकदम हुजूर येणें. या कामास जानोजी नवलेकर हुजूर पाठविले यासी मसाला रुपये ९ देणें ह्मणून पत्र १.

[ ३१४ ] शिदोजी भुडका वस्ती कडवे तर्फ तारळे यासी पत्र जे, तुझे सुनेनें प्राण दिल्हा त्याची तहकिकात करावी लागते, तर हुजूर येणें. या कामास सटवोजी पोळ व शिवजो संकपाळ पाठविले हुजरे यांसी मसाला रुपये १० देणें पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसेन मया व अलफ.
रबिलावल १३.

[ ३१५ ] राजश्री हैबतराव भवानीशंकर सुभेदार प्रांत वाई यांसी आज्ञा केली ऐसी जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें त्यास सुकाळ्याच्या लेंकानें कोष्टियाचा पोर मारिला, पोराच्या आंगावरील कडें रुप्याचें व कुडक्या घेतल्या, त्यावरी मार दिल्हा तेव्हां वस्ता आणून दिल्या. सुकाळ्याकडे खून शाबूत जाहला. खुनाचे रुपये ३५० व दिवाणची गुन्हेगारी दोनशें रुपये एकूण साडेपांचशें रुपये घेऊन सुकाळ्याचें घर कैद केलेंत, त्याचें त्यांस घर देणें. मुडद्यास मूठमाती देणें. गुन्हेगारीचे रुपये हुजूर पाठविणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसेन मया व अलफ.
जमादिलावल ९.

[ ३१६ ] राबदारी व मसूरकर जगदळे व लोक दिंमत पंडित प्रतिनिधि यांसी आज्ञा केली ऐसी जे, मौजे एकसळ संमत कोरेगांव येथें राजश्री सोइरो नरसिंह दफतरदार दिंमत मजमू राजश्री गणेश निळकंठ दिंमत राजश्री पंत प्रतिनिधि यांजकडे मुकासबाब व बाबती व खालसा

इ. स. १७५२-५३.
सलास खमसेन मया व अलफ.
जमादिलाखर १.

---

Dabirache in Tarf Birwadi was directed to trace the offender, and to come to the Huzur.

(314) Shidoji Bhudaka's daughter-in-law committed suicide. He was therefore called to the Huzur for inquiry.

A. D. 1752-53.

(315) A son of a man surnamed Sukâlà murdered a weaver's son and took away from his person, a silver bangle and ear ornaments. On being beaten, he produced the ornaments in question. He was proved guilty of murder, and the matter being reported to the Huzur by the Subhedar of Wai, a sum of Rs. 350 as compensation for murder and a Government fine of Rs. 200, were ordered to be levied from him. The amount of fine was to be remitted to the Huzur.

A. D. 1752-53.

(316) A man surnamed Jagdale of Masur, while going for the celebration of a marriage in his family, haulted at Eksal in Samat Koregaon. The villagers of Eksal

A. D. 1752-53.

मोगलाई मुकासा आहे त्याऐवजीं जमीन, शेतें व मळे नेमणूक आहे. त्याऐवजीं जगदळे याचें काम मार्गें जात होतें त्यास शिमग्याचें पोस्त गांवकरी मागत होते. मसूरकरांनीं कटकट करून गांवकरियांचीं माणसें मारून जाया केलीं; गांवकरियांची काठी लागून जगदळे यांजकडील परीट मृत्यु पावला. याकरितां गांवकरी परागंदा जाहले त्यांस कौल पाठविला आहे. वसाहत करून आबादी करणें म्हणून पत्र.

ई. स. १७५२-५३. सलास खमसैन मया व अलफ. सवाल १९.

[ ३१७ ] अभयपत्र तुकाराम कुळकर्णी मौजे तांबरें याचे सुनेनें जीव दिल्हा सबब तिच्या भ्रतारानें तोंडावर मारिली म्हणून. त्यास याचा शास्त्रार्थ कऱ्हाडकर ब्राह्मणांनीं मनास आणिला. त्यावरून कुळकर्णी याजकडे व त्याच्या पुत्राकडे कांहीं अपराध नाहीं म्हणून पत्र दिल्हें. त्यावरून हुजुरून अभयपत्र दिल्हें जे, तूं सुखरूप राहणें. कोणे गोष्टीचें भय नाहीं म्हणून पत्र.

ई. स. १७५२-५३. सलास खमसैन मया व अलफ. मोहरम १३.

[ ३१८ ] राजसबाई पाटणकर यासी आज्ञापत्र जे, तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें, लिहिलें वर्तमान विदित जाहालें. कित्येक आपले एकनिष्ठेचा अर्थ लिहिला एसीयास तुम्हीं पुरातन सेवक एकनिष्ठच आहां. यानंतर धारराव पाटणकर याणीं संभापूर पेठेंतून उदमी नागविले म्हणून लिहिलें तर तुम्हीं व ते भाऊबंद आहां आपल्यामध्येंच समजावें हे उत्तम आहे; दरबारीं या गोष्टी कार्याच्या नाहींत. राजश्री धारराव यासही आज्ञापत्र सादर केलें असे म्हणून पत्र छ ११ मोहोरम १.

---

asked for a present on account of the Shimga holidays. Jagdale's men refused. A scuffle ensued in which some of the villagers received mortal injuries, and a washerman of the side of Jagdale was killed. The villagers consequently absconded. A Kowl was therefore issued to the Jagdale and the people under the Paut Pratinidhi, to populate the village.

A. D. 1752-53.

(317) A son of Tukaram, Kulkarni of Tambure, having slapped his wife in the face, she committed suicide. The Brahmins of Karad after consulting the Shastras, gave a decision exonerating the Kulkarni and his son from blame. An order was accordingly issued from the Huzur.

A. D. 1752-53.

(318) Dharrao Patankar used to arrest the traders of Patan, who went on business to Sambhapur Peth, and to beat and imprison them. Rajasbai Patankar brought this fact to the notice of the Government. Dharrao was directed to release at once any traders confined by him, and to take care that no such complaints again reach Government. Rajasbai was at the same time informed that it

मौजे जांब - परगणे खटाव -
परगणे सिनर



राजश्री धारराव पाटणकर यासी आज्ञापत्र जे, संभापूर येथील पेठेंत बाजारास कसबे पाटण येथील लोक व कुळें कासार शिंपी व साळी वगैरे कुळें जातात त्यांस तुम्हीं धरून नेऊन अटक करून मारामार करतां म्हणून हुजूर विदित जाहलें. दरम्यान मुलुकांत नानाप्रकारच्या टोंगाईच्या गोष्टी कोणी केल्या त्यांस हुजुरून पारपत्य करावें परंतु हें वर्तमान तुम्हांकडून न व्हावें, आणि तुम्हीं लोक एकनिष्ठ सेवक पुरातन राज्यांतील, याजवरून हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें असे. तर देखत आज्ञापत्र जीं कुळें नेलीं असतील तीं सोडून देणें. एक घडी उजूर करणें. फिरोन आपला कमावीसदार अगर दिवाण असतील त्यांस ताकीद करणें जे, ऐसी मनस्वी वर्तणूक न करीत. फिरोन बोभाट येऊं न देणें. म्हणून पत्र छ ११ मोहरम १.

[ ३१९ ] हातरोखे राजश्री येशवंतराव दाभाडे सेनापति व त्याची स्त्री सौभाग्यवति अंबिकाबाई दाभाडे यास खासदस्तकाचीं पत्रें जें, मौजे निंबगांव परगणे सिंनर येथील कमावीसदाराशीं कजिया करून त्याची वस्तभाव नेली आहे म्हणून हुजूर विदित जाहलें. हा गांव दरुणी महालवाडा पहिला याजकडे आहे तेथील वस्तभाव न्यावयास गरज काय? हल्लीं हे आज्ञापत्रें सादर केलीं आहेत. तरी जे वस्तभाव नेली असेल ते जराबाजरा सोडून देणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. या कामास दर्याजी नाईक पवार पाठविला असत तरी यास खर्चास देणें रुपये.

इ. स. १७४६-४७. सबा अर्बैन मया व अलफ. सफर ६.

२०० सौभाग्यवति अंबिकाबाई यांजकडे, १०० राजश्री येशवंतराव दाभाडे सेनापति यांजकडे, एकूण ३०० पत्रें २.

[ ३२० ] मोकदमानीं मौजे कटगूण परगणे खटाव यांसी आज्ञा केली ऐसी जे, राजश्री केशवराव शिंदे शिलेदार पथक हुजुरात यांच्या म्हशी मौजे जांब परगणे मजकूर येथून बेरडांनीं चोरून दोन म्हशी नेल्या. त्याचा माग मौजे मजकुरीं लागला. तो माग तुम्हीं कबूल करून म्हशी

इ. स. १७४६-४७. सलास खमसैन मया व अलफ. मोहरम ४.

would be better for them to settle their disputes between themselves without reference to Government.

(319) Yeshwanrtao Dabhade Senapati and Ambikabai Dabhade, quarrelled with the Kamavisdar of Nimbgaon in in Pargana Sinner and removed his property. This village was assigned to the first wife of the Raja, and the Dabhades had no right to take away any property from the village. They were ordered to restore it and to pay Rs. 300 (Ambikabai Rs. 200, and Yeshwantrao Rs. 100) to Daryaji Naik who took the order.

A. D. 1752-53

(320) Two she-buffaloes of Keshavrao Shinde, a Shilledar, were stolen away by the Berads from Jamb. The theft having been traced to the village of K atg oon, the

A. D. 1752-53.

म्हसयाचा करार करून तुह्मीं कतग्रा मानाजी पाटील शिंदे व सुरसिंग शिंदे पाटील मौजे जांब याचे नांवें लिहून दिल्हा. त्यास ह्मशी नेल्या त्या द्याव्या किंवा त्यासारिख्याच ह्मशी द्याव्या. तें न करितां वांज ह्मैस व ह्मातारी ह्मैस देतां ह्मणून हुजूर विदित जाहलें. त्यावरून आज्ञापत्र सादर केलें असे. तरी केशवराव यांच्या ह्मशी देऊन पावलियाचें कबज घेणें किंवा हुजूर येऊन ह्मशीचा निकाल करणें. या कामास संताजी जाधव हुजरे व पोकरोजी जाधव पाठविले यासी मसाला रुपये १० देविले असत. आदा करणें ह्मणून ★ २९ माहे जिल्हेज १.

[ ३२१ ] पार्वती भोसली यासी आज्ञा जे, प्रांत कुडाळ व प्रांत राजापूर वगैरे प्रांतीचे लोक श्री महायात्रेस जात असतां तुह्मीं शिराळे प्रांतीं जराबाजरा लुटोन घेतले असे नादान. तर ज्याची वस्तभाव जराबाजरा घेतली असेल ती यात्रुकरांस देऊन पावलियाचें कबज घेऊन हुजूर पाठविणें. या कामास बाहिरजी लोंढे व गोपाळजी जाधव व बापूजी गाइकवाड व निंबाजी कदम हुजऱ्यांचे विद्यमानें वस्तभाव यात्रकरांचे पदरीं घालणें. हुजुऱ्यास मसाला रुपये २० देणें याविशीं पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहोरम ७.

[ ३२२ ] मसणु बेरड असामी दोन २ वस्ती मौजे गुळुंब प्रांत वाई यांसी आज्ञा जे, मौजे इसलामपूर कर्यात दहिगांव येथें चोरी करून गुरें नेलीस त्याजवरून मौजे मजकुरीहून मांग मौजे डांभेवाडी प्रांत खटाव येथें आणिला. तेथें बेरड मेळवून शोध करितां तुजकडे मुद्दा शाबूत जाहला. तूं कबूल जाहलास ह्मणून हुजूर विदित झालें. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी देखत आज्ञापत्र गुरें आणलीं तीं माघारीं देणें. नवदिगर केलिया मारले जाल हें स्पष्ट समजोन ॥

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर ९.

---

Patil of the village agreed in writing to surrender the animals in question to the Patil of Jamb. Instead of surrendering the she-buffaloes stolen or others similar to them, the Patil of Katgun offered to give one barren and one old she buffalo. He was ordered to surrender the animals stolen, or to come to the Huzur.

( 321 ) Parwatibai Bhosle plundered, in the Prant of Sirale, certain persons from Prant Kudal and Prant Rajapur who were going on a pilgrimage to Benares. She was censured and directed to restore all the property, obtained by her, to its owners.

A. D. 1752-53

( 322 ) Masnu Berad of Gulumb in Prant Wai carried off some cattle from Islampur. The theft was traced up to Dambhe-wadi. The Berads of the village were

A. D. 1752-53.

गुरें पाठवून देणें. या कामास कोंडजी पवार व तुकोजी गाइकवाड पाठविला यासी मसाला रुपये १० देणें म्हणून पत्र १.

[ ३२३ ] मोकदमानी मौजे जळगांव संमत कोरेगांव यास आज्ञा केली जे, मौजे वर्णे तर्फ सातारा येथून बाजारकरी वाणियाचा बैल चोरून नेला १ त्याचा माग मौजे मजकुरीं लागला म्हणोन विदित जाहलें. तरी तूं व मांग हुजूर येणें, नाहींतरी बैलाचा भाग वारून देणें. या कामास तुळाजी गाइकवाड व राघोजी जाधव हुजुरे पाठविला यास मसाला रुपये २ देणें पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर २७.

[ ३२४ ] नवलोजी शिंडाला वस्ती कुडाळ यासी आज्ञा जे, भवान सावत नोकर याचे घरीं त्याची मेहुणी नवरी होती ते न्यावयासी तूं आलास. ते हातास न चढली याजनिमित्य सावत मनकूर याचें घर लुटून नेलेंस म्हणवून हुजूर विदित जाहलें त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें. तरी भवान सावत याची वस्तभाव जे नेलीस ते देऊन तूं हुजूर येणें. या कामास आप्पाजी सावत व रवळोजी तोडकर पाठविला यासी मसाला रुपये १० देविले असत म्हणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास सलासैन मया व अलफ.
जमादिलाखर २८.

[ ३२५ ] मौजे रेठरें हरणाक्षाचें प्रांत कऱ्हाड यांसी ताकीद मौजे म्हसोली प्रांत मजकूर येथें सरदेशमुखाकडील वाटेकरी याचें घर चोरानें फोडून बैल ३ तीन, म्हशी ४ चार व रेडा १ एकूण ८ गुरें नेलीं

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब २८.

collected, and inquiries were made which proved Masnu to be the offender. He confessed, and was directed to restore the cattle. He was given distinctly to understand that failure to do so would cost him his life.

(323) A bullock belonging to a Bania, who had come to the market at Warne in Tarf Satara, was stolen. The theft was traced to Jalgaon in Samat Koregaon. The Patil of the latter village was directed to restore the bullock or to come to the Huzur. An order to the same effect was issued to the Berads of Nandgiri.

A. D 1752 53

(324) Bhawani Sawat's wife's sister was staying with him. Her husband Nawaloji of Kudal, came to take her to his house. But he could not get possession of her. He therefore plundered Bhawani's house and took away his property. He was directed to restore it, and to come to the Huzur.

A. D. 1752-53.

(325) The house of a tenant of a field comprised in the Sir Deshmukhi Watan (belonging probably to Government) at Mhasoli, was broken into by thieves, and 8

A. D. 1752 53.

त्यांचा माग मौजे मजकुरास आला. त्यांस पुढें माग काढून देणें. पुढें माग लावून देत नाहीं तर सदरहू आठ गुरें त्याचीं त्यास देणें लागतील १.

[ ३२६ ] येसाजी बोधे वस्ती मौजे दुघी संमत कोरेगांव प्रांत वाई यांसी आज्ञा केली ऐसी जे, तुम्हीं आपले चाकर पाठवून मौजे शिरंबे, मौजे एकसळ व मौजे निगडी संमत मजकूर या गांवचे पोस्ताचे बांधाचें गवत बळेंच कापून नेविता व रामजी शिरका निसबत सुभा हा गांवगन्नाचीं तहसिलें घेऊन येत होता त्यांस तुम्हीं मारिलें व रसदेचा ऐवज वस्त्रें व झोळणा घेतला म्हणून विदित जालें. तर याउपरी देहाय मजकूरचें शेताचें गवत राखिलें आहे; कापून न नेणें. रामजी शिरका यांजकडील रसदेचा ऐवज व वस्त्रें झोळणा घेतला आहे तो घेऊन तुम्हीं हुजूर येणें. या कामास लोक पाठविले यास देविले रुपये. १

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल ७.

[ ३२७ ] राजश्री मुद्राधारी व लेखक किल्ले चंदनगड यांसी पत्र जे, मौजे पळशी संमत वाघोली येथील निंबाजी पाटील याचीं गुरें मौजे पिंपवडे संमत मजकूर येथें किल्ले मजकूरच्या लोकांचीं शेतें आहेत त्यांत गेलीं म्हणून तुम्हीं निंबाजी यांसी कज्यास नेऊन दहा रुपये मसाला घेतला. गुरें चुकोन गेलीं म्हणून मसाला घ्यावें ऐसें नाहीं. तरी तुम्हीं किल्ल्याचा कारकून हुजूर पाठविणें; त्याजबद्दल सरकारचा हुजऱ्या देऊन शेतांची चौकशी मनास आणून आज्ञा कर्तव्य ते केली जाईल आणि निंबाजी पाटील यासी सोडून देऊन त्याचे घरीं चौकी बसविली आहे ते उठवून नेणें. पाटिलापासून मसाला रुपये १० घेतले ते फिरोन माघारे देणें पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिलकाद २.

---

heads of cattle were taken away. The theft was traced to the village of Rethare Harnaksh in Prant Karad. The village officers were directed to pursue the trace further, or to restore the cattle.

( 326 ) Yesaji Bodhe of Dughi in Samat Koregaon used to remove through his servants, grass growing on the boundaries of fields at Sirambe, Eksal and Nigadi. He also forcibly took away on one occasion Government cash which Ramji Sirka, a servant at the Subha, was carrying from the village. He was directed to abstain from removing the grass any longer and to come to the Huzur with the cash plundered.

A. D. 1752-53.

( 327 ) The cattle of Nimbaji, Patil of Palshi Samat Wagholi, strayed into certain fields at Pimpawade, belonging to the people serving at the fort of Chandangarh. The officers of the fort took Nimbaji to the fort, and levied Rs. 10 as fine from him. They were informed that it was improper to levy fine on account of cattle straying into fields, and were ordered to release Nimbaji

A. D. 1752-53.

[ ३२८ ] कित्तापत्र चिटणिशी चैत्र शुद्ध पौर्णिमा भृगुवासर मोरभट नागपूरकर यांची

इ. स. १७४४-४५.
खमस अर्बैन मया व अलफ.
रबिलावल १५.

कन्या रमा इच्या भ्रतारास वेड लागोन देशांतरास गेला. हे आपल्या बापाचे घरीं होती. मोरभटाचा चुलतभाऊ यांणें पापदृष्टि धरली. त्याम हे बोलिली कीं, तूं आपला चुलता आणि आपले ठायीं पापबुद्धि धरितोस हे गोष्ट कार्याची नाहीं. त्यावरून त्याणें इजवरी आणखी कांहीं तुफान घेऊन दिवाणाकडून मसाला रुपये ३५ घेवविले व मोरभटाचें घर दग्ध केलें. तुम्हींही त्रिंबकभटाचा पक्ष धरून मोरभटास उपद्रव करितां ह्मणून मोरभटानें हुजूर येऊन विदित केलें. त्याजवरून मनास आणितां मोरभटाकडे कांहीं लाझ्या नसतां लटकीं तुफानें घेऊन उपद्रव करितात तर हे लबाडी कार्याची नाहीं. तर हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी मोरभटास व याची कन्या रमा ईस कोणे गोष्टीविशीं उपद्रव न करणें. फिरोन बोभाट आलियानें मुलाहिजा होणार नाहीं येविशीं ताकीदपत्रें:—

१ देशमुख व देशपांडिये परगणे अतूर. १ मोकदम मौजे नागपूर परगणे अतूर. १ त्रिंबकभट वस्ती कसबे नागपूर. एकूण ३.

[ ३२९ ] राजश्री मुद्राधारी व लेखक किल्ले महिमानगड यांसी पत्र जे, किल्ले मजकुरीं

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिलकाद २.

मल्हारजी कुसापा गडकरी होता त्याणें बदअंमल केला ह्मणून विदित जालें. त्यावरून त्याची असामी दूर करून त्याऐवजीं सखोजी बिन नाइकजी जगदळे यांसीं पेशजीं कुसापा मजकूर

---

to restore the fine, and to recall the men who were sent to keep a watch at his house. The Karkoon at the fort was also called in order that he and an attendant at the Huzur might be deputed to investigate the matter.

( 328 ) The husband of a woman named Rama, daughter of Morbhat of Nagpur, having become insane and having absconded, the woman was residing at her father's house. Her cousin desired to seduce her. As she refused his overtures, he brought a false accusation against her, and had her fined Rs. 35. He also burnt to ashes her father's house. Morbhat came to the Huzur, and informed the Raja that the Mokadam of Kasba Nagpur, and the Deshmukh and the Deshpande of Pargana Antur, were taking the part of the cousin, above referred to, and molesting himself. They were directed to abstain from causing the least annoyance to Ramabai, and were warned that if any complaint in the matter reached Government, severe notice would be taken of their conduct.

A. D. 1744-45.

( 329 ) Malharji Kusapa Gadkari at the fort of Mahimangarh having committed adultery, he was ordered to be shot or thrown down a precipice.

A. D. 1752-53.

कामप्रमाणें याची असामी करार केली आहे. त्यास किल्यावरी घेऊन याचे हातें अल्म नौबतीची सेवा घेणें. तैनात सालिनादेखील चाकर मोईनप्रमाणें करार केले असेत. इस्तकबिल पैवस्तापासून वजा. दंडकप्रमाणें वजा करून उरलें बाटा वेतन दरबार शिरत्याप्रमाणें देत जाणें. चाकर मोईनप्रमाणें हजीर करतील त्या दिवसापासून चाकराचा हक शिरस्त्याप्रमाणें पावीत जाणें. यासी जमान किल्ले मजकुरीं त्रेणें पत्र १.

सदरहू असामीविशीं हुजूर विनंति लिहिली त्यावरून करार करून सनद सादर केली असे. त्याप्रमाणें किल्यावरी घेणें. ज्याणें बदअंमल केला त्यास भांड्याचे तोंडीं देऊन उडविणें अगर कडेलोट करणें पत्र १. एकूण २.

इ. स. १७२७-२८.
समान अशरीन मया व अलफ.
रजब २१.

[ ३३० ] अभयपत्र मोकदमानी मौजे शिरवडे तर्फ उंब्रज यांस दिल्हें अभयपत्र जे, रामा सोनार पुसेसावळीकर याणें येऊन दत्ता सोनार मौजे मजकुरीं राहतो त्यास सांगितलें जे, मौजे मजकूरचे शिंवेस डोंगराआलिकडे कऱ्हाडचे मार्गाचे पश्चमेस बडजाई देव आहे तेथें पहिलें तळें होतें. त्याचे पाळीस ठेवणें आहे तें कोणी काढील तर आपण देवधर्म ओळखीन असें सांगितलें. आणि दोघे सोनार एकमत होऊन गांवांत येऊन पाटील कुळकर्णी, चौगुला व लोहार याचा पोर व सुभानजी नायकवडा कुणबी पाटिलकीशीं वाद सांगत होता. त्यास घेऊन जाऊन रात्रीचे त्या जागा खांटिले. पुरतें खांटलें नाहीं. मागती ते नैसेच टाकून निघोन गेले. हें वर्तमान महादाजी कृष्ण अजहत देशमुख प्रांत कऱ्हाड यास कळलें. त्यांणीं हुजूर लिहिलें. तुह्मां अवघियांस हुजूर पाठवून दिल्हें. त्याउपरी रामा सोनार यास आणून तुह्मांस व त्यास हुजऱ्या बराबर देऊन कृष्णाजी विठ्ठल यांजकडे पाठविले. त्याणीं मनास आणून चौकशी केली. रामा सोनार पुसेसावळीकर याणें फसविलें व सुभानजी नायकवडा गांवांतून बाहेर पडोन ठेवण्याचा वांटा आपणांस देणें ऐशी लबाडी केली तें तहकीक झालें. कृष्णाजी विठ्ठल याणीं तुह्मां अवघियांस व सोनारास हुजूर पाठविलें. शोध पाहतां ठेवणें बाष्कळसें जालें. परंतु रामा सोनार व दत्ता सोनार याचे बोलें संताजी पाटील व कुळकर्णी व चौगुला व लोहार मौजे मजकूर याचे पोरगे कोणास न सांगतां ठेवणें खाणायास गेलेबद्दल तुमचे माथां गुन्हेगारी रुपये २५० करार केले असत. याचा वसूल देऊन गांवांत सुखरूप राहणें.

---

A. D. 1727-28.

(330) Two goldsmiths of Sirwade in Tarf Umbraj took with them certain village officers, and went to a field to dig out a treasure which, they believed, had been conceated there. They made some excavations and returned. The village officers were fined Rs. 250 for secretly going to dig out a treasure.

[ ३३१ ] गनू सोनार मौजे कणेर तर्फ सातारा यासी आज्ञा जे, कुसाजी जाधव वस्ती मौजे मजकूर याच्या बरोबर तुवां भुतें घातलीं आहेस त्यावरून कुसाजीची बायको दुखणेनें पडली आहे. भुतें तुझीं कसलीं ऐसी खरी करून तुझे पदरीं घातली असतां तू वारीत नाहींस म्हणून विदित झालें. त्यावरून आज्ञापत्र सादर केलें असे. तरी आपलीं भुतें काढून कुसाजीची बायको बरी होत ते करणें. या कामास कुसाजी जाधव व सुभानजी मुळीक पाठवला यासी मसाला रुपये २० देणें.

इ. स. १७५२-५३. सलास खमसैन मया व अलफ. जिलकाद १४.

[ ३३२ ] किल्ले वंदनगडास आज्ञापत्र जे, मालजी बागूल चाकर किल्ले मजकूर याजवर तुकोजी चोरखता यानें भुतें घातलीं तेणेंकरून बागूल मजकूर याची खरावी आहे. याजकरितां तुह्मांस आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी दोघांची मनसुफी वाजवी करून खराखोटा हुजूर रवाना करणें म्हणून पत्र १.

इ. स. १७५३-५४. अर्बा खमसैन मया व अलफ. रमजान ४.

[ ३३३ ] राजश्री पंत प्रधान यांसी पत्र जे, कसबे खेडशिवापूर तर्फ खेडबारे येथें तस्करांनीं उपसर्ग केला आहे, त्यामुळें गांव तजावजा झाले आहेत. तरी गणोजी बेरड पूर्वी कसबे मजकुरीं रखवालीस होता तो हल्लीं सिंहगडचे चाकरीस तुह्मांकडे आहे. त्यास तुह्मीं आपलें ताकीदपत्र देऊन खासगीच्या गांवाची रखवाली होय तें करणें. रयतेस उपसर्ग लागों न देणें

इ. स. १७५३-५४. सलास खमसैन मया व अलफ. सवाल २१.

---

(331) Ganu Sonar of Kaner in Tarf Satara, having invoked evil spirits, against the family of Kusaji Jadhava. Kusaji's wife fell sick. This was brought home to Ganu, but he took no steps to set her free from the influence of the said spirits. He was directed to do so, and to cure the woman. A fine of Rs. 20 was imposed upon him.

A. D. 1752-53.

(332) Malji Bagul, a servant at the fort of Wandangarh, invoked evil spirits to work against Tukoji Chorkhata. Tukoji was consequenlty suffering from their influence. The officers of Wandangarh were directed to inquire into the matter, and to report on the truth or otherwise of the complaint.

A. D. 1753-54.

(333) The village of Khed–Siwapur, under the management of the Khasgi department, was much infested by robbers. Ganoji Berad had charge of protecting the village. He was at Sinhgarh. The Pant Pradhan was directed to send him to the village, and to arrange for its protection.

A. D. 1753-54.

[illegible] १. [illegible] बेरड यांसी आज्ञा जे, कसबे सदाशिवपूर हा गांव खासगीचा आहे त्यास चोरीचा उपद्रव होतो त्यास कसबे मजकूरची रखवाली पेशजीपासून तुजकडे असतां चोरीचा उपसर्ग होतो. त्यास पूर्ववतप्रमाणें कसबे मजकूरची रखवाली करून चोरीचा उपसर्ग लागों न देणें पत्र १. एकूण २.

[ ३३४ ] विठू तांब्या धनगर खिलारी सरकारचा याच्या वाड्यावरी कसबा वाघोली येथील शिवारांत चोरी जाहली तिचा माग मौजे देगांव संमत मजकूर येथील शिवारांत लागला. त्याजवरून अवघे बेरड आणविले हुजूर बितपशील:—

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलावल १.

किल्लेहाय:—१ बेरड किल्ले कल्याणगड, १ बेरड किल्ले वैराटगड भुईंजेंत राहतात, १ बेरड किल्ले पांडवगड, १ बेरड किल्ले चंदनगड, १ बेरड किल्ले वर्धनगड, १ बेरड किल्ले विचित्रगड एकूण ६.

प्रांत वाई:—१ मौजे गुळुंब संमत हवेली, १ मौजे सुलतानपूर संमत मजकूर, १ मौजे करजखोप संमत वाघोली, १ मौजे सोळशी संमत वाघोली, १ मौजे पिंपवडे संमत वाघोली, १ मौजे देहूर संमत वाघोली, १ कसबे बावधन संमत मजकूर. एकूण ७.

एकूण ठिकाणें १३. तरी समस्त मिळोन चोरीचा माग लावून देणें. याकामास सुभानजी मुळिक व कोंडजी पोवार पाठविला यासी दर ठिकाणीं रुपये, एकूण रुपये १३ आदा करणें म्हणून पत्र १.

[ ३३५ ] संताल राणा बेरड कसबा निंब यासी आज्ञा केली ऐसी जे, राजेश्री खंडेराव बक्षी सरकार याचे चुलते याचें घर मौजे मर्ढे तर्फ मजकूर येथें आहे. त्याचें घर चोरानें फोडून वस्तभाव कुल नेली. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तेथील रखवाली तुझे स्वाधीन असतां चोरी व्हावयाा गरज काय? याउपरी देखत आज्ञापत्र चोरीचें ठिकाण लावून वस्तभाव जराबाजरा

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब ७.

---

(334) A theft took place at the house of Vithu Dhanagar, keeper of the Government cattle at Wagholi. Berads were brought to the Huzur, 6 from different forts, and 7 from different villages, in the Prant of Wai, and were directed to trace the theft.

A. D. 1752-53.

(335) The house of Khanderao Bakshi, uncle of the Raja, was broken into by thieves, and his property was stolen. The duty of keeping a watch, at the village belonged to Santal Rana Berad of Nimb. He was directed to trace the

A. D. 1752-53.

मशारनिल्हेचे पदरीं घालून पावलियाचें कबज घेऊन हुजूर येणें. या कामास स्वार हुमरात निसबत माणकोजी भांडवलकर पाटील यास मसाला रुपये १० देणें ह्मणोन पत्र १.

[ ३३६ ] राजश्री मुद्राधारी व लेखक किल्ले व्याघ्रगड यासी पत्र जे, तुळोजी भोसला यासी किल्ले मजकुरीं कैदेंत ठेविला आहे तेथें सरदी बहुत, यानिमित्त किल्ले वंदनगडीं ठेवण्याची आज्ञा केली आहे. मल्हारजी भोसला वाड्यांतील मूल याजकडे हरजी यादव लोक असामी ४ पाठविले आहेत व किल्ले मजकूरचे लोक असामी ६ बराबर देऊन किल्ले वंदनगडीं पावित करून पावलियाचें कबज घेणें पत्र १. (या महिन्याच्या २७ तारखेस तुळाजी भोसला आजारी असल्या कारणानें सोडून दिल्याचा उल्लेख आहे.)

इ. स. १७५३-५४.
सलास खमसैन मया व अलफ.
साबान १७.

## सरकारी कामदारांचें गैरवर्तन.

[ ३३७ ] राजश्री खंडेराव दाभाड्यास पत्र जे, परगणे जलोद प्रांत खानदेश हा महाल तुह्मीं आपले तर्फेनें येसाजी सोनवणी यास मोकासा दिल्हा आहे. त्याणें परगणे मजकुरीं मन मानेशी धामधूम करून परगणा लुटोन माणसें व बायका धरून बंदीस घातलीं. त्याचा मुकासा दूर करणें ह्मणून स्वमुखेंही आज्ञा केली होती. हल्लीं पुरुषोत्तम मुकादम पाठविला आहे, याबरोबर परगणेयास कमावीसदार पाठवून परगणा आबाद करून येसाजी सोनवणी यास हुजूर पाठवणें. माणसें बंदींत घातलीं आहेत त्यांस सोडून देवणें, पत्र १.

इ. स. १७२८-२९.
तिसा अशरीन मया व अलफ.
सवाल २७.

---

theft, and to restore the property stolen to the owner, and to repair to the Huzur.

(336) Tulaji Bhosle was a prisoner at Vyaghragarh. The climate of the place being very cold, he was sent to Wandangarh. (He was on the 27th of this month released on account of his sickness.)

A. D. 1753-54.

(337) Khanderao Dabhade gave the Pargana of Jalod in Khandesh as Mokasa to Yesaji Sonawani. The latter oppressed the Pargana, and illegally put men and women into prison. Khanderao was directed to recall him, to restore peace in the country, and to send Sonawani to the Huzur.

A. D. 1728-29

तर्फ निरथडी



[ ३३८ ] कित्ता ताकीदपत्रें चिटणिशी तीथवार छ मजकूर पत्रें बनाम जिवाजी शामराज कमावीसदार परगणे पैठण दिंमत सोळसकर यास आज्ञा कीं, तुह्मीं परगणे मजकूर मुकासंबाबेचा अंमल वाजवी करावा, ते न करितां मन मानेसारखी वर्तणूक मांडिली आहे. कसबे मजकुरीं गंगेचा घाट धरून ब्राह्मणी बायका लुटल्या, ब्राह्मणाची वस्तभाव नेली व चिरगुटें पांघरुणें व घागरी व चंबू वगैरे नेले असा कित्येक उपसर्ग केला. हें वर्तमान फौजदार व जमीदार यांणीं हुजूर लिहिलें. तर ऐशी बदराहा वर्तणूक कार्याची नव्हे. याउपरी नागावा घेतला असेल तो जराबाजरा सोडून देणें, आणि ज्याचें त्यास पावणें. तुह्मीं मुकासबाबेचा अंमल सुदामतप्रमाणें घेणें. येविशीं सोळसकरासहीं आज्ञा केली आहे. फौजदार व जमीदार यांस वाजवी अंमल द्यावयाविशीं लिहिलें आहे. तुह्मीं गैरवाजवी वर्तणूक कराल तर तुमचा मुलाहिजा होणार नाहीं, हें स्पष्ट समजोन वर्तणूक करणें. येविशीं मसालियाचीं पत्रें:—

इ. स. १७४४-४५.
खमस अर्बैन मया व अलफ.
जिल्हेज १७.

१ जिवाशी शामराज परगणे मजकुरीं गांवगन्ना बसवावयास आज्ञा केली आहे, व सर्व वस्तवाणी व घोडीं जीं नेलीं तीं देविलीं असत, सोडून देतील. १ देशमुख व देशपांडिये यांस मसाला धोंडजी साळोखा व पदाजी साळोखा व कोंडजी गोरुले बारदार निसबत पदाजी भोसले रुपये २००. पत्र १.

[ ३३९ ] महादाजी आबाजी यासी आज्ञापत्र ऐसी जे, मौजे वाल्हें तर्फ निरथडी प्रांत पुणें येथील चौगुलकीचें भांडण मराळ्यामध्यें व ठाकरामध्यें होतें तें मनास आणून मराळ्यास चौगुलकी करार करून पत्रें करून दिलीं. मराळ वतनावर गेला त्यास सासवडास नेऊन पंचवीस रुपये मसाला घेऊन वतन अमानत केलें ह्मणून हुजूर विदित जाहलें. ऐसीयासी खासगीचे गांवींचे वतनाचा कजिया हुजूरसाहेबीं विल्हे लाविला असतां तुह्मीं अमानत करावा हे गोष्ट

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर ९.

---

(338) Government was informed by the Fouzdar and Jamidar that Jiwaji Shamaraj, the Kamavisdar of the Mokasa Amal of Pargana Paithan on behalf of Solaskar, was acting in an improper manner, and robbed Brahmin women, who had gone to the river, of their ornaments. He was directed to restore the whole of the property taken away by him to its owners, and was informed that such conduct would not be tolerated by Government.

A. D. 1744-45.

(339) A dispute between Maral and Thakar regarding the Chougula's Watan at Walhe in Tarf Nirthadi was decided by the Huzur in favour of Maral. Notwithstanding this decision, Mahadaji Ambaji attached the Watan, and levied a fine of Rs. 25 from Maral, He was informed that his action was un-

A. D. 1752-53.

~~तर्फ~~ is more commonly used in the sense of तर्फ & rarely


सेवक लोकांस योग्य नव्हे. याउपरी पत्रदर्शनीं मराठ्याची चौगुलकी अमानत केली ते मोकळी करणें. येविशीं फिरून बोभाट येऊं न देणें ह्मणून पत्र १.

[ ३४० ] रामाजी रंगनाथ अजहत देशमुख तर्फ निरथडी परगणे पुणें यांसी पत्र जे, मौजे वाल्हें याजवरी कर्जाचें लटिकें तुफान करून भोजा सुतार यासी तगादा केला ह्मणून हुजूर विदित जाहलें. तरी याजकडे कर्ज वाजवी नसतां याचे घरीं प्यादे बसवून मसाला घ्यावयास प्रयोजन काय? तरी सुतार याचे वाटेस न जाणें १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब ६.

[ ३४१ ] हवालदार व कारकून किल्ले सदाशीवगड यांसी पत्र मौजे करोडी खासगी गांव येथील लोक बाजारास गेले त्यांपासोन घोंगडीं तीन गडकरी यांनीं हिरोन घेतलीं. त्याची किंमत निम्मे देतां ह्मणून विदित जाहलें. ऐसीयास रयतेपासून घोंगडीं घेऊन निम्मे किंमत द्यावी हा कोण विचार? याउपरी वाजवी किंमत रुपये देणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रमजान ६.

## इनाम, नक्त, नेमणुकी वतनें वगैरे.

### ( अ ) नोकरी केल्याबद्दल.

नाणेघोळ

[ ३४२ ] केदारजी बिन गुणाजी पाटील मौजे डोवण तर्फ नाणेघोल प्रांत कऱ्हाड यास दिल्हें इनामपत्र ऐसी जे, तुह्मा लेंक साखरोजी यादव हुजूर चाकरीस होता, तो पंढरपुरास स्वामीची स्वारी झाली, तेथें वाघाचे शिकारीमध्यें मयत झाला. याकरितां तुह्मे चालवणें

इ. स. १७३७-३८.
समान सलासीन मया व अलफ.
रबिलावल ८.

worthy of a Government servant, as the dispute had already been settled by the Huzur, and as the village was in charge of the Khasgi Department. He was ordered to remove the attachment.

( 340 ) Rangnath Ajahat Deshmukh of Nirthadi in Prant Poona, under the pretext of recovering a debt, kept peons at the house of Bhoja, carpenter of Walhe, and levied fine from him. He was reprimanded and directed not to molest the carpenter.

A. D. 1752-53.

( 341 ) The Gadkaries of Sadashivgarh purchased some blankets from certain traders of Karodi (a village under the management of the Khasgi department), and offered to pay half the actual price. They were reprimanded for their action, and directed to pay the full price to the traders concerned.

A. D. 1752-53.

( 342 ) Sakroji Kedarji who was serving with the Huzur, lost his life while accompanying the Raja in a tiger hunt at Pandharpur. Five Bighas of land were there-

A. D. 1737-38.

आवश्यक जाणोन तुजवरी स्वामी कृपाळू होऊन मौजे मजकुरीं पडजमीन अवल दुमसीम तीन प्रतींची बिघे ८९ पांच कुळबाब, कुळकानूदेखील हळीपट्टी, पेस्तरपट्टी खेरीज हक्कदार करून स्वराज्यतर्फेनें इनाम दिल्हा असे. तूं व तुझे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहणें ह्मणोन:—

१ मुख्य नावांचें पत्र, १ मोकादम मौजे मजकूर. २ चिटणिशी पत्रें ( १ देशमुख देशपांडे, १ देशाधिकारी. ) एकूण. ४

[ ३४३ ] किता एक वतनपत्रें तीथवार छ मजकूर बनाम घासी बिन धनराज नाईक कोहार यासी दिल्हें वतनपत्र ऐसी जे, तूं शाहूनगर नजीक किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसंनिध विनंति केली कीं, स्वामीच्या राज्यांतील कोहाराचे कजिये होतात, ते आपलेच जागा मनसुभ्या करितात. त्या कजियाच्या मनसुभ्या आपले विद्यमानें करून निवाडा करावा व स्वामी मेर्बान होऊन पालख्या देतात व स्वामीच्या राज्यांतील सरदार पालख्या देतात, त्यास नवे पालखीचा कारखाना जो कोहार नायकी करून पालखी चालवील त्याणें प्रथमवर्षी आपल्यास रुपये ९ द्यावे. हीं दोन कलमें महाराजांनीं नूतन वतन करून देऊन वंशपरंपरेनें चालविलीं पाहिजे ह्मणून विदित केलें. त्यावरून मनास आणून तूं स्वामिसेवा बहुत वर्षे निष्ठेनें करीत आहेस, तुझें चालवणें अगत्य जाणून स्वामी तुजवरी कृपाळू होऊन सदरहु दोन कलमें बितपशील:—

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
सवाल ८.

कोहार कजिये करून आपलाले घरीं मनसुभ्या करितात, त्याचा निवाडा तुझे विद्यमानें व्हावा. कलम १.

स्वामी मेर्बान होऊन ज्यास पालख्या देतील, व स्वामीच्या राज्यांतील सरदार व सरकारकून ज्यास पालख्या देतील, ते कोहार ठेवून जो नाईक पालखी चालवील त्या नायकानें प्रथम वर्षी रुपये ९ द्यावे. कलम १.

एकूण कलमें दोन सदरहूप्रमाणें तुज व तुझे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वतन अजरामऱ्हामत करून दिलें असे. तरी तूं आपले वंशपरंपरेनें अनभवीत जाणें येविशीं पत्र.

१ मुख्य वतन पत्र फडणिशी, १ समस्त कोहार यासी चिटणिशी पत्र, एकूण २.

---

fore given in Inam to his father at Dowan in Tarf Naneghol in Prant Karad.

( 343 ) In consideration of the loyalty and long service of Ghasi bin Dhanaraj Naik Kohar, the following new Haks were conferred on him.

A. D. 1740-41.

1. All disputes hitherto settled by the Kohars in the country among themselves should be settled through Ghasi.

[ ३४४ ] आबाजी शिवदेव व त्रिंबक शिवदेव व विठ्ठल शिवदेव उपनाम दाणे गोत्र मौन्य सूत्र आश्वलायन निमे कुळकर्णी व निमे ज्योतिष मौजे निगडी तर्फ सातारा प्रांत मजकूर यांणीं सातारियाचे मुक्कामीं येऊन स्वामीसंनिध विनंति केली कीं, आपण वतनदार, वतनसंबंधें सेवा पडते. तरी महाराजांनीं आपणास कांहीं इनाम जमीन देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे ह्मणून. त्यावरून हे वतनदार, वतनसंबंधें सेवा पडते, यांचें चालवणें आवश्यक जाणून स्वामी यावरी कृपाळू होऊन यास नूतन इनाम मौजे मजकुरीं पडजमीन बिघे ८१० दुतर्फा व इनाम तिजाई कुलबाब, कुलकानू, हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी, खेरीज हक्कदार. येविशीं पत्रें श्रावण बहुल द्वितीया भोमवासर रौद्र संवत्सरेः—१ मुख्यपत्र, १ देशमुख देशपांडे तर्फ सातारा, १ देशाधिकारी प्रांत मजकूर, १ मोकदम मौजे मजकूर, १ राजश्री पंतप्रातिनिधि, १ मुद्राधारी किल्ले सातारा, एकूण ६.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
जमादिलावल १९.

[ ३४५ ] राजश्री वणगोजी नाईक बिन खंडेराव नाईक व ह्मालोजी नाईक बिन शाहाजी नाईक बिन खंडेराव नाईक व रामचंद्र नाईक व येशवंतराव नाईक बिन खंडेराव नाईक निंबाळकर यांणीं किल्ले मजकूर येथील मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, आपले तीर्थरूप खंडेराव नाईक निंबाळकर हिंदुस्थानांत पानपतचे लढाईंत स्वामीकार्यास आले, यास्तव कैलासवासी माधवराव पंडित यांणीं आपल्यास मौजे कोळेगांव प्रांत भालवणी स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील सरदेशमुखी व नाडगौंडी दरोबस्त कुलबाब व कुलकानू हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी देखील इनाम तिजाई, जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण निधिनिक्षेपसहित खेरीज हक्कदार व इनामदार करून चतुःशिमापूर्वक मर्यादेप्रमाणें सन सब्बास सितैनांत छ २२ रमजानीं नूतन इनाम देऊन पत्रें करून दिल्हीं. त्याजप्रमाणें

इ. स. १७७६-७७.
सबा सबैन मया व अलफ.
जमादिलाखर २२.

1. The head of the bearers of each palanquin, newly granted to any one by the Raja or by any Sirdar, shall in the first year pay Rs. 5 to Ghasi.

(344) Inam land was granted to Abaji Siwadeo, Trimpak Siwadeo, and Vithal Siwadeo Dane, sharers of half the Watans of Kulkarni and Jotishi in Nigdi in Tarf Satara, in consideration of the service attached to their Watan. (The last of these persons was the founder of the Vinchurkar's family.)

A. D. 1740-41

(345) Wangoji Naik and other sons of Khanderao Naik represented that the Peshwa had granted to them the village of Kolegaon in Prant Bhalavani in consideration of the

A. D. 1776-77.

गांव आपले दुमाला करून घेऊन अनभवीत आहों. ऐसीयासी महाराजांनीं कृपाळू होऊन गांव इनाम करून देऊन वंशपरंपरेनें चालविला पाहिजे ह्मणोन विदित केलें. त्याजवरून मनांत आणितां हे स्वामीच्या राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक, यांचे तीर्थरूप खंडेराव नाईक निंबाळकर हिंदुस्थानांत पानपतचे लढाईत स्वामीकार्यास आले. यांचें चालवणें आवश्यक जाणोन स्वामी याजवरी कृपाळू होऊन यासी हुजुरून मौजे मजकूर स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील सरदेशमुखी व नाडगौंडी दरोबस्त कुलबाब व कुलकानू, हल्लीपट्टी, व पेस्तरपट्टी खेरीज हकदार व इनामदार करून चतुःशिमापूर्वक नूतन इनाम करार करून दिल्हा असे. तरी तुह्मीं सदरहूप्रमाणें गांव यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें पत्र भोगवटियास याजवळ परतोन देणें ह्मणोनः—२ सनदी पत्रें ( १ मुख्य पत्र नांवानें, १ मोकदम मौजे मजकूर, एकूण २.) ३ चिटणिशी पत्रें ( १ राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि, १ राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत माण, १ देशमुख व देशपांडे मालवणी, एकूण ३. ) एकूण ५.

[ ३४६ ] राजश्री बाळोजी नाईक व राघोजी नाईक महिपतराव नाईक बिन शाहाजी नाईक निंबाळकर यांणीं किल्ले मजकूर येथील मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, आपले तीर्थरूप शाहाजी नाईक निंबाळकर सन खमस सबैनांत इंग्रजांचे लढाईत स्वामीकार्यास आले; यास्तव मौजे तांदुळवाडी परगणे मालवणी प्रांत माण सरकार विजापूर हा गांव स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फादेखील सरदेशमुखीसुद्धां दरोबस्त हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी, जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसहित खेरीज हकदार व इनामदार करून सन सित सबैनांत छ २४ सफरीं नूतन इनाम देऊन पत्रें करून दिल्हीं. त्याजप्रमाणें गांव आपले दुमाला करून घेऊन अनभवीत आहों. ऐसीयासी महाराजांनीं कृपाळू होऊन गांव इनाम करून देऊन वंशपरंपरेनें चालविला पाहिजे ह्मणोन विदित केलें. त्याजवरून मनास आणितां हे स्वामीच्या राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक, यांचे तीर्थरूप शाहाजी नाईक

इ. स. १७७६-७७.
सबा सबैन मया व अलफ.
जमादिलाखर २२.

---

fact that their father Khanderao had lost his life at the battle of Panipat and prayed that the grant may be confirmed. Their prayer was complied with.

(346) Baloji Naik and other sons of Shahaji Naik Nimbalkar represented that their father having lost his life in a battle against the English in A. D. 1774-75, they were granted the village of Tandulwadi in Prant Bhalawani, and prayed that the grant may be confirmed. Their request was complied with.

A. D. 1776-77.

निंबाळकर इंग्रजांचे लढाईत स्वामीकार्यास आले, त्यांचें चालवणें आवश्यक जाणोन स्वामी याजवरी कृपाळू होऊन यासी हुजुरून मौजे मजकूर स्वराज्य व मोंगलाई एकूण दुतर्फादेखील सरदेशमुखीसुद्धां दरोबस्त हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी, जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसहित खेरीज हक्कदार व इनामदार करून नूतन इनाम करार करून दिल्हा असे. तरी तुह्मीं सदरहूप्रमाणें गांव यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन हें पत्र भोगवटियासी याजवळ परतोन देणें ह्मणोन पत्रें:—

३ चिटणिशी पत्रें ( १ राजश्री श्रीनिवासपंडित प्रतिनिधि, १ राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रांत माण, १ देशमुख व देशपांडे प्रांत मजकूर, एकूण ३. ) २ सनदी पत्रें ( १ मुख्य पत्र नांवाचें, १ मोकदम मौजे मजकूर, ) एकूण ५.

सदरहु विद्यमान राजश्री माधवराव पंडित प्रधान याचे तर्फे कारभारी राजश्री कृष्णराव अनंत याचे परवानगीनें.

## धर्मकृत्यें अगर मेहरबानगीदाखल.

[ ३४७ ] मौजे पाटेगांव परगणे पैठण सरकार मजकूर हा गांव गंगाजान्हवी काशीबाई राजश्री बापूजी महादेव याची कन्या शके ९२ विभावसु संवत्सरे श्रावण बहुल प्रतिपदा भृगुवासर कुलबाब कुलकानूदेखील हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हक्कदार व इनामदार वंशपरंपरेनें इनाम करून दिल्हा तें पत्र बहुत जाया जालें. भोगवटियास पत्र असलें पाहिजे. याकरितां राजश्री स्वामींनीं आज्ञा केली कीं, या पत्राची नक्कल लिहून मुद्रा करून देवणें. त्यावरून तेच तारखेचें पत्र नूतन लिहून पहिले जीर्ण पत्राचे शिक्के उतरून हल्लीं पत्रावरी शिक्के घेऊन दिल्हें पत्र बनाम मोकदम मौजे मजकूर १. सलके पाटील हुजूर रवानगी हिरामण चोपदार बरोबर मिरधे तुकाराम. मागली तीथ, वार, संवत्सर घालून नूतन सनद करून द्यावयाची

इ. स. १७३३-३४.
अर्बा सलासीन मया व अलफ.
जिलकाद १२.

(347) An Inam was given to Kashibai, daughter of Bapuji Mahadeo and a Sanad was issued. The Sanad having been much damaged, was ordered to be renewed. It is stated that the usual practice when a Sanad was to be renewed was to issue a fresh one bearing the date of the fresh issue. In this case, however, a copy of the old Sanad was made, and the dates and seals in the original were entered therein, and it was issued as the original Sanad

A. D. 1733-34.

पद्धत नाहीं. परंतु वाक्यांतलि परवानगी रवाना फत्तेसिंगबावास जाली. फत्तेसिंगबावांनीं आग्रह करून कागद याचप्रमाणें करून मागितला यास्तव करून द्यावासा झाला.

[ ३४८ ] तुरकबेग यासी दिल्हें इनाम पत्र ऐसी जे, तुवां हुजूर विनंति केली कीं, हातखामरहूम मनसबदार याची बायको हनीफा बानो इजला हजरत औरंगजेब पादशहा याणी परगणे नेवासें येथें पड-जमीन चावर एक दिल्ही बितपशील:—कसबे नेवासेंखुर्द चावर निमे -॥-, मजरे नारायणवाडी कसबा मजकूर चावर निमे -॥, एकूण एक चावर आहे. मोगलाईकडील सनदापत्रें आहेत ऐसियास तिचे पोटीं अवलाद नाहीं याकरितां आपण तिचा पुतण्या ह्मणून आपणास पुत्र घेऊन इनाम आपणांस दिल्हा आहे. तरी महाराजांनीं कृपाळू होऊन स्वराज्य तर्फेनें इनाम करून देऊन चालविलें पाहिजे ह्मणून. त्यावरून मनास आणून तुझें चालवणें जाणोन तुजवरी स्वामी कृपाळू होऊन सदरहूप्रमाणें एक चावर जमीन कुलबाब कुलकानू देखील हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हकदार करून इनाम दिल्हा असे. तरी तुह्मीं सदरहूप्रमाणें एक चावर जमीन आपले दुमाले करून वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहणें ह्मणून पत्रें छ मजकूर:—

इ. स. १७३६-३७.
सबा सलासीन मया व अलफ.
रमजान. २३.

३ फडणिशी पत्रें:—( १ बनाम तुरकबेग. १ कसबे नेवासेंखुर्द. १ मजरे नारायण-वाडी कसबे नेवांसेंखुर्द. ) २ चिटणिशी पत्रें:—( १ देशमुख व देशपांडे, १ देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी. ) एकूण ५ शिक्के पा.

[ ३४९ ] रानश्री मुरारजी हिंदुराव घोरपडे वजारतमहा यांसी पत्र जे, श्री—येथून वेदशास्त्र संपन्न मुराराचार्य गिरीहून हुजूर येऊन विदित केलें जे, संस्थान त्रिचनापल्ली येथून श्रीस महाभिषेक व पूजा पूर्वी-पासून चालत होती तेणेंप्रमाणें सांप्रत चालत नाहीं ह्मणून विदित

इ. स. १७४१-४२.
इसन्ने अर्बैन मया व अलफ.
रबिलावल १८.

---

This was done under special instructions of the Raja as communicated through Fatesing Bawa.

(348) Hanifa Banu, the widow of a Mahomedan, officer of Newase was granted Inam land by Emperor Aurangzeb. Her nephew represented that he had been adopted by her as her son and prayed that the Inam might be continued to him. His prayer was granted.

A. D. 1736-37.

(349) Government was informed that worship of the deity at Giri by Trichinapalli (officers?) was not performed as before. Murarji Hindurao Ghorpade Vajarat Maha was directed to continue the worship as also the allowance granted for it.

A. D 1741-42.

केलें. तरी श्रीचा अभिषेक व पूजेची मोईन पूर्वी असेल तेणेंप्रमाणें मनास आणून आचार्यांचे विद्यमानें श्रीचा अभिषेक व पूजा चालवणें ह्मणून पत्र १.

[ ३५० ] कित्ता एक इनामपत्रें कार्तिक शुद्ध दशमी मंदवासर वेदमूर्ति खंडभट बिन विठ्ठलभट उपनाम शाळग्राम मूत्र आश्वलायन वास्तव्य कसबे पुणें याचेविषयीं राजश्री बाळाजी बाजीराव पंडित प्रधान यांनीं स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, वेदमूर्ति थोर सत्पात्रस्थ स्नानसंध्यादि षट्कर्म आचरून स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चिंतून आहे. याचे कुटुंबाचा योगक्षेम चालवावयाबद्दल तीर्थरूप राजश्री बाजीराव पंडित यानीं मौजे पर्वती तर्फ हवेली प्रांत पुणें येथें थळकुंड मावळ्यापैकीं इनाम जमिन छ १७ सफर सन सित अशरीन चावर -॥- देऊन आपलीं पत्रें करून दिल्हीं आहेत. ऐसीयास महाराज स्वामींनीं कृपाळू होऊन सदरहू जमिनीचें पत्र करून देऊन वेदमूर्तीस वंशपरंपरेनें इनाम चालविला पाहिजे ह्मणून विनंति केली. त्याजवरून मनास आणून तुह्मांस व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालविलिया श्रेयस्कर जाणोन स्वामी तुह्मांवरी कृपाळू होऊन राजश्री बाजीराव पंडित यांणीं तुह्मांस सदरहू मौजे पर्वती तर्फ हवेली प्रांत मजकूर येथें थळकुंड मावळ्यापैकीं जमिन चावर -॥- इनाम दिल्हें आहे. त्याप्रमाणें हुजुरून स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फादेखील इनाम तिजाई कुलबाब व कुलकानू हलीपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हकदार तुह्मांस व तुमचे वंशपरंपरेनें इनाम दिल्हा असे. येविशीं पत्रें ४.

इ. स. १७४१-४२.
इसन्ने अर्बैन मया व अलफ.
रमजान ११.

२ फडणिशी.—१ इनामपत्र, १ गांवास पत्र. २ चिटणिशी.—१ देशमुख व देशपांडे, १ देशाधिकारी व लेखक. एकूण ४.

[ ३५१ ] वेदमूर्ति राजश्री विठ्ठलभट बिन महादेवभट व भिवभट बिन गोपाळभट व त्रिंबकभट बिन केशवभट उपनाम वाळिंबे गोत्र वासिष्ठ सूत्र आश्वलायन वास्तव्य कसबे शिरवळ यांणीं शाहूनगर नजीक किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसंनिधीं येऊन विनंति केली कीं, आपण कुटुंबवत्सल, योगक्षेम चालला पाहिजे याजकरितां स्वामींनीं कृपाळू होऊन कांहीं इनाम जमीन देऊन वंशपरंपरेनें चालविला पाहिजे ह्मणून. त्यावरून मनास आणून हे थोर

इ. स. १७६६-६७.
सबा सितैन मया व अलफ.
सफर २४.

---

(350) An Inam was granted at the request of the Peshwa to Khandbhat bin Vithalbhat Salgram of Poona in consideration of his being a man of great sanctity.

A. D. 1741-42.

(351) Some Inam land was given to Vithalbhat bin Mahadeobhat and others surnamed Walimbe of Sirwal in consideration of their being men of great sanctity. It is

A. D. 1766-67.

ब्राह्मण सत्पात्र स्नानसंध्यादि षट्कर्मी निरत याचें चालविलिया स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण ऐसें जाणोन स्वामी याजवरी कृपाळू होऊन यासी गांवगन्ना परगणे शिरवळ-पैकीं जमीन पांचा हात पांचा मुठीच्या पांडानें बहीतः—कसबा शिरवळ जमीन चावर .।., मौजे नाहावी परगणे मजकूर जमीन चावर -।-. एकूण जमीन चावर निंमी यासी वांटणी बितपशील:—

विठ्ठलभट बिन महादेवभट यासी सदरहु निंमे चावर जमिनीचा विभाग निंमे. भिवभट बिन गोपाळभट व त्रिंबकभट बिन केशवभट यासी सदरहु निंमे चावर जमिनीचा विभाग निंमे.

येणेंप्रमाणें निंमे चावर जमीन स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व सरदेशमुखी व साहोत्रा व नाडगौंडी व ध्वाकरी (?) कुलबाब व कुलकानू, हल्लीपट्टी व पेस्तर-पट्टी, जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसहित खेरीज हकदार करून नूतन इनाम करून दिल्हा असे. तरी तुह्मीं देहाय मजकूरपैकीं सदरहूप्रमाणें निंमे चावर जमीन चतुः-शिमापूर्वक याचे दुमाला करून यासी व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. येविशीं पत्रें:—

१ देशमुख व देशपांडे प्रांत मजकूर, १ राजश्री माधवराव पंडित प्रधान, १ देशाधिकारी लेखन वर्तमान भावी, १ राजश्री पंत सचीव, एकूण ४.

३ सनदी पत्रें (मुख्यपत्र १ व मोकदमानी कसबे शिरवळ १ व नाहावी १ एकूण तीन) एकूण ७. पत्रें राज्याभिषेक शके ९० सुभानुनाम संवत्सरे अश्विन शुद्ध पंचमी भोमवासर सुरुसन अर्बा सितैन मया व अलफ कारकीर्द राजश्री माधवराव पंडित प्रधान यांचे तर्फेनें राजश्री वेंकाजी माणकेश्वर यांणीं पत्रें लिहावयास चिठ्ठी पाठवली परंतु पत्रावरी शिके जाले नव्हते ते राजश्री गणेश विठ्ठल हे कारभारी जालियावरी पत्रावरी शिके केले, सुरुसन सित सितैन मया व अलफ चैत्र मासीं शिके जाले.

[ ३५२ ] वेदमूर्ति गणेशभट व बाळंभट बिन बापूभट उपनाम पुरंदरे गोत्र भारद्वाज सूत्र आश्वलायन वास्तव्य कसबे सासवड यांणीं हुजूर शाहूनगरा-नजीक किल्ले सातारा येथील मुक्कामीं स्वामीसंनिध येऊन विदित केलें कीं, कैलासवासी बाळाजी पंडित प्रधान यांणीं आह्मांस

इ. स. १७६६-६७.
सबा सितैन मया व अलफ.
सफर २५.

---

stated that the Sanad was issued in accordance with a note sent by Vyankaji Mankeshwar on behalf of Madhavrao Pandit Pradhan.

(352) An Inam was granted by the Peshwa to Ganeshbhat and Balambhat bin Bapu Bhat Purandhare of Saswad in consideration of their being men of great

A. D. 1766-67.

मौजे खानवडी तर्फ कऱ्हेपठार प्रांत पुणें येथील जिरायत जमीन उत्तम प्रतीची चावर. ।. एकूण बिघे तीस स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फादेखील इनाम तिजाई व सरदेशमुखी कुलबाब व कुलकानू, हलीपट्टी व पेस्तरपट्टी, जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसहित खेरीज हक्कदार करून इनाम देऊन मौजे मजकूरच्या दस्तांत बाद घालून पत्रें दिल्हीं त्याप्रमाणें अनभवीत आहों. तरी महाराजांनीं सदरहूप्रमाणें इनाम करार करून हल्लीं नूतन साहोत्रा व नाडगौंडी इनाम देऊन वंशपरंपरेनें चालवावें याविशीं पत्रें करून दिल्हीं पाहिजेत म्हणून विदित करून पंडित मशारनिल्हे यांचीं पत्रें आणून दाखविलीं. त्यावरून मनास आणून हे भले ब्राह्मण सत्पात्र स्नानसंध्यादि षट्कर्मी निरत यांचें चालविलिया स्वामीस व स्वामीचे राज्यास श्रेयस्कर ऐसें जाणून स्वामी यांजवरी कृपाळू होऊन यांसी पंडित मशारनिल्हे याणीं मौजे मजकूरपैकीं जिरायत उत्तम प्रतीची जमीन चावर पाव एकूण तीस बिघे स्वराज्य व मोंगलाई एकूण दुतर्फा दरोबस्त इनाम तिजाई व सरदेशमुखी हलीपट्टी व पेस्तरपट्टी, कुलबाब व कुलकानू, जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसहित खेरीज हक्कदार वंशपरंपरेनें इनाम दिल्हा. त्याप्रमाणें करार करून हल्लीं नूतन सदरील जमिनीस साहोत्रा व नाडगौंडी यासी व यांचे वंशपरंपरेनें इनाम करून दिल्हा येविशीं धर्मशास्त्राचीं वचनें:—

स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच्च वसुंधरां ॥ षष्ठि वर्षसहस्राणि विष्टायां जायते कृमि ॥ १ ॥
स्वदत्ता दुहिता भूमिः पितृदत्ता सहोदरी ॥ अन्यदत्ता भवेन्माता यो हरेत् त्रिषु संगमो ॥ २ ॥
दानपालनयोर्मध्ये दानात् श्रेयो नु पालनं ॥ दानात् स्वर्गमवाप्नोति पालनादच्युतं पदं ॥ ३ ॥

येणेंप्रमाणें धर्मशास्त्राचीं वचनेंयुक्त पत्रें करून दिल्हीं आहेत तरी तुह्मीं मौजे मजकूरपैकीं सदरहूप्रमाणें पाव चावर जमीन चतुःशिमापूर्वक यासी व याचे वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. पत्रें राज्याभिषेक शके ९० सुभानु नाम संवत्सरे आश्विन शुद्ध पंचमी भौमवासर येविशीं पत्रें:—

२ सनदीपत्रें ( १ मुख्य पत्र, १ मोकदम. ) ३ चिटणिशी ( १ देशमुख देशपांडे, १ देशाधिकारी, १ राजश्री माधवराव पंडित प्रधान. ) एकूण ५.

कारकीर्द राजश्री माधवराव पंडित प्रधान सातारियास त्याचे तर्फेनें गणेश विठ्ठल याचे कारकीर्दीस शिक्के जाले. परवानगी व्यंकाजीपंत.

( या वर्षांत व पुढील वर्षांत अशाच तऱ्हेच्या पुष्कळ सनदा दिलेल्या आहेत. या सनदांच्या योगानें पेशव्यानें दिलेलीं इनामें चालू झालीं. )

---

sanctity. A Sanad was issued by Satara Raja confirming the above.

(Most of the Sanads issued, in this and future years are of this nature. They merely confirm grants made by the Peshwa.)

## किताबती व बहुमान.

—:o:—

इ. स. १७३६-३७. सबा सलासीन मया व अलफ. जिल्हेज २४.

[ ३९३ ] विश्वासनिधि राजमान्य राजश्री देवजी सोमवंशी यास पत्र जे, तुम्हीं स्वामीचे एकनिष्ठ सेवक, सेवा बहुत निष्ठेनें केली, याकरितां तुम्हांवरी स्वामी कृपाळू होऊन हिंदुराईचा किताब दिल्हा म्हणून पत्र १.

इ. स. १७५२-५३. सलास खमसैन मया व अलफ. जमादिलाखर २८.

[ ३९४ ] पुरुषोत्तमराव खटावकर यांचें पत्र जे, वस्त्रें साहेबीं द्यावीं तीं तशींच राहिलीं पाठवून द्यावीं म्हणून लिहिलें त्यास मागाहून वस्त्रें देउं म्हणून पत्र १.

## सार्वजनिक इमारती व लोकोपयोगी कृत्यें.

इ. स. १७४१-४२. इसन्ने अर्बैन मया व अलफ. रबिलाखर १०.

[ ३९५ ] हुजूर वाडियास सागवानी लांकडें पाहिजेत याजकरितां गुलाब परदेशी यास जे जागा लाकडें असतील तेथून तोडून आणावयाची आज्ञा केली आहे. ऐसीयासी परदेशी मजकूर जे जागा लांकडें असतील तेथून तोडून आणील तरी यास कोणी अटकाव न करी व मार्गी हांशिलाचा वगैरे तगादा न लागे ते गोष्टी करणें म्हणून चिटणिशी पत्र.

१ राजश्री बाळाजी पंडित प्रधान, १ राजश्री चिमणाजी पंडित सचीव, १ सुभेदार व कारकून व पारपत्यगार व जमीदार व चौकीदार महालानिहाय एकूण ३.

---

A. D. 1736-37.

(353) Deoji Somawanshi was for his long and faithful service, given the title of *Hindurai*.

A. D. 1752-53.

(354) Purshottamrao Khataokar requested the Raja to be favoured with clothes of honor promised to him. He was informed that the clothes would be sent afterwards.

A. D. 1741-42.

(355) Gulab Pardesi was sent to bring timber required for the construction of the royal palace, and letters were sent to the Pant Pradhan, the Pant Sachiv, Subhedars, Karkuns, Parpatyagars, Jamindars and Chaukidars of the several Mahals, not to obstruct him in cutting and removing the wood

[ ३९६ ] ताकीदपत्रें त्रिंबकजी बिन शिदोजी गुरव मौजे कळंब व मौजे नांदरे तर्फ महाकुंग संमत जुन्नर तीथ, वार श्रावण शुद्ध दशमी सौम्यवासर चिटणिशी पत्रें. देहाय मजकुरीं इनाम जमीन बितपशील:—

इ. स. १७४६-४७.
सबा अर्बैन मया व अलफ.
मोहरम २२.

चावर १ मौजे कळंब येथें मार्गावर पव्हई घालून मार्गस्थास पाणी पाजावें याबद्दल पुरातन इनाम जमीन, चावर १ मौजे नांदूर, एकूण २.

एकूण चावर दोन इनाम पूर्वीपासून चालत आहे, त्यास आपले बाप शिदोजी गुरव याणें महाराज राजश्री कैलासवासी थोरले स्वामी यांसी विनंति करून भोगवटियास पत्रें करून घेतलीं होतीं तीं पत्रें धामधुमेमुळें गेलीं. सदरहु इनामजमीन चालत आहे त्यास भोगवटियास महाराज स्वामीनीं पत्रें करून देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे म्हणून विनंति केली. त्यावरून मनास आणून याजवरी स्वामी कृपाळू होऊन देहाय मजकुरीं सदरहु जमीन पुरातन इनाम चालत आला असेल त्याप्रमाणें यास व याचे वंशपरंपरेनें करार तेविशीं पत्र.—

१ देशमुख व देशपांडे, १ देशाधिकारी, २ मोकदमास, १ राजश्री पंत प्रधान, १ त्रिंबकजींचे नांवें पत्र, एकूण ६.

[ ३९७ ] राजमान्य राजश्री चिमणाजी पंडित सचीव यांसी आज्ञा केली ऐसी जे, गडावरी व शहरांतील कारखान्यांचीं घरें खराब जालीं. तुम्हीं सालाबाद घरें तयार व नीट करीत असतां हल्लीं पर्जन्यकाळ समीप आहे तरी घरें नीट करणें; पुढें दुप्पट काम पडेल. या करितां हें पत्र सादर केलें असे. या कामास गोंदजी गायकवाड व कासीमखान पाठविला यास खर्चरुपये १०.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर ३.

[ ३९८ ] कृष्णाजी महादेव कमावीसदार जकात नजीक पव्हई यांसी पत्र जे, जकातीचे ऐवजीबद्दल मुशाहिरा केसोराम चाकर धर्मपवई असामी ४ यांसी दर असामीस दरमहा रुपये ६ प्रमाणें एक दरमहा रुपये २४ प्रमाणें इस्तकबील फाल्गुन मास तागाईत मृगसाल सदरहूप्रमाणें देत जाणें म्हणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर १६.

---

( 356 ) One Chahur of land was formerly assigned by Raja Siwaji to a Gurav for supplying water to thirsty passenger on the road at Kalamba in Sirkar Junnar. The Inam was continued.

A. D. 1746-47.

( 357 ) The Government buildings at the fort and the public offices in the town of Satara were every year repaired by the Sachiv. As the monsoon was approaching, he was directed to carry out the repairs.

A. D. 1752-53.

( 358 ) An establishment consisting of 4 peons at Rs. 6 each per month was kept up during hot weather at a place to supply water gratis to travellers.

A. D. 1752-53.

# वैद्यकी व शस्त्रक्रिया.

[ ३५९ ] इनामपत्रें सैद दाऊद बिन सैद दावल हकीम शस्त्रवैद्य याणें शाहूनगर-

इ. स. १७४२ ४३.
सलासं अर्बैन मया व अलफ.
रजब ७.

नजीक किल्ले सातारा येथील मुक्कामी स्वामीसंनिध येऊन विनंति केली कीं, आपण स्वामींची सेवा निष्ठेनें करीत आहे. आपल्या कुटुंबाच्या योगक्षेमास कांहीं इनाम जमीन देऊन वंशपरंपरेनें चालविलें पाहिजे म्हणून. त्यावरून मनास आणितां त्याचें चालवणें आवश्यक जाणोन स्वामी कृपाळू होऊन मौजे येगेगांव तर्फ उंबज प्रांत कऱ्हाड येथें नूतन इनाम पडजमीन चावर ॥- एकूण बिघे साठी स्वराज्य व मोंगलाई एकूण दुतर्फादेखील इनाम तिजाई, कुलबाब, कुलकानू हकदार करून यास व याचे अवलाद वंशपरंपरेनें इनाम दिल्हा असे. तर सदरहू प्रमाणें निमे चावर आपले दुमाला चतुःसिमापूर्वक करून घेऊन अनभवणें आणि सुखरूप राहणें येविशीं पत्रें:—

२ फडणिशी ( १ इनामपत्र, १ गांवास. ), २ चिटणिशी ( १ देशमुख व देशपांडे, १ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी. ), एकूण ४.

इ. स. १७५२ ५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिल्काद ८.

[ ३६० ] शिदू न्हावी वस्ती मौजे मुंगी संमत कोरेगांव यासी पत्र, राजश्री पंत अमात्य यांचे स्त्रीस बरें वाटत नाहीं त्यास तुजला औषधउपाय कळतो तर हुजूर येणें पत्र १.

# व्यापार व कारखाने.

[ ३६१ ] राजश्री संभाजी आंग्रे यास पत्र कीं, अरब पूर्वी स्वामीच्या राज्यांत बंदरोबंदरीं येऊन साहुकारी करीत होते, त्याप्रमाणें हल्लीं यावें ऐसी उमेद धरितात, मस्कतच्या मुख्यांनीं येविशीं ( जागा कोरी आहे. ) या बरोबर स्वामीस पत्र पाठविलें त्यावरून स्वामीनें त्यास आमदरफ्त करणें म्हणून लिहिलें आहे; राजापूरचें बंदर नेमून दिल्हें आहे. ऐसीयास अरबाचीं

इ. स. १७३४-३५.
खमस सलासीन मया व अलफ.
रबिलाखर २३.

---

A. D. 1742-43.

(359) Shekh Daud bin Shekh Daval, a man skilled in surgery, was given a village in Inam.

A. D. 1752-53.

(360) Pant Amatya's wife was ailing. Sidu barber of Mungi in Samat Koregaon who was reputed to have knowledge of medicine was called to the Huzur to attend on her.

A. D. 1734-35.

(361) Arabs formerly used to trade at certain ports in the Raja's territory. They now wished to reopen the trade and their Chief at Muscat wrote to the Raja. They were permitted to open trade with port Rajapur. Sambhaji Angria was

तरांडीं, घोडे व हरजिन्नस घेऊन राजापूरचे बंदरीं येतील उदीम व्यवसाय खरेदी व फरोख्त करितील त्याचें तुम्हीं हरयेकविशीं चालवणें. दर्यामध्यें जातां येतां तोशीस न लावणें. हुजूर घोडे व हरजिन्नस घेऊन येतील ते पोहोंचवून देत जाणें म्हणून पत्र १.

[ ३६२ ] मस्कतचे इमामाकडून मलिक महंमद पत्रें घेऊन स्वामीचे दर्शनास आले, त्यांचा बहुमान करून वासलावर्गी हुजूरून महंमद सुजायत देऊन मस्कतास रवाना केले आहेत. हे तुम्हांजवळ येतील तरी तुम्हीं यास जहाज देऊन बंदर मजकुरास पावते तें करणें म्हणून पत्रें:—

इ. स. १७३४-३५. खमस सलासीन मया व अलफ. जमादिलाखर १२.

१ फोंड सांवत सरदेसाई प्रांत कुडाळ, १ संभाजी आंग्रे सरखेल, एकूण २.

[ ३६३ ] किता अभयपत्र चिटणिशी श्रावण बहुल दशमी सोमवासर वजाब सेटे महाजन व रयाणी पेठ शिवापूर नजीक शिंगणापूर येथें पुरातन राजश्री महाराज, राजश्री ( जागा कोरी आहे. ) यांच्या वेळेस पेठ होती, बाजार भरत होता. त्या अलीकडे पेठ उध्वस्त जाली. ऐसीयास

इ. स. १७४०-४१. इहिदे अर्बैन मया व अलफ. जमादिलावल २५.

पुरातन पेठेची आबादानी करावी हें राजश्री स्वामीस अगत्य, याकरितां राजश्री बसवंतराव यांनी पेठ वसवून आबादानी करणें म्हणून आज्ञा केली आहे, आणि आबादानीवरी नजर देऊन स्वामी रयतेवरी कृपाळू होऊन सातसाला कौल दिल्हा असे. तरी पेठ मजकुरीं येऊन वसाहत करून आबादानी करणें. पुरातन बाजार भरत होता त्याप्रमाणें भरणें. कौलाप्रमाणें स्वामी तुमचें चालवितील, जाजती उपसर्ग लागणार नाहीं येविशीं अभय असे.

१ पेठेस कौल सातसाला, १ साहित्यपत्र राजश्री महादाजी घाटगे, एकूण २.

---

directed not to molest them and to send to the Huzur the horses presented by them to the Raja.

(362) Malik Mahomad was sent by the Inam of Muscat with letters to the Raja. He was treated with respect. When he was returning, Mahomad Sujapat was sent with him and a ship was provided for his journey to Muscat.

A. D. 1734-35.

(363) There was a suburb called Siwapur near Singnapur and a market used to be held therein in the time of the previous old Raja. The suburb being now desolate, a Kowl was granted for populating it.

A. D. 1740-41.

# सरकारानें घेतलेलें कर्ज.

11 - June 1733

[३६४] राजश्री खंडोजी गोगवले हवालदार दिमत पोते यास पत्र जे, राजपूरचे शामळाचे मसलतीस राजश्री फत्तेसिंग भोसले व राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि व राजश्री बाजीराव पंडित प्रधान वगैरे रवाना केले. यांचे रवानगीस तुह्मांपासून कर्ज रुपये गुजारत हाय घेतले. त्यास विल्हे स्वारीहून फत्ते करून आलियानंतर व्याजासुद्धां जो हिशेबी ऐवज होईल तो देविला जाईल. सदरहु तारीखवार ऐवज याप्रमाणें घेऊन त्याप्रमाणें हिशेब करून देविला जाईल. पैका तुह्मांस न पावे तर मुलूख तुह्मांस कमाविसीस दिल्हा जाईल. यासी व्याज तिहोत्राप्रमाणें दरमाहे दर सदे देविलें जाईल ह्मणोन पत्र १.

इ. स. १७३३-३४.
अर्बा सलासीन मया व अलफ.
मोहरम ९.

# वेठ.

[३६५] राजश्री प्रधान पंत कामगारी हरजिन्नस झाडें अवरंगाबादेहून आणविलीं असेत, ते आपणांकडील कमाविसदारास ताकीदपत्रें देऊन गांवगन्ना वेठे बरोबरी देऊन झाडें हुजूर पावते करणें. झाडें तपशील:—

इ. स. १७१९-२०.
अशरीन मया व अलफ.
रमजान २२.

मेवेची झाडें पत्री रोपें—१ बिही, १ शेव, १ अलू, १ शफताळू, १ बेदाणा, १ नाशपाती, १ गलगल, १ चकोतरा, १ कौला, १ संगतरा, १ कमरंद, १ फणस, १ बदाम, एकूण १२ येणेंप्रमाणें जिनसांची रोपें.

फुलझाडें रोप—२ केतकी व मंदमालती १ मदनबाण, १ बटमोगरा, १ गुल, १ बतमजसली एकूण ६. येणेंप्रमाणें जिनसांची रोपें.

---

(364) Fatesing Bhosle, Shriniwas Pandit Pratinidhi and Bajirao Pandit Pradhan were sent against the Shamal of Rajpuri. A loan was taken from Khandoji Gogavale for the expedition and was told that on their return, the money would be returned with interest at Rupees 3 percent per mensem and that in case of failure a province would be made over to him in Kamawis.

A. D. 1733-34.

(365) The seedlings of certain trees and plants were ordered from Aurangabad. It was directed that these should be sent in charge of men impressed for the service.

A. D. 1719-20.

[ ३६६ ] किताबतीं श्रावण बहुल दशमी सोमवासर देणें इनाम शिवाजी बिन हणमोजी गडविरीक खोत मौजे काळगांव तर्फ उंब्रज प्रांत कन्हाड याचा धाकटा भाऊ उदाजी गडविरीक मौजे मजकूरचे वेठे धेऊन कासे उंब्रजेस दिवाण वेठीस आला होता. वेठ करून माघारा गांवास जात, याजबद्दल टोकरियांत बसोन श्री कृष्णेस्त्रीकडे जात असतां कृष्णेचे मध्यभागीं टोकरा बुडाला; त्यामध्यें उदाजी मजकूर बुडोन मयत जाला. त्याच्या भावाचे व रांडापोराचे चालिलें पाहिजे. याकरितां शिवाजी गडविरीक याजवरी स्वामी कृपाळू होऊन मौजे मजकुरीं स्वराज्य तर्फेनें याचे मिरासीच्या कुणबावेया शेत आहे त्यापैकीं पडीजमीन अवल दुम सीम तीन प्रतीची बिघे ८१० कुणबाव कुळकानू हुजूरहक्क व पेसतरहक्क देखील इनाम तिजाई सेरीज हक्कदार करून यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम दिल्हा असे. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें म्हणून पत्रें देविलीं:—

इ. स. १७३७ ३८.
समान सलासीन मया व अलफ.
रबिलाखर २९.

२ फडणिसी (१ इनामपत्र शिवाजी गडविरीक, १ गांवास पत्र.) २ चिटणिसी (१ देशमुख व देशपांडिये, १ देशाधिकारी व देशलेखक वर्तमान भावी.) एकूण ४.

---

## गुलाम.

[ ३६७ ] वेतनात केसो बल्लाळ सबनीस दिमत तोफखाना लिंगी बटीक बारामतीकरीण आली तिचा कोणी खावंद नाहीं. आत्मसंतोषें बटिकपणास कबूल जाली. ते जमा करून मशारनिल्हेचे वेतनात संदून दिल्हे. बटीक १ एकूण किंमत रुपये १२.

इ. स. १७३२ ३३.
सलास सलासीन मया व अलफ
रजब २५.

---

(366) Udaji Gadwirik of Kalgaon in Tarf Umbraj while returning home from Umbraj after executing some service for which he was impressed by Government officers was drowned in the river Krishna. Inam land was therefore given to his brother and widow and children for their support.

A. D. 1737-38.

(367) Lingi, a woman from Baramati, had no master. She consented to become a slave. She was valued at Rs 12 and made over to Keso Ballal Sabnis in part payment of his salary.

A. D. 1732-33.

इ. स. १७४०-४१.
इहिदे अर्बैन मया व अलफ.
जिल्काद १५.

[ ३१८ ] किता एक पत्रें वाडियांतील कुणबिणीस सोड दिल्ही त्यास दौले सुमार ११ एकूण नांवनिशी भरून दिल्ही माघ वहुल द्वितीया गुरुवासर.

किता नांवनिशीवार. तुह्मी वाडियांत चाकरीस होता त्याचें देहावसान जालें तेसमयीं तुह्मांस माथां तेल घालून अजात केलें असे. जेथें रहाल तेथें सुखरूप राहणें. तुह्मांशी कोणास मुजाईला व्हावयास दरकार नाहीं. १ हल्वी, १ सावळी, १ सखी, १ राधी, १ कुसवी, १ तापी, १ शेवती, १ जनी १ मनकी १ मुलवी.

संतीस दिल्हें सोड अजातपत्र ऐसें जे, तुजला वाडियांत देहावसान जालें तेसमयीं दानाबद्दल खरिदी केलें होतें परंतु दानास दिल्हें नाहीं; याजकरितां तुजला सोड दिल्हे असे. तरी जेथें राहशील तेथें सुखरूप राहणें. तुजशीं कोणी मुजाईला व्हावयास दरकार नाहीं ह्मणून. येविशीं पत्र १ चिटणिशी तीथवार छ मजकूर.

इ. स. १७४१-४२.
इसने अर्बैन मया व अलफ.
रबिलावल २५.

[ ३१९ ] किता पत्र चिटणिशी तीथवार छ मजकूर बनाम एशी बायको ईस पत्र दिल्हें कीं, तूं पुरंधरीं होतीस त्यास राजश्री राणोजी भोसले याणीं हुजूर निवेदन केलें कीं, आपले कुणबिणीची पोरगी आहे त्यावरून तुजला हुजूर आणून करीना मनास आणितां मशारनिल्हेनीं तुझें लग्न केलें होतें याजकरितां त्याणीं तुह्मां कुणबिणींत ध्यावें ऐसें नाहीं. याजकरितां तुझा वारसा त्यास पोहोंचत नाहीं. तुझ्या मनास येईल तेथें सुखरूप राहणें. तुजला मुजाईला होण्यास कोणास संबंध नाहीं. येविशीं तुझे नावें पत्र चिटणिशी पत्र १.

---

(368) Ten female slaves in the service of a member of the royal family (probably Raja's wife), had their heads anointed with oil, at the time of their mistress' death and were set free. They were informed that they were at liberty to reside anywhere they liked.

A. D. 1740-41.

Another female slave who was purchased for being gifted away on the occasion but was not gifted away was also set at liberty.

(369) On the application of Ranoji Bhosle, Yesi residing at Poorandar was brought to the Huzur, and enquiries were made. It was found that Ranoji had her married (to somebody else), and that he could not therefore lay claim to her as a slave. Yesu was permitted to live where she liked.

A. D. 1741-42.

[ २७० ] किल्ला सोडपत्र चिठ्ठीशी तीमवार क नगकूर एशी तावरी हीस सोडपत्र दिल्हें ऐसी जे, इसवरी बदअमलाचें तुफान आलें यास्तव तिस हुजूर आणून किल्ले सातारा येथें महालचे कोठीस ठेविले होतें. त्यास हल्लीं इचा दादला महादजी तावरा लष्करास गेला होता तो हुजूर येऊन हिचे मुबदला दुसरी बटीक रसवी दिल्ही. त्यावरून हे बायकोस सोड देऊन तुम्हांस इचा दादला महादजी तावरा याचे स्वाधीन केलें असे. तरी तूं आपले घरीं जाऊन गुजरूप राहणें. कोणी मुजाईम होणार नाहीं म्हणून सोडपत्र १.

इ. स. १७४१-४२.
इसने अर्बैन मया व अलफ.
जिल्हेज २३.

[ २७१ ] साबाजी पाटील मौजे आरळें संमत निंब प्रांत वांई यासी आज्ञापत्र जे, तुझे बटकीची लेंक राजश्री बहिरजी धापटे यानीं आपल्या गुलामास केलियानिमित्त त्यास हुजूर आणविलें कीं दुसरियासी लग्न करितो ऐसा नादान देखत आज्ञापत्र हुजूर येणें. यासी मसाला रुपये ५ पांच देणें १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब २९.

[ २७२ ] राजश्री आनाजी सुंदर कमाविसदार मौजे वीर तर्फ नीरथडी प्रांत पुणें यासी आज्ञा जे, राजश्री गोपाळ यादव यास किल्ले सातारियाचरी सरकारची कुणबीण दिल्ही होती, ते गुदस्तां पळोन गेली. तिचें नांव जानकी. तिच्या पायांत सरकारांतून कडी घातली आहे ते तुम्हांस सांपडली तरी बखारनिल्हेकडील माणसें व हुजरे पाठविले आहे तरी कुणबीण याचे स्वाधीन करणें म्हणून ताकीदपत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
शाबान ९.

---

( 370 ) A woman having committed adultery was made a slave, and was attached to the fort of Satara. Her husband, who was serving in the army, came to the Huzur and offerd to give another slave to Government in place of his wife. The offer was accepted, and the woman was handed over to her husband.

A. D. 1741-42.

( 371 ) A daughter of a female slave of Sabaji Patil of Arle in Samat Nimb was given in marriage to a slave of Bahirji Dhapte. Sabaji was repremanded for getting the girl married to another person, and was called to the Husur.

A. D. 1752-53.

( 372 ) A female slave of Government employed under Gopal Yadao at fort Satara absconded. She had rings put round her feet. Men were sent for her arrest, and orders were issued to surrender her to them if found.

A. D. 1752-53.

# धर्मसंबंधी व सामाजिक.

[३७३] किता चिटणिशी पत्र वतनदारानी.

इ. स. १७२१-२२.
इसने अशरीन मया व अलफ.
जिल्काद १४.

दिपाजी मोकदम व समस्त दाहीजण कसबा चांभारगोंदें, मोकादम समस्त दाहीजण कसबा जिती, गोमाजी काळे मोकादम व समस्त दाहीजण मौजे पळसदेव परगणे इंदापूर, मोकादम व समस्त दाहीजण मौजे लेड तर्फ चांभारगोंदें, मायंत मोकादम व समस्त दाहीजण मौजे हिंगणी परगणे पेडगांव, मकाजी मोकादम व समस्त दाहीजण दिवेगव्हाण तर्फ राशीन, सुभाजी देशमुख व मोकादम व समस्त दाहीजण कसबा राशीन, रायोजी मुकादम व समस्त दाहीजण मौजे कोट-फळ तर्फ चांभारगोंदें, मोकादम व समस्त दाहीजण मौजे मांबोरे तर्फ चांभारगोंदें, येमाजी घसके मोकादम व समस्त दाहीजण मौजे वडगांव तर्फ पेडगांव, मानाजी मोकादम व समस्त दाहीजण मौजे कुंभारगांव परगणे रासीन, मोकादम समस्त दाहीजण कसबा पांडे पेडगांव तर्फ पेडगांव.

यांस आज्ञा केली ऐसी जे, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. पुताजी बिन मुधोजी वाडघर चौगुला कसबा जिती तर्फ चांभारगोंदें, पेशजीं दावलजी सोमवंशी याजकडे चाकर होता. लष्कराबराबर सुरत प्रांतीं गेला होता. तेथें मोंगलास हस्तगत जाला. मोंगलानें यास भ्रष्ट केला. वर्ष सवा वर्ष मोंगलांचे सेनेंत होता. राजश्री बाळाजी पंडित प्रधान दिल्लीहून आले ते समयीं पळोन लष्करांत मिळोन गांवास आला. आपली हकीकत सांगितली ते समस्त गोत बसोन मनास आणोन सदरीं गोतांत घ्यावें असें गोताचें मत जालें आहे. स्वामी आज्ञा करितील त्याप्रमाणें वर्तणूक करून ह्मणून लिहिलें तें विदित जालें. ऐसीयास पुताजी मजकूर याजवर मोगलानें बलात्कार करून भ्रष्ट केलें. हे कांहीं आपले संतोषें भ्रष्ट जाहला नाहीं. याकरितां यास गोतामध्यें घ्यावयाची आज्ञा केली आहे. तरी तुह्मीं समस्त गोत मिळोन

(373) Putaji bin Mudhoji Wadghar, Chougula of Kasba Jite in Tarf Chambhargonde, while employed under Davalji Somawanshi, went with the army to

A. D. 1721-22.

Surat. He fell into the hands of the Mogals and was polluted by them. He remained in the Mogal camp for a year. When Balaji Pandit Pradhan was returning from Delhi, Putaji joined his army and came to his village. He related the facts to his castemen who decided upon admitting him into the caste. The Patils of Chambhargonde, Rasni and other villages communicated the decision of the caste to the Raja and asked his permission to carry it into effect. The Raja direct-

शास्त्रप्रमाणें शुद्ध करून गोतामध्यें घेणें, आणि पूर्ववत वर्तन करणें ह्मणून पत्र सदरहू वतनदारास सादर केलें.

[ ३७४ ] कित्तापत्र राजश्री विठोजी शिरके यासी जाव कीं, तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति याचा आमचा शरीरसंबंध व्हावा. अनुपसिंग यासी आपली त्यांणीं कन्या द्यावी ऐसी बोली पूर्वी जाहली आहे ह्मणून अर्थ लिहिल्यावरून कळला. उभयतां अर्थी उत्तम आहे. याउपरी अखतीयार तुमचा आहे १.

इ. स. १७२६-२७. सबा अशरीन मया व अलफ. सवाल २०.

[ ३७५ ] शिंपी व रंगारी यांचा इनसाफ होणें आहे, याबद्दल त्याचे घरीं लग्न, मुहूर्त, कार्य, प्रयोजन मना केलें. कार्य प्रयोजन होऊं न देणें ह्मणून पत्र.—

इ. स. १७२८-२९. तिसा अशरीन मया व अलफ. सवाल ११.

१ आनाजी नाईक निंबाळकर परगणे फलटण याम पत्र, १ कसबा तळेगांव ढमढेरी, १ जमीदार क्षेत्र पंढरपूर, १ देशमुख व देशपांडे व मोकादम प्रांत कऱ्हाड. १ कर्यात सासवड, १ कसबा तळेगांव दाभाडी, १ परगणे शिरवळ, १ कर्यात सासवड, १ कर्यात बारामती, १ प्रांत पुणें, १ सुपें, १ वांई, १ कुरपाचेगांव, एकूण १२. पत्राबराबर चांदखान चोपदार बिरादरी तुळाराम.

[ ३७६ ] राजश्री सेखोजी आंग्रे सरखेल याचा जाब कीं, विनंतीपत्र पाठविलें प्रविष्ट जाहलें. राजश्री संभाजी आंग्रे यासी दत्ताजी देशमुख नाशिककर यांचा शरीरसंबंध केला आहे ह्मणून लिहिलें. तरी लग्नसिद्धि करून संतोषाचें वर्तमान लिहिणें १.

इ. स. १७२९-३०. सलासीन मया व अलफ. रजब २३.

---

ed that Putaji should be first purified according to the Shastras and then admitted into the caste.

(374) Vithoji Shirke wrote to say that it was previously settled that Khanderao Dabhade should give his daughter in marriage to Anupsing. The Raja expressed his approval of the match.

A. D. 1726-27.

(375) As a dispute had arisen between the tailors and the dyers and as it had not been decided, orders were issued to the officers of various provinces to prevent marriages and other festive ceremonies taking place in those castes.

A. D. 1728-29.

(376) Shekhoji Angria informed the Raja that he had arranged for Sambhaji Angria's marriage with the daughter of Dattaji Deshmukh of Nasik. He was in reply told to celebrate the marriage and to write after that happy event had taken place.

A. D. 1729-30.

[ ३७७ ] प्रांत पुणें येथील जोशियाचा व सोनाराचा उपाध्येपणाचा कजिया जाला आहे. त्यास जोशी ह्मणतात कीं, सोनारानें उपाध्येपण आपण घेऊं. ऐसीयास सोनाराचे उपाध्ये त्याचे स्वजाती आहेत त्याणीं सोनाराचे उपाध्येपणाचा हक्क घ्यावा. तुह्मीं जोशियासी ताकीद करून असा कजिया न होय तें करणें ह्मणून राजश्री बाजीराव पंडित प्रधान यास पत्र १.

इ. स. १७३०-३१.
इहिदे सलासीन मया व अलफ.
रबिलाखल २९.

[ ३७८ ] राजश्री उदाजी पवार यास पत्र जे, तिमाजी नलवडा मौजे पाडळजे परगणे सुलतानपूर येथें राहतो; तो दुलबा याचा चाकर आहे. त्याणें लग्नाची बायको टाकून दुसरे अन्य जातीचे बायकोशीं मुहूर्त लाविला आहे, लग्नाचे बायकोस नांदवीत नाहीं ह्मणून त्याचा मेहुणा हुजूर आहे याणें व बायको व सासूनें विदित केलें. त्यावरून तिमाजी नलवडा यास हुजूर आणविला आहे. तरी तुह्मीं त्याची घोडीं सहा वगैरे जैशी देखील त्यास हुजूर पाठवून देणें; मनास आणून आज्ञा केली जाईल. तिमाजीनें बायको केली आहे ते पाठवणें ह्मणून पत्र सादर केलें. या कामास रामजी शेलार दिंमत ह्या पाठविला आहे यास रुपये ५० देविले असत तिमाजीकडून देवणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७३३-३४.
अर्बा सलासीन मया व अलफ.
मोहरम १६.

[ ३७९ ] राजश्री फोंड सांवत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळे यासी पत्र कीं, राजश्री गोपाळ रामराव याचा कबिला तुह्मीं अटकावून ठेविला आहे. त्यासी निरोप देऊन पाठवणें ह्मणून पूर्वी तुह्मांस लिहिलें होतें; परंतु ते गोष्टी न केली. ब्राह्मणाचा कबिला अटकेंत ठेवावा हा

इ. स. १७३५-३६.
सित सलासीन मया व अलफ
रजब २२.

(377.) There was a dispute between the Joshis and goldsmiths of Prant Poona as to who had the right to officiate as priests of the latter caste. It was decided that as there were priests in the goldsmith's caste they and not the Joshis should receive the priests. Haks from the goldsmiths. Bajirao Pradhan was directed to communicate the decision to the Joshis and to see that no quarrel took place between the contending parties.

A. D. 1730-31.

(378) Timaji Nalawada of Padulja in Pargana Sultanpur married a second wife of a lower caste by the *Muhurta* marriage, and abandoned his first wife. The first wife, her brother and mother complained to the Raja. Orders were issued for sending Timaji with his property and his second wife to the Huzur.

A. D 1733-34.

(379) Fodsawant Bosle was reprimanded for keeping in confinement the wife of a Brahmin Gopal Ramrao and was told that such an act was opposed to the principles of

A. D. 1735-36.

महाराष्ट्रधर्म नव्हे. प्रस्तुत हे स्वामीसंनिध आहेत. तरी त्यांचा कबिला त्यांस मुक्त करून पाठवून देणें ह्मणून पत्र १.

[ ३८० ] गोदजी गायकवाड पाटील मौजे बहुली तर्फ मुठेखोरें नोकर सवब यासी अभय- पत्र दिल्हें ऐसी जे, तो हुजूर येऊन विनंति केली कीं, मामाजी घोरपडा पाटील मौजे सायगांव तर्फ मेढें याची लेंक कन्या जानी हे जोत्याजी सावंत कसबा दहिगांव कर्यात मजकूर यासी दिल्ही होती, त्यास जोत्याजी मजकूर इनला टाकून गेला. त्याचा मार्ग हुनें दहा बारा वर्षें पाहिला परंतु तो आला नाहीं. मायबापही मरोन गेला, दादल्याकडीलही कोणी अनवत चालवावयासही नाहीं. याकरितां पलीकडील वर्षी स्वामी- संनिध येऊन वर्तमान विदित केलें कीं, आपलें अनवत चालवायास कोणी नाहीं, या- उपरी आपण काय करावें? त्यावरून पाटाचा दादला करावयाची आज्ञा स्वामीनीं केली. त्यावर हे मुठेखोरें येथें येऊन देशमुख देशपांडे व गोत यास स्वामीनीं आज्ञा केलियाचें वर्तमान सांगितलें. त्याणीं मनास आणून इशीं आपणाशीं पाट लावून बायको करून दिली असें असतां यंदां राजश्री सचीवपंत याणीं आपणास मसाला करून आणून तगादा केला कीं, तूं कोणाच्या हुकमानें पाट लावला? त्यास महाराजांचे आज्ञेवरून पाट लाविला ह्मणून सांगितलें. ऐसीयास पुढें मागें कोणी आपणाशीं कजिया करील तरी हुजूरचें पत्र असावें ह्मणून विदित केलें. त्यावरून मनास आणून हें अभयपत्र सादर केलें असे. तरी तूं व हे सुखरूप नांदोन आपला संसार करणें ह्मणून अभयपत्र १.

इ. स. १७३५-३६.
सित सलासीन मया व अलफ.
जिल्हेज ४.

[ ३८१ ] पेठ कसबे भूम संमत परडे येथील शेटेपण सदाशीव साकरे याचें पुरातन; मध्यें वीस पंचवीस वर्षें दाखला नव्हता. हल्लीं साहेबाचे वेळेस जीर्णोद्धार जाहला. शेटेपणाचा अंमल करीत असतां बडेखान मुसलमान याणें ठाणेदाराचे मतें होळीस पोळी बांधली. यामुळें त्यास वेडी

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलावल २९.

Maharastra religion. He was directed to set the woman at liberty and to send her to the Huzur as Gopal Ramrao was there.

(380) A woman named Jani of Dahigaon was left by her husband. She waited for 10 or 12 years; but the husband did not return and his whereabouts were not known. Jani's relatives all died during this period and she had none to support her. She came to the Raja and asked what she should do. She was then permitted to marry a second husband by the *Pat* ceremony.

A. D. 1735-36.

(381) A Mahomedan of Peth Bhum acting in concert with the officers of the Thana made the first offering of cake to the *Holi* fire notwithstanding that the Watan

A. D. 1752-53.

[illegible] आदितवार पेठचें त्याचें शेटेपण लकडीचें आहे तें अमानत करणें ह्मणून पत्रें:—

१ राजश्री मुधोजी नाईक निंबाळकर, १ देशमुख व देशपांडे, १ चिरंजीव दर्याबाई, एकूण ३.

[३८२] किर्तापत्र चिटणिशी तीथवार छ मजकूर बनाम शेटे महाजन व देव कसबा आमदनगर यास आज्ञा जे, मल्हारजी जाधव यास तुह्मीं जातींत वर्तवीत नाहीं तर तो साळसूद कुणबी असतां व जातही कुणबी असतां न वर्तवावयाची सबब काय? तरी यास जातींत वर्तवणें. जर कोणी नपादिगर करील त्यास हुजूर घेऊन येणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७४२-४३.
[illegible] अर्बैन मया व अल्लफ.
[illegible] १.

[३८३] किर्ता एक पत्र चिटणिशी माघ वद्य एकादशी रविवासर समस्त कलाल कोंकणे वस्ती शाहुनगर व पुणें व तळेगांव यांसी आज्ञा केली ऐसी जे, रेखी कलालीण इणें हुजूर येऊन विनंति केली, आपला बाप लखमोजी जाधव कलाल कोंकणा याणें आपल्यास गरीब गुजर कलाल यासी लग्न करून दिल्हें, त्याचे संतान पुत्र तुळजा व नाना व राणा एकूण तिघे पुत्र जाले. यावरी भ्रतार मृत्यु पावला. आपणास व आपल्या पुत्रांस जातींत घेत नाहींत. तरी आपल्या बापाचे जातीचे कलाल कोंकणे कलाल आहेत, यांस आज्ञा करून गोतांत घेऊन मुलांस सोयरिक देत ऐसी आज्ञा केली पाहिजे ह्मणोन विदित केलें. त्यावरून सोमाजी सावळा वगैरे कलाल वस्ती शाहुनगर यांसी हुजूर बोलावून रेखी कलालीण व तिचे तिघे पुत्र त्यांचे हातीं देऊन यांस गोतांत घेऊन सोयरिका देणें ह्मणून आज्ञा केली आहे. त्यावरून त्याणीं रेखी कलालीण व तिच्या पुत्रास हातीं घेऊन गोतांत घेऊन सोयरिका देतों ह्मणोन मान्य केलें आहे. तरी यासी कोणी जातीविशीं दूषण न ठेवणें. दूषण ठेवील तो दिवाणाचा गुन्हेगार असें स्पष्ट समजोन वर्तणूक करणें. उजूर न करणें ताकीद असे ह्मणून पत्र १.

इ. स. १७४३-४४.
अर्बा अर्बैन मया व अल्लफ.
जिल्हेज २८.

---

of Shetye of the place belonged to another person. He was therefore imprisoned and his Watan was attached.

(382) Malharji Jadhava, though a Kunbi, was not admitted into society by his caste-people. Order was issued to the Shete Mahajan and the caste-people at Ahmednagar that this was improper, and that the man should be admitted into the caste.

A. D. 1742-43.

(383) Lakmoji Jadhav, a Kokni Kalal (Manufacturer of liquor) gave his daughter, Rekhi, in marriage to Garib, a Guzar Kalal. On Garib's death, the Kokni Kalals

A. D. 1743-44.

[ ३८४ ] राजश्री संताजी आटोळे धुरंधर समशेर बहाद्दूर यास आज्ञा की, तुळजोभट जोशी मौजे देउळगांव परगणे घाटवेरी यास मछिल गोसावी याणीं मोहोन घालून बाटविलें. कांहीं दिवस त्याचे सहवासीं होता. त्यानंतर देहावरी येऊन पश्चात्ताप होऊन क्षेत्र पैठण येथें ब्राह्मणसभेस उभा राहून आपला अपराध क्षमा करून ब्राह्मणांत घेतलें पाहिजे म्हणून वगैरे जाहला. त्यावरून समस्त ब्राह्मणाहीं शास्त्रार्थ मनासी आणितां अनुताप जाला त्यास प्रायश्चित्त देऊन ब्राह्मण्यांत घ्यावा असा निर्णय जाला. त्याउपरी समस्त ब्राह्मणांनीं तुळजोभटास प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून पंगतीपावन केला आणि समस्त ब्राह्मणांस परगणे मजकूरच्या शुद्धपत्र करून दिल्हें आहे. तर तुम्हीं परगणे मजकूरच्या देशमुख देशपांडे यांस व समस्त ब्राह्मणांस ताकीद करून तुळजोभटास पंगतीपावन करवणें. पैठणच्या पत्रास कोणी जो दिगर करील त्यास जो दिगर करावयास प्रयोजन नाहीं म्हणून पत्र १ तीथवार छ मजकूर.

इ. स. १७४४-४५. खमस अर्बैन मया व अलफ सफर ११.

[ ३८५ ] रघवंसी वस्ती पेठ सुरजी परगणे अंजनगांव सरकार गांवले प्रांत वराड याणें स्वामीसंनिध येऊन विनंति केली जे, बोहर मेहर रघवंसी वस्ती कोल्हापूर याणें आपली कन्या माझा पुत्र माधवसिंग यासी द्यावी हा विचार करून सोयरिकेच्या निश्चयास राजमण न्हावी

इ. स. १७४४-४५. खमस अर्बैन मया व अलफ. रबिलाखर २६.

---

would not admit Rekhi and her sons into the caste. Rekhi petitioned to the Huzur; the Kalals of Satara were called and were directed to admit her into the caste, and to intermarry with the family. It was ordered that any person finding fault with the Kalals for so doing would be treated as an offender.

(384) A haired Gosavi bewitched a Brahmin named Tuljo Bhat Joshi of Deulgaon in Pargana Ghatberi, and polluted him. The Brahmin was for some days in the company of the Gosavi and messed with him. The Brahmin subsequently repented for his action and prayed the Brahmins of Paithan, assembled in a meeting, to re-admit him into the caste. Having regard to his repentence, the Brahmins after referring to the Shastras, granted his prayer. The Raja thereupon issued an order directing District Officers and the Brahmins of the Pargana to admit him into the caste, and to dine with him.

A. D. 1744-45.

(385) Bohar Meher Raghuwansi of Kolhapur sent Rajman barber to negotiate for the marriage of the farmer's daughter with a son of Sukhanand Raghuwansi of Peth Surji Paragana Anjangaon of Sirkar Govale in Prant Berar. Sukhanand consult-

A. D. 1744-45.

पाठविला तेसमयीं आपण सुरजीमध्यें आपले जातीचे रघवंसी रजपूत होते त्यांस पुसोन सोयरिक मान्य करून न्हावी यास जेवावयास घालून दोन रुपये देऊन न्हावी रवाना केला. अनुकूळता करून लग्न करावें तंव कसबा मंगरूळ पिराचे येथें लछीराम सोहोडीया रघवंसी रजपूत राहतो त्याणें, बळेंच लग्न करून घेऊन गेला. ऐसीयास आपले जातीमध्यें सोयरिकीचा निश्चय जाला असतां दुसरा सोयरिक करीत नाहीं असें असून लछीरामानें आपणावरी मोरावारी केली आहे; त्यांचें पारपत्य केलें पाहिजे ह्मणून विनंति केली. त्यावरून तुह्मांस हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुह्मीं लछीराम यासी ताकीद करून सुखानंद याच्या पुत्रास दुसरी सोयरिक करून देऊन लग्न करून देवणें, येविशीं बोभाट येऊं न देणें ह्मणून तीथवार छ मजकूर पत्र:—

१ कमाविसदार दिंमत मोकाशी परगणे मंगरूळ पिरान्नें समत वाशीम, १ कमाविसदार दिंमत बाबतीत व सरदेशमुखी परगणे मजकूर.

[१८६] सरदारांनीं या गांवशिलेदारांनी व ठाणदारांनी व कमावीसदारांनी यांस पत्र जे, वेदमूर्ति बामा जोशी बिन दिवाकर जोशी कसबे वानकोंडा यांणीं स्वामीसंनिध विनंति केली कीं, श्रीमंत परमहंस अद्वैत वेदांत श्री पूर्णप्रकाश याचे मठ उभयतां गोदातीरीं परगणे वानकोंडा व परगणे वानवळे व परगणे इंदूर व आणखी जागा आहेत व शिष्यसमुदाय आहे त्यास लष्करचा वगैरे उपसर्ग लागतो त्यास ताकीद होऊन उपसर्ग न लागे तें केलें पाहिजे ह्मणून विदित केलें. त्याजवरून मनास आणितां श्री थोर तपस्वी यांचे मठ व शिष्य-

इ. स. १७४५-४६.
सित अर्बैन मया व अलफ.
साबान १०.

ed his caste, and consented to the marriage. The Barber was given a dinner and 2 Rupees, and sent back. Sometime afterwards Lachiram, a Rajput of Mangrul Perache forcibly married the girl, and took her away. According to the custom of the Rajputs, negotiations regarding Sukhanand's son's marriage having once been concluded, other Rajputs would not offer their girls in marriage to him. Sukhanand complained to the Huzur and orders were issued to the Kamavisdars to reprimand Lachiram, and to arrange for the marriage of Sukhanand's son with another girl.

(386) Bama Joshi bin Diwâkar Joshi represented that annoyance was caused to the religious asylums of Shrimant Parama Hansa Adwait Vedant Shri Poorna Prakash, founded on the banks of the Godawari in the Pargana of Wankonda, Wanwell and Indur and at other places. Orders were issued to all Sirdars, Shilledars, Thanedars and Kamawisdars, to abstain from giving any the least annoyance to the asylums and to the disciples residing therein.

A. D. 1745-46.

समुदाय निरुपद्रव रक्षिलिया श्रेयस्कर जाणोन हें आज्ञापत्र सादर केलें असे. तर जे आपला मठ व शिष्यसमुदाय असेल त्यास काडीमात्र उपसर्ग कोणी न देणें म्हणून तीथवार व मजकूर ताकीदपत्र चिटणिशी १.

[३८७] देशमुख व देशपांडिये व मोकदम व रयानी व साहुकारांनी महालानिहाय प्रांत वराड व खानदेश यांसी पत्र जे, श्री शंभूमहादेव येथें हरवर्षी प्रांत मजकुरींहून यात्रा सालाबाद दहशतीनें कांहीं सालें यात्रा येत नाहीं, ऐसीयास कजिया विल्हेस लावून सोनजी भाटगा यांस यात्रा आणावयाची आज्ञा करून तुम्हांस हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी कोणे बाबे शक न धरितां यात्रेस येऊन श्रीचें दर्शन व उदीम व्यवसाय मुदामतप्रमाणें करणें. ज्याजती मखलाक होणार नाहीं. अभय असे व श्रीच्या नवसांचे कंठाळे बैल व नवसांचीं घोडीं व गुरें व नवसांचे जिनस श्रीचे बडवे व दांगट मुलखांत फिरोन घेऊन येतात त्यास त्यांचे स्वाधीन नवसाचा जिनस करीत नव जाणें. यात्रेस येते वेळेस श्रीसंनिध घेऊन येत जाणें. ताकीद असे म्हणून पत्रें चिटणिशी कार्तिक शुद्ध अष्टमी इंदुवासर पत्रें:—

इ. स. १७४५-४६. सित अर्बैन मया व अलफ. रमजान ७.

१ देशमुख व देशपांडे प्रांत मजकूर, १ कमावीसदार दिंमत मोकाशी महालानिहाय, १ राजश्री रघोजी भोसले सेना साहेब सुभा एकूण ३.

[३८८] किल्ला देशमुख व देशपांडिये संमत जुन्नर यांस पत्र जे, त्रिंबकजी गुरव मजकूर याणें पूर्वी मुहूर्ताची बायको केली तिचें नांव भिवी. त्यास बहुत वर्षे जालीं. हल्लीं आपली जात दिकत घेती. त्यास जातीस ताकीद करणें म्हणून पत्र बरहुकूम याद चिटणिशी पत्र १.

इ. स. १७४६-४७. सबा अर्बैन मया व अलफ. मोहरम २२.

---

(387) Pilgrims from Khandesh and Berar did not visit the fair at Shambhu Mahadeo through fear. They were invited to come to the fair, and to carry on their trade without any hesitation. They were further told that they should not hand over their offerings consisting of Bulls, horses and other articles to the Badwes and Dangats who wander over the country for the purpose, but should present them in person to the deity.

A. D. 1745-46.

(388) Trimbakji Gurav married a woman named, Bhiwi, by the *Muhurta* form of marriage. After the lapse of many years, the caste-people raised objections to the marriage. The Deshmukhs and Deshpandes of Prant Junnar were ordered to direct the caste people to raise no objections.

A. D. 1746-47.

[२८९] वेदशास्त्रसंपन्न दामोदरभट बिन दादंभट व रामभट बिन वासुदेवभट व नारायणभट बिन त्रिमलभट व विनायक दीक्षित बिन भटंभट उपनाम सफरे संगमेश्वरकर गोत्र अग्नि सूत्र आश्वलायन यांनीं मुकाम मजकुरीं स्वामीसंनिध येऊन निवेदन केलें जे, तळकोंकण प्रांतीं अहद साळशीं तहद दाभोळची खाडी यामधील देश आहेत तेथील महत्कृत्य, अनुष्ठानें व देवप्रतिष्ठा व कलशारोपण व ध्वजारोपण व अर्चा व चलअर्चा व रुद्रेकअनुष्ठान व अश्वत्थोद्यापन आरामोद्यापनादिक अनुष्ठानें होतील, तेथें आचार्यत्व मुख्य मौनवृत्ति आपली, दुसरियास संबंध नाहीं. याप्रमाणें वृत्ति आमचे मूळपुरुष महादेवभट पटवर्धन सफरे बिन कृष्णंभट सफरे यांची इस्तकबील कारकीर्द विजापूरपासून वृत्ति आहे. प्रभावळीकर यानींही आपलीं पत्रें करून देऊन वृत्ति चालविली. व महाराज कैलासवासी स्वामींनीं पूर्वील पत्रें भोगवटा मनास आणून आपलीं पत्रें करून देऊन वृत्ति चालविली, त्यास आपणाशीं पत्रें होतीं तीं धामधुमेच्या प्रसंगांत गेलीं. एक पत्र लखमोजी राजे प्रभावळीकर यांचें व वेदशास्त्रसंपन्न राजश्री श्रीकराचार्य पंडितराव यांचें पत्र एक ऐशीं आपणाशीं आहेत, तीं स्वामीनीं मनास आणून पत्रें करून देऊन वृत्ति वंशपरंपरेनें चालविली पाहिजे ह्मणून निवेदन करून प्रभावळीकर व पंडितराव यांचीं पत्रें आणून दाखविलीं. तीं मनास आणून स्वामी याजवरी कृपाळू होऊन सदरहू प्रांत मजकुरीं महत्कृत्य वगैरे अनुष्ठानें होतील तेथें आचार्य स्वमुख्यमानें पूर्वी यांचे वडील महादेवभट पटवर्धन बिन कृष्णंभट सफरे यांचे वृत्ति विजापूरचे कारकीर्दीपासून आहे त्याप्रमाणें करार करून पत्र सादर केलें असे. तरी प्रांतमजकुरीं सदरहूप्रमाणें यांचे आचार्यत्वाची वृत्ति हे व यांचे विभागी भाऊ अनभवीत आहेत. यांसी व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणें. हे वृत्तीविशीं दुसऱ्या ब्राह्मणास संबंध नाहीं ह्मणून पत्रें चिटणिशी पौष बहुल तृतिया गुरुवासर.

इ. स. १७४७-४८.
समान अर्बैन मया व अल्लफ.
रबिलाखर ६.

१ देशमुख व देशपांडे महालनिहाय आहद साळशी तहद दाभोळची खाडी.
१ देशाधिकारी १ तुळाजी आंग्रे सरखेल. १ वेदशास्त्रसंपन्न याचे नावें.

(389) The right of officiating as the Chief priest at important religious ceremonies in Southern Konkan, from Salsi to Dabhol, belonged to a family surnamed Sufre, from the days of the Bijapur Government. The family had also in its possession a letter regarding their rights from Lakhmoji Raje Prabhawaliker and Shrikaracharya Panditrao. The right was ordered to be continued to the family.

A. D. 1747-48.

[ ३९० ] कितापत्रें चिटणिशी कासार तांबट व सोनार वगैरे पंचाळ्यामध्यें व वाणी बकाल यामध्यें लग्नाचे वरातीबद्दल कजिया लागला आहे. त्याचा निवाडा करावा लागतो. त्यास गावोगांव व शहरामध्यें पंचाळाचीं लग्नें होतात तेव्हां पंचाळाचा नवरा हमरस्ता वारी पेंठांतून वरात मिरवत येतो कीं नाहीं व पूर्वी याचा कजिये जाहले होते तेसमयीं निवाडा कसा जाहला व मलीकअंबराचे वेळेस इनसाफ झाला ते समयींचीं पत्रें पंचाळाजवळ आहेत. त्याचा दाखला कसा आहे व परगणे मजकूरच्या पेठ्यांतून कैसी चाल चालते येत आहे ते सत्य स्मरोन बेतालीसपूर्वक तपशीलवार हुजूर लिहून पाठवणें ह्मणोन पत्रें :—

इ. स. १७४७-४८.
समान अर्बैन मया व अलफ.
साबान २४.

किता पत्रें देशमुख व देशपांडे यांचें नांवें.

१ प्रांत कऱ्हाड.
१ प्रांत कोल्हापूर.
१ प्रांत पुणे.
१ प्रांत जुन्नर.
१ प्रांत खटाव.
१ प्रांत फलटण.
१ प्रांत पनाळा.
१ प्रांत कल्याण व भिंवडी.
१ प्रांत शिरवळ.
१ परगणे पैठण.
१ परगणे बृध.
१ कर्यात माइणी.
१ प्रांत दाभोळ.
१ तर्फ वोम्नरपाधवड.
१ प्रांत राजापूर.
१ परगणे महाड.

किता.

१ राजश्री जगजीवन पंडित प्रतिनिधि यांसं जिल्हेंतील राजापूर, चिपळूण, कऱ्हाड, खटाव, माइणी, सांगोले, मिरज, विजापूर, अथणी, वाइ येथील पेटांतील तहकीकात मनास आणणें.

१ राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांसी जिल्हेंतील बीड, जुन्नर, वोम्नर, शिरूर, नाशीक, पैठण, कल्याण, भिंवडी, पुणे व मुंबइ येथील पेठांतील तहकात करून.

१ राजश्री चिमणाजी नारायण सचीव जिल्हेंतील तहकिकात मनास आणून.

१ राजश्री भवानीशंकर पंडित राजाज्ञा.

१ राजश्री यशवंतराव महादेव माहाडाविशी.

१ शिवजी साळोखे मिरज प्रांतीं तह कैसा आहे तो.

(390) There being a dispute in regard to marriage processions between the Panchals (*i. e*. Kasars, workers in lead, Goldsmiths &c.) and the Wani Bakals (traders), the officers of the various provinces and the district Hereditary officers, were directed to supply information on the following points:—

A. D. 1747-48

१ परगणे सांगोले.
१ परगणे सिरूर.
१ परगणे कुडाळ.
१ परगणे नाशीक.
१ परगणे बंकापूर.
१ परगणे बीड.
१ मामले वेंकुल.
१ परगणे अथणी.
१ प्रांत विजापूर.
१ परगणे बागलकोट.
१ शेटमाहाजन बंदर मुंबई. ए. २७.

१ मुधोजी नाईक निंबाळकर फलटणचा पेठांतील.
१ मालजी आगरे बजारनमहा.
१ तुळाजी आगरे सुरलेल.
१ नागोजी वाडगे बुधच्या पेठांतील.
१ जयराम सांवत व रामचंद्र सांवत भोसले देसाई प्रांत कुडाळ. ए. ११.

[ ३९१ ] संताजी शेटे कसबे शिरवळ परगणे मजकूर यांस आज्ञा जे, आपले लेंकीची सोयरिक जिजा रिटे याशी करून मग दुसरेस देतोस ऐसा नादान. तर आपली लेंक जिजाजी रिटे यास देणे. या कामास बहिरजी यादव व राणोजी जगताप दिमत मल्हारजी भोसले यास १. ज्यांणीं फिरावून सोयरिक केली त्यास मसाला रुपये ९, हुजरे

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
मोहरम ७.

रुपये ९ देणे लागवून पत्र महारनिल्हे कामें २.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रबिलाव्वर २३.

[ ३९२ ] संताजी हागवणा वस्ती पेठ मंगळवार यासी ताकीद कीं, तुह्मी लेंक होनाप्पा रवळे याच्या लेंकास देऊन लग्न करून वर्षे आठ जाहलीं ते मूल नांदत नाहीं तें नांदेशी करणें ह्मणून पत्र १.

1 Does the Bridegroom in a Panchal's marriage go in procession through all the streets and Peths.
2 How was the question decided on former occasions of dispute.
3 Is there any record to show the decisions passed in this connection by Malik Amber.
4 What is the practice in the Peths.

(391) Santaji Shete, notwithstanding his promise to give his daughter in marriage to Jija Rite, was offering her to some other person. He was directed to fulfill his promise, and to give the girl in marriage to Jija. A fine of Rs. 10 was imposed upon him.

A. D. 1752-53.

(392) A daughter of Santaji Hagawana of Peth Mangalwar kept herself away from her husband's house for 8 years after her marriage. Santaji was directed to induce her to live with her husband.

A. D. 1752-53.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रविलाखर २३.

[ ३९३ ] संताजी गाडला तांबुळी वस्ती मौजे कुमठे तर्फ सातारा, तुम्ही लेंक नवरी आहे, ते तुवां होनापा रवळे याच्या लेंकास देणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलावल २३.

[ ३९४ ] नाईकजी घाटगा यांसी आज्ञापत्र जे, मौजे लासुरणे येथें असतां तू आपली लेंक राणोजी शिंदा मुक्काम मौजे कोंपरली प्रांत शिरवळ यासी न पाहतां देऊं केलीस. हल्लीं पाहू जातां रक्तपित्या निघाला. तेव्हां आल्या वरास देणें ह्मणून अभयपत्र. तुम्हासी कोणीही हरकत करतील त्याचें पारपत्य हुजूरून केलें जाईल ह्मणून आज्ञापत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जमादिलाखर ५.

[ ३९५ ] गंगाजल निर्मल संतुबाई घाटगी यासी आज्ञा केली ऐशी जे, बापू व खंडेराव शिंदे यासी वधु एक सहा वर्षांची. व एक चहूं वर्षांमध्यें दोन्ही नवऱ्या पाहून हुजूर आज्ञापत्रें सादर करणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब १.

[ ३९६ ] मोकदम मौजे अंगापूर तर्फ वंदन यांसी आज्ञा, नागोजी बिन नरसोजी कणसे परगणे मौजे मजकूर याचा चाकर पिराजी जाधव गांवांत आंब्याचें झाड होतें त्यावर आंबे तोडावया चढला. त्यास झाडाखालीं मौजे मजकूरच्या चांभाराची पोरगी उभी होती. त्यास

A. D. 1752-53.

(393) A Tamboli (leaves-seller) of Kumthe in Tarf Satara, who had a marriageable girl was directed to give her in marriage to Honappa, Rewle's son.

A. D. 1752-53.

(394) Naikji Ghatge agreed at Lasurne to give his daughter in marriage to Ranoji Shinde of Koperly in Prant Shirwal. It was afterwards discovered that Ranoji was affected with leprosy. Naikji was therefore permitted to withdraw from his agreement, and to give his daughter in marriage to any person he liked. It was ordered that if any one obstructed him, he would be punished.

A. D. 1752-53.

(395) Santubai Ghatgi was directed to select two brides for Bapu Khanderao Shinde, one aged 6 years, and the other four (4) years, and to write to the Huzur.

A. D. 1752-53.

(396) Piraji Jadhav was accused of adultery with a girl of the Chambhar caste. The charge was proved to be false. The caste people, however, refused to admit Piraji into the caste. The Patil of Angapur was therefore informed that no guilt attached to Piraji, and that the caste-people should dine with him.

मौजे वारणे येथील महार झाडाखालीं आले, त्यांस जाधव मजकुरानें झाडाखालीं उडी टाकून पळाला. जे हे रावणदार आंब्याने ह्मणऊन पळाला. त्यास चांभाराची पोरगी दोघे एके जागा पाहिली. त्यावरून माहारांनीं जाधवावर चांभारणीचें तुफान केलें. त्यावरून किल्ले सातारीयासीं वर्तमान कळलियावर किल्लेकरी यांणीं माणसें पाठवून तहकीकात करितां गोष्टी लटकी जाहली. त्यास जाधव मजकुरास गोतानें दिकत घेतली. त्यावरून किल्लेकरी यांणीं हुजूर विदित केलें. त्यावरून तुह्मांस हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी जाधव मजकुराकडे कांहीं लिगाड नाहीं. येविशीं किल्ले मजकूरच्या लोकांनींही तहकीक केलें असे. तरी भोवरगांव मौजे मजकूरचें गोत मिळोन पिराजी जाधव यासी पंक्तींपावन करणें. त्याजकडे कांहीं लिगाड नाहीं. यचा बोभाट हुजूर येऊं न देणें. १ मोकदमास मौजे अंगापूर सदरहू. १ राजश्री रंगोजी मोहिते हवलदार किल्ले सातारा, एकूण २.

[ ३९७ ] राजश्री नारो बाबाजी यांसी आज्ञा जे, मौजे खेडच्या शिवेमध्यें हणमंताची

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
रजब २३.

मुहूर्त पुरली आहे ते काढून श्री कृष्णातीरीं माहुली येथें स्थापना करणें ऐसी आज्ञा तुह्मांस रुबरू केली होती. ती व हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी मुहूर्त गाडीयावर घालून माहुलीस राजश्री गोपाळ कृष्ण यांचे स्वाधीन करणें. ते स्थापना करतील ह्मणवून पत्र १.

[ ३९८ ] श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेबांचे शेवेसी. विनंति शेवक आज्ञाधारक

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
साबान ६.

भिवजी शेडगे चाकर हुजूरांत. जोहार शेवेची आर्दास लिहून दिल्ही ऐसी जे, मौजे अर्वी तर्फ तारगांव येथें सरकारची शेरी आहे त्यास साहेबीं माझे स्वाधीन देखरेख केली आहे. तरी मोकदमास साहेबाचें पत्र आहे त्याप्रमाणें मोकदम जो सरकारचे शेरीचा डाग दाखवितील त्याणीं लावणी संचणी आपण करून शेरी लाऊं यासी नवादिगर होणार नाहीं. हे शेवेशीं आर्दास लेहून दिल्ही.

(397) There was an idol of Hanumant buried within the limits of Khed.

A. D. 1752-53

Orders were sent to Naro Balaji to take it out, and to arrange for its consecration at Mahuli on the banks of the Krishna.

(398) A lease of land at Aravi in Paragana Targaon was executed

A. D. 1752-53.

by Ardas Bhiwaji Shedge in favour of Shrimant Maharaja Matushri Ai Sahib (who, it appears, was then in power). The term used in this document by the writer who is a Maratta to express compliments is '*Johar*'.

[ ३९९ ] राणोजी धुमाळ पाटील मौजे सोनके संमत वाघोली प्रांत वाई यानें बटीक

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
सवाल १८.

बनाम उमी अंबाजी निकम याजवळी मौजे पठार प्रांत मजकूर येथें विकत घेतली. चार वर्षें त्याचे घरीं आहे. अंबाजी निकम कोणी-कडे गेला त्याचा थांग न लागे. ती बटीक हैबतजी सरक वस्ती मौजे तांबवे प्रांत फुलटण याची पळोन राजश्री सुभेजी नाईक निंबाळकर याच्या घराम गेली. तेथून काढून अंबाजी निकम याणें आणून विकली. ती हैबतजी सरक यानें आपली उनंगली आणि राणोजी पाटीलपासून नेली. परंतु त्यानें सांगितलें कीं, ती बटीक बाटगी मुसलमानाचा अन्नव्यवहार केला होता असें सांगितलें. त्यावरून राणोजी पाटील यांस प्रायश्चित्त द्यावयाविशीं पत्रें. —

राजश्री हैबतराव भवानीशंकर अजहत देशमुख प्रांत मजकूर यांचे पत्र १.

संमत वाघोलीचे गांव.- -१ वाघोली, १ मोळसी, १ नायगड, १ नाद्वहाल, १ कजेबोप, १ दहींगाडव, १ तडवळे, १ पिंपोडेबुद्रुक, एकूण ८.

[ ४०० ] राजश्री शिवराम पंडित अमात्य यांचे स्त्रीस बरें वाटत नाहीं याकरितां

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिल्काद १८.

मौजे धोमास श्रीच्या सेवेकरतां रवाना केली आहेत. त्यानें सर्व प्रकारें साहित्य शाकभाजी, गवत फाटें उपसाहित्य लागेल ते देणें. कोणेविशीं अंतर न करणें म्हणून पत्रें:—

१ राजश्री चिमणाजी पंडित सचीव, १ राजश्री हैबतराव भवानीशंकर सुभेदार प्रांत वाई. १ किल्ले पांडवगडास, १ मौजे धोम तर्फ हवेली प्रांत वाई, एकूण ४.

[ ४०१ ] राजश्री साबाजी घाटगे यास आज्ञा जे, राजश्री भिकाजी सिर्के हवालदार

इ. स. १७५२-५३.
सलास खमसैन मया व अलफ.
जिल्हेज ५

किल्ले वारुगड याची पुत्र ते नवरा आहे त्यास तुह्मांकडून नव-ऱ्यास मुली आहेत. याजकरितां तुह्मांकडे भला माणुस मशार-निल्हे पाठविले होते. त्यांस तुह्मी हुजूरच्या पत्राचा हुजूर धरिला

(399) Ranoji Dhumal of Sonake in Samat Vagholy purchased a

A. D. 1752-53.

female slave, who, it afterwards turned out, had messed with Mahomadans. Haibatrao Bhawani Shanker Ajahat Deshmuk of Wai, and the people of 8 villages were directed to administer penance and purify him.

(400) Siwaram Pandit Amatya's wife being ill was going to Dhoum

A. D. 1752-53

to offer prayers to the deity. The Pant Sachiv and the Subhedar of Wai were directed to assist her.

(401) Bhikaji Sirke. Havaldar of the Fort of Warugarh, offered his

A. D. 1752-53.

daughter in marriage to Sabaji Ghatge's son. Sabaji desired that the permission of the Raja should be obtained to the match. The permission was granted.

म्हणून विदित झालें. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी शिर्के मजकूर याचा तुमचा पुरातन शरीरसंबंध आहे. तरी मुखरूप होऊं देणें म्हणून पत्र १.

# सार्वजनिक उत्सव.

## इतर राजे अगर बडेलोक ह्यांच्या भेटी व त्यांजकडून नजराणे वगैरे.

इ. स. १७२३–२४.
अर्बा अशरीन मया व अलफ.
रबिलाखर १७.

[ ४०२ ] संक्रमणाचे तिळगुळ व पदरचे सरदारास पाठविले त्या कामास लोक पाठविले यास याम वेतनात देविले:——

| | |
|---|---|
| राजश्री धनाजीपंत यांजकडे. | राजश्री शिदोजी निंबाळकर यांजकडे. |
| अगोजी जाधव यांजकडे. | चिमणाजी पंडित राजाज्ञा यांजकडे. |
| राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति. | देवाजी सोमवंशी यांजकडे. |
| कानोजी भोसले यांजकडे. | केरोजी पवार. |
| माणकोजी वायसे. | त्र्यंबकराऊ दाभाडे. |
| रत्नोजी पांढरे. | यशवंतराऊ पांढरे. |
| पदाजी बंडगर. | दामजी सोमवंशी. |
| पिलाजी जाधव. | कान्होजी आंग्रे सरखेल. |
| रामाजी जाधवराऊ. | मालोजी बंडगर. |
| राजश्री कान्होजी भोसले. | राणोजी भोसले. |

इ. स. १७२६-२७.
सबा अशरीन मया व अलफ.
सफर ८.

[ ४०३ ] विजयादशमी जमा नजर.

| | रुपये. | मोहरा. | कापड सणंग. | | रुपये. | मोहरा. | कापड सणंग. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| जिल्हा प्रतिनिधि. | ५०० | ० | ० | महिपतराव. | १० | ० | ० |
| जिल्हा पंतप्रधान. | ३२४ | ० | ० | जीवनबोहरी. | १ | ० | ० |

A. D. 1723-24.

(402) This gives us a list of Sardars in Cam, to whome *sesame* were sent on the *Sankraman* festival.

A. D. 1726-27.

(403) This gives a list of the persons making presents to Raja on the Dasara festival.

| | रुपये. | मोहरा. | कापड सणंग. |
|---|---|---|---|
| राजश्री पंतअमात्य. | ० | ० | २ |
| १ शेला. | | | |
| १ तिवट. | | | |
| — | | | |
| २ | | | |
| जिल्हा पंतसचीव. | ० | १४ | ० |
| पंतसुमंत. | ० | १ | ० |
| राजश्री नारोराम मंत्री. | २० | ० | ० |
| पंताजीपंत. | १०० | ० | ० |
| यादवगोपाळ. | ५० | ० | ० |
| यशवंतराऊ. | ५०० | ० | ० |
| नरसिंगराऊ ठाकूर. | ५ | ० | ० |
| वेंकटराऊ. | २ | ० | ० |
| बाजीराव. | ५ | ० | ० |
| पुत्र यादवगोपाळ. | २ | ० | ० |
| मल्हार खंडेराव. | ५ | ० | ० |
| दादोबा. | ५ | ० | ० |
| गोविंद प्रभु. | ३ | ० | ० |
| गंगाधर. | १ | ० | ० |
| हुजूरबाजार. | १००० | ० | ० |
| बेगजी. | २ | ० | ० |
| बाबुराव. | ५ | ० | ० |

| | रुपये. | मोहरा. | कापड सणंग. |
|---|---|---|---|
| दादेराव भीमसेन. | ५ | ० | ० |
| कवेश्वरबावा. | ० | ० | ५ |
| मंदील. | | | |
| जामा. | | | |
| मिमा. | | | |
| तुमान. | | | |
| दुपटा. | | | |
| — | | | |
| ५ | | | |
| मल्हार खंडेराव चिटणीस. | ४ | ० | ० |
| विठ्ठल विश्वनाथ. | २ | ० | ० |
| महादाजी गदाधर. | ३ | ० | ० |
| मोरो शामराज. | १०० | ० | ० |
| शंकराजी सगोजी. | २ | ० | ० |
| भवानीदास मुनसी. | २ | ० | ० |
| नारो प्रल्हाद. | १ | ० | ० |
| बाळाराम मोदी. | २ | ० | २ |
| हिराजी पवार. | ० | ० | २ |
| १ मंदील. | | | |
| १ शेला हिरवा. | | | |
| — | | | |
| २ | | | |

इ. स. १७३३-३४. [ ४०४ ] तीळगुळ पाठविला तो घेणें म्हणून पत्रें.
अर्बा सलासीन मया व अलफ.
सावान २९.

१ राजश्री देवजी सोमवंशी, १ राजश्री रघोजी कदमराव. १. राजश्री चिमणाजी बल्लाळ, १ राजश्री संभाजी आंग्रे, १ राजश्री बाजीराव पंडित प्रधान, १ राजश्री त्रिंबकजी काकडे दिनकरराव, १ राजश्री बाळाजी बाजीराव, १ राजश्री मुरारजी घोरपडे, १ राजश्री

---

A. D. 1733-34. (404) This gives a list of the officers to whome sesame were sent on the Sankrant festival.

[राव घोरपडे, १ राजश्री रघोजी भोसले, १ राजश्री दमाजी गाइकवाड, १ राजश्री [..]गाजी दाभाडे, १ उमाबाई दाभाडी, १ राजश्री बाबुराव दाभाडे सेनाखासखेल, [१] राजश्री यशवंतराव दाभाडे सेनापति, १ राजश्री उदाजी चव्हाण, १ राजश्री आनंदराव [स]ोमवंशी सरदार सरलष्कर, १ सखोजी वागमोरे सेना बारासहस्त्री, १ राजश्री सुभानजी [म]ाहार्णनवार फत्तेजंग बहाद्दर, १ राजश्री चव्हजी बळवंतराऊ दउकात, १ राजश्री संताजी [..]बले, १ राजश्री पिलाजी जाधवराव, १ राजश्री त्रिंबकराव हिंदुराव सोमवंशी, १ राजश्री [..]ाजी यवले, एकूण २४.

इ. स. १७३४-३५. [ ४०५ ] नजर दसरा मोईनी.
[सन ख]मस सलासीन मया व अलफ. जमादिलावल ८.

| नजर दसरा. | मोईनी. |
|---|---|
| ५ राजश्री दादोबा. | ५०० प्रतिनिधि. |
| १ रावो मुरे दिंमत कानोजी भोसले. | ३२४ प्रधानपंत. |
| २ प्रयाग प्रभु. | १६७ सुरनीस. |
| ५ विठोबा. | ———— |
| २ बलिराम मोदी. | १००१ |
| ५ लक्ष्मण नानाजी. | |
| ५ दादेराऊ. | |
| १ यादवप्रभु याचा पुत्र भास्कर. | १०० भगवंत शामराज. |
| १ जनार्दन नाईक. | १०० केदारजी केशरकर. |
| ५ राजश्री आणय्या मूळ नांव रघुनाथपंत | ५० बाजीराव यादव. |
| २ विठ्ठलराऊ बक्षी. | १०० बाळाजी डुबल. |
| १ अनंदराऊ दिंमत बक्षी. | १०० येस माळी खागगी. |
| १ [जागा कोरी आहे] दरेकर. | १०० रत्नाकरपंत. |
| १ शिवाजी शामजी देशपांडे वाई. | १०० महादाजी कृष्ण. देशमुखी कऱ्हाड. |
| ५ रामाजी गणेश मुताळीक. | |

| मजमू. | गाडेखानी भापकर दिंमत. |
|---|---|
| १ कतीहू नाईकाचा लेक. | राजश्री फत्तेशिंग बाबा मोहिते. ५० |
| २ रावो रामाचे पुत्र. | कुमाजी दशपुत्र. १ |

A. D. 1734-35. (405) This gives a list of officers and persons who presented nazars to the Raja on the Dasara festival.

नजर दसरा.

२ कृष्णाजी महादेव जकाते.
१०० केसो हरी बाजर व त्याचे पुत्र.
२ भावशिंग.
२ गंगारामपंत.
२ जिवाजी फर्जंद.
१ जिवाजी नाइकाचा लेक तुळाजी भोई.
२ दत्ताजी रघुनाथ.
१ महिपतराऊ दत्ताजी.
२ भास्कर कृष्ण.
० देवबा.
० जगोबा.
५ चिटकोबा.
१ अनंदराव बहिरव.
१ गोपाळराम दफतरदार सुरनीस.
५ त्रिंबकराव धायगुडे.
५ गंगाधर महादेव.
५ गोविंद महादेव फडणीस.
२ मल्हार नारायण.
१ सोयरो नरसिंह.
४ ठाकूर नातू सोनवाडी.
२ चूडामण ठाकूर.
१ राघोराम.
२ नानोजी भोइटे.
१ भोगोजी.
१ साहेबराऊ.
२ देवजी शिर्के.
१ नारो लक्ष्मण.
५ कारकून पवार.
२ द्वारकोजीराव पाटणकर.
१ वेंकाजीपंत.
२ लक्ष्मणपंत.

मोहीम.

नरशिंगराऊ. १
ठाकूर. १
अनंदराव दिवाण सरलष्कर. १
देवबा मसकर. पोपाल २
मुकुंदजी साळोखी. १
[जागा कोरी आहे.] १
१ रंग सेणवी.
० सुभेरगीर.
आभुराव याचा मूल.
२ मजमदार.
देवबा जगोबा
पोपाल.
१ कर्णगीर गोसावी पासोडी व तीवट.
१ घेवा मसकर.
सुमेरगीर यास तरवार.
देवाजी कचेश्वर.
१ तिवाट.
१ शेला.
१ शगा.
१ जिमा.
१ इजार.

५

१ प्रसादगीर तिवट.
१ कृष्णभट नवते.
१ दत्ताजी खंडागळा.
१ तिवट.
१ शेला दोरबेवजा.

२

३ नरसीपंत दुबळ.
४ रंगोपंत व त्याचा पुत्र पंत पवार.
२ मिरजा.
२ जमिनीस सरलष्कर.

१ केदारजी केसरकर.
तिवट.
सेनापति पोशाख.
सरलष्कर किंतानी.
चादर.

## नजरनक्त.

२ नारो येसाजी.
५५ तोफखाना.
 १ जानाजी.
 १ मजमदार.
 १ फडणीस.
 १ शिवबा दफतरदार.
 १ निंबाजी नाकेदार.
 ५० किरकोळ जमा जमातेदार.
 —
 ५५
६ ( नांवनिशी लागत नाहीं. )
४ चितोराम व अपाजीराम.
२ शिंदो बापूजी तडवळकर.
३ देशमुख परंडे.
 खंडोजी खापडे.
१ ( नांव लागत नाहीं. )
१ खिजमतगार.
१ माहादु कासार.
५ जिवबा चिटणीस.
१ नरसिंगराऊ दिंमत ठाकूर.
० अवजी कासार दिकब जोड.
२ रामचंद्र रघुनाथ.
१ नरबा अनंतराव.
१ येसाबा इमारतीकडील.
१ रामजी हरी इमारती.

२ पांडुरंग खंडेराऊ.
२ परशरामपंत दिंमत दादेराव.
१ रामा.
२ देवबा भास्कर मोहरा व रुपये २ व तिवट.
२ कोणेरराव.
६ धोंडो गोपाळ.
 ३ खासगत.
 १ कानोबा.
 १ गोविंदपंत.
 १ माहादाजी गणेश.
 —
 ६
१ बाळोजी धोंडो.
१ गणेश अनंत.
२८ दिंमत देवराव दरोगे.
 १ किरकोळ नांवनिशी.
२ खंड प्रभु जामिनीस.
 सेनापति.
२ बाळकृष्ण जिवाजी दिवाण.
१३ निंबाजी कोंड देशमुख.
५ अपाजी पाटील रहिमतपूरकर.
 ३ गडकरी.
 १ लिंगोजी मिरशीकर.
 १ नारबा.

९ लक्ष्मण गोविंद.
२ हिरोजी शिर्के.
१ रामचंद्र चोपदार.
१ रामचंद्र चोपदाराचा लेक.
१ हाजारी.
९ सोनगीर गोसावी.
१ शिलेदार.
१ देशमुख तर्फ परळी.
२ व्यंकाजी हवालदार दिंमत एस माळी.
२ नानोजी बणवे.
९ चिंतामण थोरात.
१ शिवराम चोपदार.
२९ दिमत नारोराम मंत्री.
२० खासा.
२ शीवबा.
३ लाला.
२९
१ कासार.
९ कारकून दिंमत खाल्सा.
१ चितोबा फडणीस.
१ गंगोबा चिटणीस.
१ मोरो शिवदेव.
२ गोपाळराव.
९
२ मेघःशामपंत देवराम याचा बाप.
० काशी अनंत न्यायाधीश.
० राजश्री यशवंतराव सेनापति.
० त्र्यंबकराव सो.
० सरलष्कर
० जानो शंकर.
१ [जागा कोरी आहे] भाचा.
० जानोपंत.

७ धापटे.
१ पाटिली गांवकर.
१ शेजली कोड.
१ तुळाजी शिवजी पोतदाराचा लेक.
१ बाळकृष्ण चोपदाराचा लेक.
१ रंगराव उद्धव.
२ भास्कर वैद्य.
१ रंग प्रभु
२ मोरोपंत बक्षी.
१ खंडो मोरेश्वर बक्षी.
१ अपाजी शेणवी.

१ [जागा कोरी आहे] जाधव.
९ महादाजी गणेश.
१ फडतरा.
२ नारोराम दिंमत.
१ मल्हारराव कृष्ण.
२ नागोजी भोता.
१ बाबुराव दिमत बक्षी.
२ कृष्णाजी शिवाजी.
२ रघुनाथ भट.
८ दिंमत सुमंत.
२ कृष्णराव.
२ महिपतराव.
२ आणा.
२ मल्हार.
८
९ यशवंतराव कानोजी भोसले.
राजश्री फत्तेसींग भोसले मोहरा २९.
नारो शंकर १.

| | | | |
|---|---|---|---|
| ९१ | ३ | डोबावरी | डोहावरी |
| ९३ | १ | जुवारहिन | जुवाहरिक ( ? ) |
| ९६ | २ | नातें | जात |
| ,, | ८ | नातवानी | जातवानी |
| ,, | १८ | बडवणी | बडवाणी |
| १०० | १६–१८ | पैसे | पेवें |
| १०१ | ९ | इनाम | इमान |
| १०४ | १० | साटक | साटला |
| १०६ | ६ | शिंध | सिंधु |
| १०७ | २६ | awey | away |
| १०९ | २९–३१ | suburl | suburb |
| १११ | ९ | गढ् | रह |
| ११७ | ५ | तिळतुल्या | तिळतुल्य |
| ,, | १९ | way | ways |
| १२१ | १४ | मेणोलीस | मनोलीस |
| १२७ | १९ | ८१ गगनगड ऊर्फ हुलडा | ८७ गगनगड ऊर्फ वानडा |
| १२९ | १ | कोमनगड दिवा | कोकणगड दिवा |
| १३२ | ४ | मार्फ..ला | माफिक |
| १३७ | १३ | तहकाम | तहकोक |
| १५५ | ७ | बेपांशी | बोपोशी |
| ,, | २७ | directed | decided |
| १५६ | ४ | गैररजात्रद ल्यांुढ ' होऊन ' असें | वाचावें. |
| १६० | १० | पाटिसकीच्या | पाटिलकीच्या |
| ,, | १७ | जापल्यास | आपल्यास |
| १६३ | १८ | धायटी | धायरी |
| १८४ | ४ | करून | करून |
| १९० | ३२५ कलम | रजक २८ | रमजान ८ |
| १९१ | ५ | पोस्ताचे | शेनाचे |
| १९३ | २८ | conceat | conceal |
| १९९ | १३ | कोहार | कहार |
| २१० | ५ | मुजपात | सुज्यात |
| २११ | ८ | कमाविस | कमाविसीस |
| २१३ | १०–१७ | मुजाईला | मुजाहिम |
| २१४ | ५ | ,, | ,, |
| २१६ | १३ | गाधाडी | दाभाडे |
| २१७ | ११ | झेशी | मवेसी |
| २२३ | ७ | मोनवृत्ति | मान वृत्ति |
| २२९ | १४ | बंडगर | बाडगर |
| ,, | ,, | दामजी | [illegible] |
| ,, | १५ | रामाजी | रायाजी |
| २३१ | ६ | बवले | अटोळे |

टीपः—मूळ कागद नकलरूपानें आल्यामुळें मोडी लिहिण्यांत पुष्कळ चुका झाल्या आहेत. त्यांत, शक्य तेवढ्या [illegible] आहेत.

# शाहू महाराज ह्यांचे रोजनिशींतील कठीण शब्दांचा कोश.

| पृष्ठ. | लेखांक. | शब्द. | अर्थ. |
|---|---|---|---|
| १ | १ | बदल देणें. | मोबदला देणें; खर्चाकरितां देणें. |
| ,, | ,, | लबे. | लब; जासूद; जासूदगिरी. |
| ,, | ,, | मसाला. | नौकर लोकांचा खर्च; एक प्रकारचा कर. |
| ,, | ,, | जथे. | जासुदांची टोळी. |
| ,, | २ | किता (कित्ता.) | सदर्हुप्रमाणें; वरील प्रमाणें. |
| २ | ३ | हातरोखा. | दस्तक; आज्ञापत्र; चिठी. |
| ,, | ,, | वजारतमाहा. | आंग्र्यांची पदवी. |
| ,, | ,, | खवडळी. | खोडी. |
| ,, | ,, | निशा. | खात्री. |
| ,, | ४ | तोलदार. | प्रचंड; भारी. |
| ४ | ९ | नतीजा. | शिक्षा; (मूळअर्थ परिणाम,) शेवट. |
| ,, | ,, | माहोना. | [मोहोना जासूदाचें नांव असावें, असें वाटतें] |
| ५ | ११ | नियत. | ठरीव. |
| ५ | १२ | गाह करणें. | जमाव किंवा तयारी करणें. |
| ,, | १३ | वळीत. | वळनी; वळवून नेणें. |
| ६ | १५ | वार्तिक. | जासूद; बातमी नेणारे. |
| ,, | ,, | दिनप्रती नें. | दररोज. |
| ७ | १६ | शह राखणे. | दाबांत ठेवणें; अटकाव करणें. |
| ,, | १८ | शामल. | जंजिरेकर हबशी; शिद्दी. |
| ८ | १९ | स्वस्ताक्षरपणी. | स्वतः लिहिलेला. |
| ८ | ,, | मिरधा. | हलकाऱ्यांचा नाईक. |
| १० | २५ | ताबीन. | ताबेदार; नौकर. |
| ,, | २६ | अमित्र. | शत्रु. |
| ११ | २७ | पराश्रम. | परक्याचा रिघाव किंवा प्रवेश. |
| १२ | २९ | पायबंद देणें. | अटकाव करणें. |
| ,, | ३१ | कही. | जिंती; फौजेच्या आघाडीचे लोक. |
| ,, | ,, | मजुरा. | मजरा. |

| | | | |
|---|---|---|---|
| १३ | ३४ | गनीम. | शत्रू. |
| १४ | ३७ | गुजरात कुली. | आणखी इसमांच्या. |
| ,, | ,, | दस्तक. | आज्ञापत्र; हुकूम. |
| ,, | ३९ | तांब्र. | मोंगल; पठाण. |
| १८ | ४७ | चौकी बसविणें. | अंमल बसविणें. |
| ,, | ४९ | कटकट. | भांडण; तंटा. |
| १९ | ५१ | पैरवी. | बंदोबस्त. |
| २० | ५५ | उजूर. | हरकत; सबब सांगणें. |
| २१ | ५६ | आंगेजणें. | पराक्रम. |
| २२ | ५८ | कबज केला. | ताब्यांत घेतला; काबीज केला. |
| ,, | ,, | दिंमत हुद्दे. | दिंमत हुद्देकरी. |
| २३ | ६० | बेहिसाब. | गैर विचाराचें; अयोग्य. |
| २४ | ६१ | कोलावण. | परदेशांतील लोकांवर जी जकात किंवा जो बसवितात तो. |
| ,, | ६२ | हर्षामर्प. | भांडण; चुरस. |
| ,, | ,, | संरसण. | सौरस्य; स्नेह. |
| ,, | ६३ | टाकोटाक. | तावडतोब. |
| २५ | ६५ | पेस्तर. | पुढील. |
| २६ | ६८ | सोखी करणें. | लगट; चाल करणें. |
| ,, | ,, | मातबर. | मोठी; बलाढ्य. |
| २७ | ६९ | भार बारदारी. | लवाजम्यासह. |
| ,, | ,, | मुजाहिम. | अडथळा. |
| २८ | ७१ | तारांगण करणें. | दाणादाण उडवून देणें. |
| ,, | ,, | खुशाल. | सुखी; आनंदी. |
| ,, | ,, | जगनामोश. | जगभर कीर्ति; लौकिक. |
| ,, | ,, | डौलें. | डौलपत्रकें; यादी. |
| २९ | ७२ | टाळेटोळे. | उनाड; बंडखोर. |
| ३० | ७३ | उपराळा. | मदत; सहाय्य. |
| ३० | ७५ | हरोल होऊन. | ( मूळ अर्थ सैन्याची पिछाडी ). सामील होऊन; सहाय्य होऊन. |
| ३४ | ८३ | मजत होतील. | (जमा होतील !) |
| ३६ | ८७ | पूजाउर्जा. | पूजाअर्चा. |

| ,, | ८८ | योगक्षेम. | चरितार्थ; उदर पोषण. |
|---|---|---|---|
| ३७ | ९० | धाराईत. | उदक सोडून. |
| ३७ | ९१ | सावकाश. | बरें; आराम. |
| ,, | ,, | सदरेस. | कचेरींत; दरबारांत. |
| ३९ | ९८ | निगादास्त. | बंदोबस्त; व्यवस्था. |
| ५३ | ११७ | जकिरा. | सामानसुमान. |
| ५५ | १२० | अजरामऱ्हामत. | वंशपरंपरा. |
| ,, | ,, | लाजिमा. | हक्क; वहिवाट; संबंध. |
| ५७ | १२७ | हकीम. | गांवांवरील अधिकारी. |
| ५८ | १२९ | फडफर्मास. | नजरनजराणा. |
| ६० | १३६ | हुक्केबारदार. | हुक्याच्या कामावरील नौकर. |
| ,, | १३७ | झाडेनिशी. | हिशोबानिशी. |
| ६१ | १३८ | विशादर्थें. | रागानें. |
| ६५ | १४४ | जिल्हा. | ताब्यांतील मुलूख. |
| ,, | १४४ | मजमून. | मुजुमदारीचा हुद्दा. |
| ७० | १४९ | शिरपाव. | पोषाख. |
| ७४ | १५२ | एकूणांत करणें. | एकंदर बेरीज करून शेवटीं सही करणें. |
| ,, | १५२ | फेरिस्त. | याद्दी. |
| ८४ | १६९ | बाजीद. | लाचार; दीन. |
| ,, | १७० | रुबीत. | रुबरु. |
| ८६ | १७३ | संगिनात. | स्वार; शिपाई; हत्यारबंद लोक. |
| ८७ | १७९ | रुसीत. | रुजू होऊन. |
| ८८ | १८० | ताराज. | उध्वस्त. |
| ८९ | १८३ | अंगारक. | आंग्रे. |
| ९१ | १८८ | अजुर्दा. | नाखुष; खिन्न; उदासीन. |
| ९२ | १९० | विजरे. | पोर्तुगीज गव्हरनर (?) |
| ९३ | १९३ | नस्तनाबूद. | पराभूत करणें; नाश करणें किंवा गर्भगळित करणें. |
| ९५ | १९७ | एखलासी. | स्नेह. |
| ९६ | २०० | कसाला. | प्रसंग; संकट. |
| ९६ | २०२ | बेचिराख. | ओसाड; उजाड. |
| ९७ | २०४ | बेदरका. | (बेदरकार असा शब्द असावा. ह्याचा अर्थ माणसें वगैरे देऊन.) |

| | | | |
|---|---|---|---|
| ९८ | २०५ | निकर्शी. | अनर्थ; त्रास; छल. |
| १०० | २०८ | बंद धरून नेणें. | कैद करणें; अटकेंत ठेवणें. |
| ” | ” | तालुका. | संबंध; कारण. |
| १०४ | २२० | खलेल. | अडथळा; तंटा; हरकत. |
| १०४ | २२१ | हरवजेनें. | हरएक युक्तीनें. |
| १०४ | ” | नसीयत. | शिक्षा ( मूळशब्द नसीहत. ) |
| ” | २२२ | कबिला. | बायकांमुलें. |
| १०५ | २२३ | कथला. | कथळा; भांडण. |
| १०६ | २२५ | कौल. | करारपत्र; अभयपत्र. |
| ” | ” | सरदेंत. | सरहद्दींत. |
| १०७ | २२८ | वळती करणें. | हल्ला करणें. |
| १११ | २४० | मोईनप्रमाणें. | नेमणुकीप्रमाणें. |
| ११४ | २४७ | जानगिरी. | मृत्यु (?) |
| ११५ | २४८ | रविसीनें. | रवेसीनें; रीतीनें; सामोपचारानें. |
| ११६ | २५१ | दिलदारी. | उत्तेजन; धीर. |
| ” | ” | जबर. | जरब; शासन; शिक्षा. |
| ११७ | २५३ | तिळतुल्या. | तिळमात्र. |
| ११८ | २५८ | नागावा. | नागवण; लूट. |
| ११९ | २६० | त्वष्ट. | तगादा; मागणें. |
| १२१ | २६५ | लाजिम. | हक्क. |
| ” | ” | पैवस्ती. | जमेची तारीख. |
| ” | ” | वटाव. | नाण्याचा मोबदला करण्याबदलचा आकार. |
| ” | ” | दंडकप्रमाणें. | चालीप्रमाणें; वहिवाटीप्रमाणें. |
| १२३ | २६८ | शिताबीनें. | शहाणपणानें; चातुर्यानें. |
| १२४ | २७१ | जमियेत. | फौज; सरंजाम. |
| १२४ | २७३ | मुद्राधारी. | शिक्के ज्यांच्या जवळ असतात ते; शिक्याव अधिकारी. |
| १२९ | २७५ | थळझाडा. | जमिनीचा हिशेब. |
| ” | ” | पांढरझाडा. | गांवठाण्याचा हिशेब. |
| ” | ” | कैफत. | खटल्याची हकीकत; वर्णन |
| ” | ” | जेजाल बारदार. | जेजाला बाळगणारे शिपाई. |
| [illegible] | [illegible] | [illegible] | मक्ता. |

| | | | |
|---|---|---|---|
| १३२ | २८० | करीना. | जबानी; हकीकत. |
| ,, | ,, | मवाजनेमाफीक. | मोजणीप्रमाणें. |
| १३४ | २८१ | फरोक्त. | विकलेला; विक्री. |
| १३५ | २८३ | खुश रजावंदीनें. | स्वसंतोषानें; आनंदानें. |
| १३६ | ,, | महजर. | निवाडापत्रक. |
| १३७ | ,, | शेरणी. | नजराणा. |
| १३९ | २८४ | तालीक. | नक्कल; प्रत. |
| १४० | २८५ | लाहारी. | तीन आणे किमतीचें नाणें. |
| ,, | ,, | राहा मुसकी. | ( रस्त्याचें नांव असावें, असें वाटतें. ) |
| ,, | ,, | पारखावण. | परीक्षा करण्याबद्दलचा आकार. |
| ,, | ,, | फसकी. | जकात. |
| १४१ | ,, | पालक. | पाल दिलेलीं दुकानें; पालकरी. |
| १४३ | २८७ | पाळणूक. | कर देण्यापासून माफी. |
| ,, | ,, | फुरयबाब. | एक प्रकारचा कर. |
| १४४ | २८९ | शेलपाटी. | शेलापाटी=गांवच्या पाटलाचा मान. |
| १४८ | ,, | मुंढीवसात. | गांवच्या पाटलाचा मान. |
| १५२ | २९१ | नातवानी. | गरीबी; दारिद्र्य. |
| ,, | ,, | निरादर. | भाऊबंद. |
| १५३ | २९२ | थळिक. | गांवकरी; थळकरी. |
| १५४ | २९३ | गिर्दनवाई. | चहूंकडने ? |
| १५६ | २९५ | तलब. | समन्स; बोलावणें. |
| ,, | ,, | पुरसीस. | प्रश्न केले; जबानी घेतली. |
| ,, | ,, | सड. | दस्तऐवज; कागदपत्र. |
| १ ७ | ,, | इजीतखत. | इजितपत्र. |
| ८४ | ३०९ | लिगाड. | लचांड. |
| ८५ | ३११ | लाझ्या (?). | गुन्हा; दोष. |
| ८५ | ३१३ | थाक. | ठिकाण; पत्ता. |
| ८८ | ३१९ | जराबाजरा. | किरकोळ सामानसुमान. |
| ९० | ३२६ | तहसिलें. | वसूल. |
| ९७ | ३३८ | बदराहा. | वाईट चालीची. |
| ९ | ३६१ | आमरफ्ती. | व्यापार ? |
| ० | ३६१ | फरातग. | फरोक्त; विक्री करणें. |

| | | | |
|---|---|---|---|
| २१२ | ३६६ | टोकरियांत. | कातब्याच्या नांवेंत. |
| २१९ | ३८२ | नवादिगर. | हरकत; तक्रार. |
| २२० | ३८४ | बजीद होणें. | लाचार होणें; दीन होणें; हरणें. |
| २२१ | ४०९ | मोईन. | वर्षाची नेमणूक; ठोकळ रक्कम. |

---